






नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.
वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका

## 'लेखन' हाच लेखकाचा श्वास बनला पाहिजे

"कोणतंही बलदंड व्यक्तिमत्त्व" मग तो कलावंत असो वा प्रज्ञावंत, मला वाटतं, तो जो कोणी कलावंत किंवा प्रज्ञावंत असतो, तो त्याच्यातील 'मी' मुळंच असतो. हा 'मी' फार महत्त्वाचा. सगळी सळसळ तिथून सुरू होते. आपल्या सगळ्या धडपडीला, आविष्काराला शक्ती देणारा आपल्यातला 'मी'च असतो. आज जे कोणी तुम्ही कवी आहात, लेखक आहात, चित्रकार आहात किंवा आणि कोणी आहात, ते त्या 'मी'मुळं आहात. तुमच्यात तो असाधारण 'मी' आहे म्हणून तुम्ही आहात. त्या 'मी' मुळं तुमच्या जाणिवा जागृत राहतात, संवेदना सक्षम होतात आणि त्यांच्या स्वभावधर्मामुळं कोणाला चित्रकला जमते, तर कोणाला शब्दकळा वश होते. आपण कलावंत लेखक आहात म्हणजे एका परीनं भाग्यवंत आहात. इतरांना कळ्या दिसतात किंवा त्यांची फुलं झालेली दिसतात. लेखक हाच एक असा भाग्यवान आहे, की तो त्या कळ्यांचं रुपांतर होताना त्यांचं ते हळूहळू उमलणं पाहू शकतो. ती स्थितिगती त्याला आकळते. परमेश्वरानं तुम्हा कलावंत साहित्यिकांना वेगळे डोळे दिले आहेत. त्या डोळ्यांनी पहा, टिपा, त्या दिव्य दृष्टीला जे दिसेल ते तुमच्या जाणिवेकडं सोपवा आणि मग त्या अनुभवांचं सोनं करा. अहो कविता, कथा म्हणजे ही चैतन्याची फुलं आहेत! चैतन्याची फुलं करण्याची कला तुम्हाला लाभली आहे. 'भाषा' हे केवढं मोठं माध्यम तुमच्या हातात आहे! पण एक काळजी घ्या, तुमच्यातल्या त्या 'मी'ला यशानं किंवा समाधानानं सुखावू देऊ नका. तो सुखावला की तुमची कला तुमच्याकडं पाठ फिरवील आणि मग तुम्हाला काही सुचेनासं होईल. त्यासाठी 'लेखन' हाच लेखकाचा श्वास बनला पाहिजे. त्याच धुंदीत आपण सदैव असलं पाहिजे. मग अनुभवांचा तुटवडा भासत नाही. तंबोऱ्याच्या तारा जुळवून ठेवलेल्या असल्या म्हणजे लहानशा स्पर्शाने देखील त्यांतून झणत्कार निघतो. लेखक-कलावंतांच्या कलानुभवांचंही असंच आहे. त्यांच्या जाणीवेच्या तारा जुळलेल्या असल्या की एखाद्या लहानशा प्रसंगानं किंवा एखाद्याच्या तोंडच्या वाक्यानंही अनुभव कलारूप घेऊ लागतो. स्पंदनं जाणवू लागतात. त्यासाठी कलावंत म्हणून आपलं व्यक्तिमत्त्व आपण किती संपन्न करतो त्यावरही ही क्षमता थोडी फार अवलंबून असते. उदाहरणच घ्यायचं तर मी असं म्हणेन— स्वीच एकच असतो, पण बल्ब चाळीसचा असेल तर प्रकाश तेवढाच पडेल, पण तो बल्ब काढा आणि त्या ठिकाणी चारशेचा बल्ब लावा. त्याच स्वीचवर प्रकाश चारशेचा पडेल. शिवाय तुम्हाला उजेड रंगीत हवा असेल तर तेही शक्य आहे. अनुभवांचंही असंच आहे. घडणारी घटना स्वीचप्रमाणे एकच असली तरी ती पाहणाऱ्यांच्या मनातील जाणीवा वेगळ्या असल्यामुळे प्रत्येकाला येणारा अनुभव वेगळा असतो. एकाच घटनेनं काहींच्या चेहऱ्यावरची सुरकुतीही हलणार नाही; पण एखाद्याच्या मनात स्पंदनाचा लोळ उठेल!"

— शंकर पाटील (नांदेड साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदावरून)

अनुक्रमणिका

महाराष्ट्र साहित्य परिषदेचे त्रैमासिक

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

अंक २३५ ◻ दिवाळी विशेषांक ◻ ऑक्टोबर-डिसेंबर १९८५

मूल्य दहा रुपये



अनुक्रम





संपादक :

डॉ. वसंत स. जोशी

संपादन समिती :

ज्योत्स्ना देवधर, राजा फडणीस, म. ना. अदवन्त

सल्लागार :

गो. म. कुलकर्णी, राजेन्द्र बनहट्टी

प्रकाशक व मुद्रक :

डॉ. म. वि. गोखले

कार्यवाह, महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळकरस्ता, पुणे ४११ ०३०

दूरध्वनी ४४ २९ ६३

मुद्रणस्थळ : सुलभ मुद्रणालय, २९१ शनिवार पेठ, पुणे ४११ ०३० ◻ मुखपृष्ठ : अनिल अवचट



महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ पुरस्कृत

# संपादकीय

'महाराष्ट्र साहित्य पत्रिके'च्या मागील अंकाचे 'आकर्षक व वाचनीय' अशा शब्दात वाचकांनी स्वागत केले. साहित्य परिषदेच्या सभासदांची संख्या आता पाच हजारांकडे वाटचाल करीत आहे. त्या दृष्टीने 'पत्रिके'चे स्वरूपही अधिक वाचकाभिमुख व्हावे अशी अपेक्षा कित्येकांनी व्यक्त केली. 'साहित्य पत्रिके'ची परंपरा लक्षात घेता तिचे वैचारिक, संशोधनात्मक, विचारप्रवर्तक स्वरूपही राहाणे गरजेचे आहे. तथापि दिवाळी अंकाच्या निमित्ताने मराठीतील नव्या पिढीतील कथाकारांना आम्ही 'साहित्य पत्रिके'चे व्यासपीठ उपलब्ध करून दिले आहे. नव्या पिढीच्या सर्जनशील प्रतिभेचे स्वागत करीत असतानाच आम्ही त्यांच्याकडून साहित्यक्षेत्राशी निगडित वैचारिक, समीक्षात्मक लेखनाचीही अपेक्षा करीत आहोत. आमचा हा नवा उपक्रम म. सा. परिषदेच्या सभासदांना आणि 'म. सा. पत्रिके'च्या हजारो वाचकांना आवडेल, अशी उमेद आहे.

ही दीपावली आणि नूतन वर्ष 'म. सा. पत्रिके'च्या सर्व हितचिंतकांना, सभासदांना आणि लेखकांना सुख आणि समृद्धीदायक होवो !

## नांदेड साहित्य संमेलन

अ. भा. मराठी साहित्य संमेलनाचं ५९ वं अधिवेशन नांदेड येथे नुकतंच (२५-२७ आक्टोबर) यशस्वीपणे पार पडलं. या अधिवेशनाचे वृत्तपत्रे आणि इतर नियतकालिके यांमधून जे वृतान्त आले आहेत त्यांचा एकूण सूर 'संमेलन गर्दीचं, उत्साहाचं, कार्यक्रमांनी भरगच्च असं आणि निर्विघ्नपणे पार पडलं' असाच आहे. संमेलनाध्यक्ष श्री. शंकर पाटील यांनी आपल्या आटोपशीर भाषणात लेखक म्हणून आपली घडण कशी झाली हे सांगून शासन, साहित्यसंस्था आणि साहित्यिक या तिन्ही घटकांना उद्देशून जो बारा कलमी विधायक कार्यक्रम सुचवला तो कार्यवाहीत आणण्याची जबाबदारी आता सर्व संबंधितांची आहे. नवोदित लेखकांना त्यांनी आपल्या भाषणात जो आत्मपरीक्षणाचा, पण उत्साहवर्धक इशारा दिला तोही फार महत्त्वाचा आहे. संमेलनाच्या यशात अनेक व्यक्ती आणि संस्था यांचा मनोभावे सक्रिय सहभाग होता. सर्वश्री शंकर पाटील, शंकरराव खरात, ना. धों. महानोर, सुधीर रसाळ, तसेच स्वागताध्यक्ष श्री. शामराव कदम, कार्याध्यक्ष प्रा. स. दि. महाजन आणि त्यांचे सहकारी-इत्यादी सर्वांचे आम्ही मनःपूर्वक अभिनंदन करतो आणि मुंबईला भरणाऱ्या आगामी हीरकमहोत्सवी अधिवेशनाच्या कार्यकर्त्यांनी अधिक काही करून दाखवावे अशी अपेक्षा व्यक्त करतो.

## स्वतंत्र मराठी विद्यापीठ

भाषावार प्रांतरचनेनंतर त्या त्या राज्यातील भाषांतून सर्व व्यवहार चालावेत, शिक्षणाचे माध्यमही मातृभाषा हेच असावे, अशी अपेक्षा होती. महाराष्ट्र राज्य स्थापनेला पंचवीस वर्षे पूर्ण झाली, तरी मराठीच्या संदर्भात ती पूर्ण झालेली दिसत नाही. त्यामुळेच नागपूर विद्यापीठाच्या ७३ व्या दीक्षान्त समारंभात भाषण करताना विद्यापीठाचे माजी कुलगुरू डॉ. वि. भि. कोलते यांनी स्वतंत्र मराठी विद्यापीठाचा आवर्जून पुरस्कार केला आहे. कला व समाजविज्ञान शाखांत काही प्रमाणात मराठीचा माध्यम म्हणून उपयोग होत असला, तरी विज्ञान, अभियांत्रिकी, तांत्रिकी आणि वैद्यकीय शाखांतून इंग्रजी माध्यमच अट्टाहासपूर्वक चालू ठेवण्यात आले. उस्मानिया विद्यापीठाने उर्दू माध्यम यशस्वीपणे राबविले. नागपूर विद्यापीठानेही तशी पावले उचलली; परंतु प्रस्थापितांच्या असहकारामुळे त्यास सफलता प्राप्त झाली नाही. या वेगवेगळ्या ज्ञानशाखांतून लिहिले जाणारे पीएच्. डी. चे संशोधनात्मक प्रबंध प्रायः इंग्रजीमधून असतात. त्यातील ज्ञानाचा प्रवाह सामान्यांपर्यंत पोचू शकत नाही. मराठी माध्यमाच्या द्वारे सामान्यांपर्यंत तो झिरपत जाऊ शकतो. विविध विषयांवरील मराठी परिभाषा आता तयार झाली आहे. 'मराठी विश्वकोशा'ने शास्त्रीय विषयांवरील लेखांतून ती परिभाषा कटाक्षाने उपयोजिली आहे. अर्थशास्त्र, राज्यशास्त्र यासारख्या विषयांवर आता मराठी पाठ्यपुस्तकेही उपलब्ध झालेली आहेत. "आपापल्या शास्त्रातील आंतरराष्ट्रीय पारिभाषिक शब्द वाप-

रण्याला परवानगी दिली, तर सर्व विषय मराठीतून शिकविता येणे शक्य आहे " असे डॉ. कोलते यांचे मत आहे. इंग्रजी माध्यम ठेवण्यात विशिष्ट अभिजन वर्गाचा आग्रह असून त्या अभिजन वर्गात आता कारखानदारी, उद्योगधंदे आणि शेती यातून मिळणाऱ्या पैशामुळे निर्माण झालेल्या नवश्रीमंत वर्गाचाही समावेश त्यांनी केला आहे. या नव्या संस्कृतीस त्यांनी 'कांचन संस्कृती' असे नाव दिले आहे. मराठीतून आज वैज्ञानिक विषयावरील नियतकालिके प्रसिद्ध होत आहेत. त्या त्या विषयाच्या परिषदांतून मराठी माध्यमाचा विचार होतो आहे. परंतु इंग्रजीची पकड महाराष्ट्रातील कांचन संस्कृतीतील अभिजन वर्गावर विलक्षण बसलेली आहे. इंग्रजी माध्यमाच्या शाळा, महाविद्यालये सर्वत्र फोफावत आहेत. या दुष्ट चक्रातून वाट काढण्यासाठी व सर्व ज्ञान शाखांचे शिक्षण मराठीतूनच देण्यासाठी एका स्वतंत्र मराठी विद्यापीठाच्या स्थापनेची गरज डॉ. कोलते यांनी प्रतिपादिली आहे. महाराष्ट्र राज्याच्या स्थापनेस पंचवीस वर्षे होऊनही अशा विद्यापीठासाठी आग्रह धरावा लागतो, ही खेदाची गोष्ट आहे. यावर तोडगा सुचवताना डॉ. कोलते म्हणतात, "महाराष्ट्रातच नव्हे तर देशातील प्रत्येक राज्यात तेथील भाषेच्या माध्यमाचे स्वतंत्र विद्यापीठ होणे आवश्यक आहे...या विद्यापीठात विज्ञान, तंत्रज्ञान, अभियांत्रिकी, वैद्यकीय इत्यादी सर्व विद्याशाखा असल्या पाहिजेत व त्यांतून बाहेर पडणाऱ्या पदवीधरांना शासनाने आपल्या सर्व सेवांत अग्रक्रमाने समाविष्ट करून घेतले पाहिजे." सुदैवाने अलीकडील महाराष्ट्र शासन मराठी माध्यमाविषयी अधिक जागरूक दिसते. न्यायालयातही मराठी माध्यमाचा स्वीकार व्हावयाचा आहे. महाराष्ट्रातील विचारवंत, पत्रकार, साहित्यिक आदींनी या संदर्भात आग्रह धरला पाहिजे. हा प्रश्न सर्वच मराठी भाषिकांच्या जिव्हाळ्याचा आहे. त्याची अशीच उपेक्षा होत राहिली, तर मोठ्या प्रमाणात शिक्षण घेणारा बहुजन समाज पुन्हा एकदा उच्च ज्ञानापासून वंचित राहण्याची शक्यता आहे.

## नामदेव अध्यासन

भारताचे राष्ट्राध्यक्ष श्री. ग्यानी झैलसिंग यांच्या सूचनेप्रमाणे महाराष्ट्र शासनाने पुणे विद्यापीठात नामदेव अध्यासन सुरू केले आणि त्याजागी डॉ. अशोक कामत यांची नियुक्ती झाली, याबद्दल महाराष्ट्र शासन आणि डॉ. कामत यांचे आम्ही अभिनंदन करतो. डॉ. कामत यांचा हिंदी व मराठी या दोन्ही भाषांचा व्यासंग असून परिभ्रमणाच्या निमित्ताने उत्तरेतील अनेक सांस्कृतिक आणि साहित्यिक केंद्रांना यापूर्वीच त्यांनी भेटी दिलेल्या आहेत. पंजाबातील भागवतधर्माच्या प्रचारकार्यामुळे संत नामदेवांचे व्यक्तिमत्त्व अन्य संतांहून वेगळे आणि वैशिष्ट्यपूर्ण ठरले आहे. हिन्दीतील कबीर, रामानंद, तुलसीदासांची परंपरा आणि शीखधर्मसंस्थापक नानकादी थोर पुरुषांवर असलेला त्यांचा प्रभाव अभ्यसनीय आहे. या अध्यासनाच्या निमित्ताने तौलनिक वाङ्मय आणि भाषाभ्यासालाही एकप्रकारे चालना मिळणार आहे. विशिष्ट परीघात फिरणाऱ्या मराठी संत कवींच्या काव्यसमीक्षेलाही एक व्यापक परिमाण यामुळे लाभण्याची शक्यता आहे. भारतीय तत्त्वज्ञान आणि भक्तिपरंपरा यांचा सर्व भारतीय भाषांतील संतसाहित्याशी असणारा अनुबंधही यामुळे स्पष्ट होण्यासारखा आहे. हिंदी, पंजाबी आणि मराठी भाषक संशोधकांचे वैचारिक आदानप्रदानही होऊ शकेल. पारंपरिक चाकोरीबद्ध अभ्यासक्रमाहून वेगळ्या अभ्यासाच्या दिशा अध्यासनापासून अपेक्षित आहेत. ज्ञानेश्वर अध्यासनासाठी चालू असणारे प्रयत्न सफल होतील आणि तुकाराम अध्यासनाची जोड त्यास मिळून संत साहित्याभ्यासासाठी सखोल क्षेत्र अभ्यासकांना लाभेल, असा विश्वास नामदेव अध्यासनाच्या स्थापनेमुळे बाळगावयास हरकत नाही.

## मुंबई मराठी साहित्यसंघास शुभेच्छा

मुंबई मराठी साहित्य संघ (गिरगाव) ही संस्था सांप्रत आपला सुवर्णमहोत्सव साजरा करीत आहे आणि या उत्सवाचे कार्यक्रम वर्षभर चालू राहणार असून उत्सवाची सांगता आगामी अ. भा. मराठी साहित्य संमेलनाच्या आयोजनाने पुढील वर्षी होणार आहे.

साहित्यसंघाने कै. डॉ. अ. ना. भालेराव यांचे स्मृत्यर्थ नाट्यगृह आणि स्वतःची वास्तु उभारून मुंबईत मराठी साहित्यविषयक चळवळीला एक मानाचे स्थान प्राप्त करून दिले. विविध नवेनवे नाट्यप्रयोग, साहित्यचर्चा, व्याख्याने, ' साहित्य ' सारखे वाङ्मयीन नियतकालिक, मराठीच्या परीक्षा इत्यादी उपक्रम करून संघाने बरीच भरीव कामगिरी केली आहे. संघाच्या आजवरच्या यशस्वी वाटचालीचे श्रेय कै. डॉ. भालेराव, कै. दि. वि. आमोणकर, बापूराव नाईक, कै. श्री. शं. नवरे, वा. रा. ढवळे, कै. न. र. फाटक, दाजी भाटवडेकर, अंधृटकर प्रभृती अनेक कार्यकर्त्यांना द्यावे लागेल. संघाचे आणि साहित्य-परिषदेचे प्रथमपासून जिव्हाळ्याचे संबंध होते व अद्यापि ते टिकून आहेत. सुवर्णमहोत्सवानिमित्त आम्ही संघाला मनःपूर्वक शुभेच्छा देतो व सर्व विद्यमान कार्यकर्त्यांचे अभिनंदन करतो.

**अभिनंदन**

' संत नामदेवा 'वर प्रबंधलेखन करणारे संत-साहित्याभ्यासक, ' म. सा. पत्रिके 'चे माजी संपादक आणि पुणे येथील श्री. ना. दा. ठा. महिला महाविद्यालयाचे प्राचार्य डॉ. हेमन्त विष्णु इनामदार यांच्या वयास येत्या दि. ३ नोव्हेंबर रोजी ६० वर्षे पूर्ण होत आहेत. एक कुशल प्रशासक, उत्कृष्ट शिक्षक असा लौकिक त्यांनी संपादित केला आहे. त्यांच्या चाहत्यांनी यानिमित्ताने एक सत्कार सोहळाही आयोजित केला आहे. आम्ही डॉ. भाऊराव इनामदार यांचे अभिनंदन करतो आणि त्यांना निरामय दीर्घायुष्य इच्छितो.

**...आणि अभिवादन !**

गेल्या एकदोन महिन्यात मराठीतील काही नामवंत साहित्यिकांचे देहावसान झाले. ' कुमार रघुवीर ' या नावाने लेखन करणारे रघुनाथ ज. सामंत यांचे दि. १७ सप्टेंबर रोजी निधन झाले. ते ७६ वर्षांचे होते. ' शब्दचित्र ' हा वाङ्मयप्रकार आपल्या वैशिष्ट्यपूर्ण शैलीने त्यांनी मराठीत रूढ केला. ' हृदय ' या त्यांच्या संग्रहात शब्दचित्राचे भावगीताशी असणारे नाते त्यांनी स्पष्ट केले. शब्दचित्रकार म्हणून ते प्रसिद्ध असले, तरी ' उपकारी माणसे ' ही चार खंडात्मक आणि ' जीवनगंगा ' या कादंबऱ्या, 'वाळूतील पाऊले,' ' तोंडा ' यांसारखे कथासंग्रह आणि ' पणत्या ' हा लघुनिबंधसंग्रह इ. लेखनही त्यांनी केलेले आहे.

गेल्या पिढीतील विदर्भातील कवी हनुमंत गुणवंत देशपांडे यांचे दि.२६ सप्टेंबर रोजी निधन झाले. 'कोणता मानू चंद्रमा ' या काव्याने ते विशेष प्रसिद्धीस आले. ' निवेदन ' हा त्यांचा कवितासंग्रह प्रसिद्ध आहे. गोमंतकातील याच पिढीतील कवी दामोदर अच्युत कारे यांचे वयाच्या ७७ व्या वर्षी दि. २३ सप्टेंबर रोजी मडगाव येथे निधन झाले. रविकिरण मंडळाच्या प्रभावाखालील कै. कारे यांचा ' नंदादीप ' हा काव्य-संग्रह आणि ' निःस्तब्ध रहा क्षणि या प्रणया ' हे प्रेमगीत विशेष प्रसिद्ध आहे. जुन्या पिढीतील या कवीचे लेखन नंतरच्या काळात मंदावले असले, तरी त्यांचा कालखंड त्यांनी गाजविला होता.

नामवंत शिक्षणतज्ज्ञ वि. पां. बोकील यांचे वयाच्या ९५ व्या वर्षी वृद्धापकाळाने दि. २५ सप्टेंबर रोजी पुणे येथे निधन झाले. इतिहास, संस्कृतवाङ्मय आणि शिक्षण-शास्त्र या विषयांवर त्यांनी ग्रंथरचना केली. ' राजगुरू रामदास ' आणि ' न्यू अॅप्रोच टू संस्कृत ' हे त्यांचे ग्रंथ प्रसिद्ध आहेत. रामदासांच्या ' मनाच्या श्लोकां'चे इंग्रजी आणि संस्कृत भाषांतून त्यांनी रूपांतरही केले होते. त्याबद्दल जागतिक संस्कृत संमेलनात त्यांचा गौरव करण्यात आला होता.

गेल्या पिढीतील प्रसिद्ध लेखिका शांताबाई शंकर नाशिककर यांचे दि. १८ ऑक्टोबर ८५ रोजी वयाच्या ८३ व्या वर्षी पुणे येथे निधन झाले. 'साम्राज्यासाठी ' ही ऐतिहासिक कादंबरी, शिवाय अनेक नाटके कवितासंग्रह इत्यादी ५० पुस्तके त्यांच्या नावावर आहेत.

या सर्व वडीलधाऱ्या दिवंगत साहित्यिकांना आमचे विनम्र अभिवादन.

**—वसंत स. जोशी**

: पुणे विद्यापीठात महाराष्ट्र शासनाच्या पुरस्काराने स्थापित झालेल्या 'नामदेव अध्यासना'चा प्रारंभ दि. ६ सप्टेंबर १९८५ रोजी झाला. राष्ट्रपती ग्यानी झैलसिंग यांच्या सूचनेवरून हे अध्यासन निर्माण झाले. हिन्दी व मराठी विषयात पीएच्. डी. संपादन करणारे लेखक व संशोधक प्रा. डॉ. अशोक प्रभाकर कामत यांची या अध्यासनासाठी नियुक्ती करण्यात आली आहे. पुढील पाच वर्षात नामदेव गाथेचा चिकित्सक अभ्यास, नामदेव पदावलीचे पुनर्संपादन, 'गुरु ग्रंथसाहेबा'तील नामदेवांच्या मुखवानीच्या मराठी, हिन्दी सटीक आवृत्त्या तयार करणे, पंजाबी बांधवांसाठी निवडक नामदेव वाणींचा अनुवाद इत्यादी महत्त्वाची संपादन कार्ये अध्यासनापुढे आहेत.

: ख्यातनाम साहित्यिक श्री. विश्राम बेडेकर यांच्या 'एक झाड आणि दोन पक्षी' या आत्मचरित्रपर ग्रंथास यंदाचे 'साहित्य सम्राट न. चिं. केळकर पारितोषिक' देण्यात आले आहे. हे पारितोषिक रु. २१०० चे असून ते केसरी मराठा संस्थेच्या वतीने देण्यात येते.

: इंग्रजीच्या विचित्र प्रभावातून राज्यातील शिक्षणाची मुक्तता करण्यासाठी एक स्वतंत्र मराठी विद्यापीठ स्थापन करावे, अशी मागणी नागपूर विद्यापीठाचे माजी कुलगुरू व महानुभाव साहित्य संशोधक डॉ. वि. भि. कोलते यांनी नागपूर विद्यापीठाच्या ७३ व्या पदवीदान समारंभात बोलताना दि. १० सप्टेंबर रोजी केली.

: मुंबई येथील प्रियदर्शिनी अकादमीच्या वतीने पुढील वर्षापासून हिंदी, मराठी व सिंधी या भाषांतील एका सर्वोत्कृष्ट लेखकास प्रत्येकी पाच हजार रुपयांचे रोख पारितोषिक देण्यात येणार आहे. अकादमीच्या दुसऱ्या वर्धापन दिनानिमित्ताने अध्यक्ष श्री. नानिक रूपाणी यांनी ही घोषणा केली.

: सर रामकृष्ण गोपाळ भांडारकर यांच्या साठाव्या पुण्यतिथीच्या निमित्ताने पुण्यातील श्रीराम कोशसंस्थेचे संचालक श्री. अमरेंद्र गाडगीळ यांनी श्रीराम कोशसंस्थेचा व स्वतःचा वैयक्तिक असा मिळून सुमारे दोन हजार सातशे ग्रंथांचा संग्रह भांडारकर संशोधन संस्थेला दान स्वरूपात दिला आहे. हा संग्रह सुमारे एक लाख रुपये किंमतीचा आहे. श्री. गाडगीळ यांनी साहित्य अकादमीच्या सूचनेवरून 'रामायणावरील ग्रंथांची सर्वसंग्राहक सूची' आणि 'मराठीतील रामायणविषयक अभ्यास' हे दोन ग्रंथ तयार केले आहेत.

: 'तमाशा' ही महाराष्ट्राची लोकप्रिय लोककला असून ती सादर करून उपजीविका करणारे सुमारे दहा हजार कलावंत आणि त्यांचे कुटुंबीय यांना उर्जितावस्था प्राप्त करून देण्यासाठी राजाश्रय व लोकाश्रयाची गरज आहे, असे विचार आकाशवाणीचे कार्यक्रम अधिकारी श्री. हेमंत कारंडे यांनी व्यक्त केले. लातूर येथील तमाशा प्रशिक्षणार्थींसमोर ते बोलत होते.

: दर दोन वर्षांनी साजरे होणारे दक्षिण महाराष्ट्र साहित्य संमेलन यंदा २३ व २४ नोव्हेंबर १९८५ रोजी जयसिंगपूर येथे अप्रतिम जीवन साधना केंद्राच्या वतीने भरविण्यात येणार आहे.

: भारतीय भाषांसाठी रोमन लिपीचा पुरस्कार मराठी विज्ञान परिषदेचे संस्थापक सदस्य श्री. म. ना. गोगटे यांनी केला आहे. प्रा. अरविंद मंगरूळकर यांनीही त्यास अनुमोदन दिले आहे.

: अकोला येथून प्रसिद्ध होणाऱ्या 'रजधूळ' या मासिकाच्या दुसऱ्या वर्धापनदिनानिमित्ताने हायरूण येथे एक साहित्य मेळावा घेण्यात आला. असे मेळावे महाराष्ट्रात ठिकठिकाणी भरविण्याची योजना आहे.

: पुणे येथील नवोदित कवी आणि काव्यरसिकांच्या 'काव्यशिल्प' या संस्थेतर्फे लवकरच एक प्रातिनिधिक कवितासंग्रह प्रकाशित होत आहे. पुण्यातील एक नेत्र



अनुक्रमणिका

तज्ज्ञ डॉ० शंतनु चिंधडे हे 'काव्यशिल्प'चे यावर्षीचे अध्यक्ष आहेत. विविध व्यवसायातील सुमारे ७५ कवी 'काव्यशिल्प'चे सभासद आहेत.

: मुंबईच्या श्री. ना. दा. ठा. महिला विद्यापीठाच्या पदव्युत्तर मराठी विभागाच्या वतीने 'साहित्यसमीक्षेच्या नव्या दिशा' या विषयावर तीन दिवसांचे एक चर्चासत्र दि. २, ३ व ४ सप्टेंबर रोजी घेण्यात आले. मुंबई, पुणे व शिवाजी विद्यापीठातील प्राध्यापक यावेळी उपस्थित होते. मराठी विभाग प्रमुख डॉ. भीमराव कुलकर्णी यांनी चर्चासत्राचे संयोजन केले.

: म. फुले समता प्रतिष्ठान व बुद्धिप्रामाण्यवादी मंच यांच्या वतीने डॉ. नरेंद्र दाभोलकर (सातारा) यांच्या 'भ्रम व निरास' या पुस्तकाचे प्रकाशन तर्कतीर्थ श्री. लक्ष्मणशास्त्री जोशी यांच्या हस्ते पुणे येथे दिनांक ३ ऑक्टोबर रोजी झाले.

: वाई रोटरी क्लबतर्फे 'सामाजिक बांधिलकी : कृष्णाकाठ व मी एस. एम्. या आत्मचरित्रांच्या संदर्भात' या विषयावर निबंध स्पर्धा जाहीर झाली आहे. शब्दमर्यादा १५००. वरिष्ठ महाविद्यालयातील विद्यार्थ्यांसाठी. मुदत दि. ३० नोव्हेंबर १९८५. अधिक माहिती अध्यक्ष, वाई रोटरीक्लब, वाई. (जि. सातारा).

: पुणे येथे दि. ५ व ६ ऑक्टोबर रोजी अखिल भारतीय दलित नाट्यमहोत्सव श्री. मधुसूदन गायकवाड यांच्या अध्यक्षतेखाली साजरा झाला. 'दलित रंगभूमी या मातीची रंगभूमी' या विषयावरील परिसंवाद, काही एकांकिका आणि एकपात्री प्रयोग यांची योजना या सोहळ्यात करण्यात आली होती.

: पणजी येथे दि.२ ऑक्टोबर रोजी गांधी जयंतीनिमित्त घेतलेल्या एका मराठी प्रेमिकांच्या एका प्रचंड मेळाव्यात गोव्यात मराठीला राज्यभाषेचा दर्जा मिळविण्यासाठी आंदोलन करण्याचा निर्णय घेण्यात आला. गोवा सरकारने एकट्या कोकणी भाषेला राज्यभाषेचा दर्जा देण्याचे ठरविले आहे. हा निर्णय रद्द करावा, असे आवाहन करणारा ठराव या मेळाव्यात करण्यात आला.

: प्रख्यात फ्रेंच कादंबरीकार क्लॉद सिमाँ यांना १९८५ चे साहित्याविषयीचे नोबेल पारितोषिक देण्यात आले आहे. सिमाँ यांच्या साहित्यात कवी आणि चित्रकाराची सर्जनशीलता, कामाचे भान आणि मानवी परिस्थितीचा विचार आढळतो, असे नोबेल समितीने म्हटले आहे. त्यांना फ्रान्समधील प्रायोगिक नव-साहित्यांचे उद्गाते मानले जाते.

: वाईतील सुप्रसिद्ध विचारवंत आणि साहित्यिक श्री. रा. ना. चव्हाण यांचा महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृतीमंडळातर्फे दि. १९ आक्टोबर रोजी तर्कतीर्थ श्री. लक्ष्मणशास्त्री जोशी यांच्या हस्ते सत्कार करण्यात आला. श्री. चव्हाण यांचा एक लेखसंग्रहही साहित्य-संस्कृती मंडळाच्या वतीने प्रसिद्ध होणार आहे.

: कर्नाटक राज्य मराठी साहित्य परिषदेचे १९८५ ते ८८ या तीन वर्षांसाठीचे पदाधिकारी. अध्यक्ष : प्रा. वि. पां देऊळगावकर, उपाध्यक्ष : श्री. बी. एस. प्रयाग, कार्यवाह : प्रा. चंद्रशेखर भपाले, श्री. शरद देसाई डॉ. अरविंद चाफेकर. परिषदेतर्फे 'मायबोली' हे त्रैमासिक नुसतेच प्रकाशित झाले असून कर्नाटकातील मराठी साहित्यिकांचे एक संमेलन, लवकरच भर-विण्यात येणार आहे.

: दि. २० ऑक्टोबर रोजी कोल्हापूर येथे दक्षिण महाराष्ट्र साहित्य सभेतर्फे डॉ. आनंद यादव यांच्या अध्यक्षतेखाली शासन पुरस्कार प्राप्त ग्रंथकारांचा आणि प्रकाशकांचा सत्कार खासदार श्री. बाळासाहेब भावे यांच्या हस्ते करण्यात आला.

: 'गर्भरेशीम' या काव्यसंग्रहास साहित्य अकादमीचा पुरस्कार मिळाल्याबद्दल कवयित्री इंदिरा संत यांचा बेळगाव येथे कर्नाटक विश्वविद्यालयातर्फे दि. १५ ऑक्टोबरला सत्कार झाला. याचवेळी साहित्य अकादमी पुरस्कार विजेते कन्नड साहित्यिक डॉ. शिवभद्रप्पा यांचाही सत्कार करण्यात आला.

: साहित्य अकादमीतर्फे इंग्रजी भाषेतील पहिला भारतीय साहित्यकोश तयार करण्यात येत आहे. त्यात ऋग्वेदापासून आधुनिक कालखंडापर्यंतच्या भारतीय साहित्याचा समावेश असेल. या कोशाचे प्रमुख संपादक श्री. अमरेश दत्त असून प्रा. म. ल. वऱ्हाडपांडे हे मराठीचे सहाय्यक संपादक आहेत.

# पत्रसंवाद

: १ :

हैदराबाद, दि. १८-९-१९८५

स. न. वि. वि.

'भाषा व साहित्य संशोधन खंड २' हा ग्रंथ काल हाती आला. आभारी आहे....या संग्रहात आलेला डॉ. काळे यांचा भाषाविज्ञानविषयक लेख या शास्त्रविषयीच्या त्यांच्या व्यासंगाचा निदर्शक आहे, यात वाद नाही. भारतीय भाषावैज्ञानिकांचे बरेच लेखन मी वाचले, तसे परदेशी पंडितांचेदेखील. तात्त्विक चर्चा सुस्पष्ट करण्यासाठी हे भारतीय पंडित देशी भाषांतून उदाहरणे का देत नाहीत, हे मला न उलगडलेले कोडे आहे. चुकीचा असेल कदाचित परंतु माझा असा समज झाला आहे, की ही पंडित मंडळी अमेरिकन शब्दजंजाळात एवढी गुरफटून गेलेली असतात, की अभिमन्यूप्रमाणेच त्यांनाही बाहेर पडता येत नाही. याचे कारण भारतात जे काही भाषाविज्ञान ज्या स्वरूपात अस्तित्वात होते, त्याचे अध्ययन न करता केवळ परदेशी ग्रंथकारांच्या सामग्रीवर दिलेला भर हे असावे. त्यामुळे विवेचनात भारतीय भाषा व त्यांची स्थितीगती आणि त्यास पोषक असलेले वा नसलेले परदेशी पंडितांचे सिद्धान्त यांचा चोखंदळपणे विचार होत नाही. परिणामतः सारे लेखन प्रतिध्वनीस्वरूप होऊन बसते.

मराठी बोलीसंबंधी ८ खंड डेक्कन कॉलेजच्या विद्यमाने प्रकाशित झाले आहेत. इंग्रजी भाषेमधून हे खंड थोर विद्वानांनी संपादिले असले तरी माझ्या मते ते भाषाविज्ञानाच्याही दृष्टीने सदोष आहेत. विशेष म्हणजे या आठही खंडातील भाषेचे नमुने केवळ एका माणसाकडून घेण्यात आले आहेत. शितावरून भाताची परीक्षा होते हे खरे आहे ते सुगरिणीने शिजविलेल्या भातासंबंधी—सर्वांच्याच हातून शीत आणि भात एकाच पायरीवर येणार नाहीत. त्याचप्रमाणे केवळ एका माणसाच्या ज्ञानावर समग्र 'बोली'ची चौकट उभारणे कितपत युक्त ठरते?

तेलंगणात दूरवर पसरलेल्या मराठी भाषिक शेतकऱ्यांची संस्कृती आणि मराठी बोली यांची सामग्री ३/४ वर्षे खेडोपाडी जाऊन गोळा केल्यानंतर मी अभ्यासास लागलो, तेव्हा बोलींच्या अभ्याससंबंधाने मराठी भाषा किती दरिद्री आहे, याचे ज्ञान झाले. त्यानिमित्ताने भारतीय भाषावैज्ञानिकांचाही धांडोळा घेतला आणि मी अधिक निराश झालो!

अर्थात ग्रंथलेखन करताना शेवटी मला परदेशी विद्वानांनी केलेला विचार भारतीय परंपरेत घोळवून स्वतःची अशी भूमिका सिद्ध करावी लागली. एवढ्या खटाटोपाला फळ मात्र चांगले लागले. अपभ्रंश आणि मराठी यांच्या सीमेवर संक्रमणावस्थेत असलेल्या एक हजार वर्षापूर्वीच्या मराठी भाषेचे स्वरूप निश्चित करण्यात मला यश लाभले. "तेलंगणातील अरे मराठा : भाषा आणि संस्कृती" हा सुमारे ७/८ वर्षांच्या अव्याहत परिश्रमांतून सिद्ध झालेला ग्रंथ साहित्य-संस्कृती मंडळ प्रकाशित करील, तेव्हा जाहीर चर्चा होईलच."

—डॉ. श्री. रं. कुलकर्णी

: २ :

कोल्हापूर, दि. १९-९-१९८५

स. न. वि. वि.

'पत्रिके'चे संपादक व एक जिव्हाळ्याचे स्नेही या दोन्ही पातळ्यांवर हे पत्र.. १ ते ६ एप्रिल १९८६ रोजी जर्मनीत वेस्ट बर्लिन येथे भरणाऱ्या 'वर्ल्ड शेक्सपियर काँग्रेस'मध्ये शेक्सपियरची नाटके व समीक्षा या संदर्भात आठ विभागात फक्त १२० शोधनिबंध निवडक निमंत्रितांकडूनच सादर करण्यासाठी निवडण्यात आले आहेत. त्यात नॉन इंग्लिश स्पीकिंग कंट्रीज पैकी, भारतातील माझा पाचव्या नंबरच्या सेमिनारसाठी 'Images of 'King Lear' in Marathi (India)' हा शोधनिबंध निवडण्यात आला असून बर्लिनला हजर राहावे, अशी पत्रे 'शेक्सपियर असोसिएशन ऑफ अमेरिका' व 'इंटरनॅशनल शेक्सपियर असोसिएशन, इंग्लंड' यांच्याकडून चार दिवसांपूर्वीच आली आहेत. 'वर्ल्ड शेक्सपियर कॉंग्रेस' दर पाच वर्षांनी फक्त एकदाच भरते. शेक्सपियर समीक्षेच्या नव्या वाटा धुंडाळणे, तिला वळण लावणे हे तिचे ध्येय असते.

माझी निवड हे मलाच स्वप्न वाटते. बहुधा माझे Creative Writing व पीएच. डी. प्रबंधाचा, 'Western Influence on Marathi Drama 1818-1947' हा विषय या दोन्ही गोष्टी जबाबदार असाव्यात... विशेष म्हणजे मला यू. जी. सी. ची टीचर फेलोशिप तीन वर्षांकरिता मिळाली, ती या विषयाच्या नाविन्यामुळे. तसेच मराठी धर्म, भाषा, संस्कृती व कला याबाबतचे संदर्भ इंग्लंडमधील अप्रकाशित हस्तलिखितांतून जमा करून प्रबंधात वापरावे, अशी एक योजना फळास आली व जर्मनी, फ्रान्स, इंग्लंड असा ४० दिवसांचा दौरा आकारास येत आहे...."

—प्रा. आनंद पाटील

अनुक्रमणिका



## महाराष्ट्र साहित्य परिषद पारितोषिक १९८५

# साहित्य परिषदेच्या सभासदांना आवाहन

महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या स्थापनेला २७ मे १९८६ या दिवशी ८० वर्षे पूर्ण होत आहेत. त्या निमित्त सर्वोत्कृष्ट वाङ्मयीन कामगिरीबद्दल दरवर्षी एका मराठी साहित्यिकाला रु. २०००|– चे 'महाराष्ट्र साहित्य परिषद पारितोषिक' आणि मानचिन्ह देण्याचा नवा उपक्रम साहित्य परिषदेने जाहीर केला आहे. या योजनेतील पहिले पारितोषिक २७ मे १९८६ या परिषदेच्या ८० व्या वर्धापनदिनी समारंभपूर्वक देण्यात येणार आहे. या पहिल्या पारितोषिकासाठी १९८५ या वर्षात (१ जानेवारी १९८५ ते ३१ डिसेंबर १९८५) सर्वोत्कृष्ट वाङ्मयीन कामगिरी केलेल्या साहित्यिकाची निवड करायची आहे. ही निवड करण्यासाठी साहित्य परिषदेने सात सदस्यांची एक परीक्षक समिती नियुक्त करण्याचे योजिले आहे.

वरील पारितोषिक महाराष्ट्र साहित्य परिषदेचे असल्याने परिषदेच्या बहुसंख्य सभासदांचे मत पारितोषिक-योग्य साहित्यिकाची निवड करताना परीक्षक समितीपुढे येणे उचित ठरणार आहे. म्हणून १९८५ च्या पारितोषिकासाठी १९८५ सालातील वाङ्मयीन कामगिरीच्या दृष्टीने गुणानुक्रमे सुयोग्य वाटतील अशा तीन साहित्यिकांची नावे परिषदेच्या सभासदांनी, ३१ जानेवारी १९८६ पूर्वी, कार्याध्यक्ष, महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळक रस्ता, पुणे ४११०३० यांच्याकडे पत्राने कळवावी, अशी विनंती आहे. सभासदांनी केलेली निवड ही परीक्षक समितीवर बंधनकारक नसली तरी समितीला ती मार्गदर्शक ठरण्याची शक्यता आहे.

१९८५ च्या पारितोषिकासाठी जास्तीत जास्त संख्येने आपली निवड कळवून परिषदेचे सभासद परिषदेच्या या नवीन उपक्रमात सहभागी होतील, असा विश्वास वाटतो.

कार्याध्यक्ष
**महाराष्ट्र साहित्य परिषद**





अनुक्रमणिका

# बंधारा

शंकर पाटील

पुणे–बेंगलोर रोडवरील वाई–महावळेश्वरला जाणाऱ्या रस्त्यावरला एक लहानसा फाटा. पुण्याहून वाईला जाणारी रात्रीची शेवटची एस. टी जाते आणि त्या फाट्यावरील 'जयहिंद' ह्या एकुलत्या एक हॉटेलचा मालक किशाबापू आवराआवर करू लागतो. तो आधी स्टोव्ह बंद करतो; तशी फुसकन् हवा जाताच फर्रर्र असा एकसारखा होणारा आवाज एकाएकी बंद पडतो आणि एकदम सामसूम व्हावं तसं होतं. कानात घुमणारा तो नाद नाहीसा होऊन कान मोकळे होतात. नीरव शांतता पसरते. मग खांबाला टांगलेला कंदील घेऊन किशाबापू गल्ल्याजवळ येतो. कंदील टेबलावर ठेवून खण ओढतो आणि गल्ला मोजू लागतो. मळक्या नोटा दिव्याच्या तोंडाला धरून तीनतीनदा न्याहाळून बघत त्यांची चवड करतो. मग सगळा खुर्दा काढून टेबलावर ठेवतो. अधेल्या, पावल्या, दहा, वीस पैशांची नाणी अलग अलग करून ती मोजण्यात तो गर्क होतो मग तो सगळा खुर्दा आणि नोटांचं पुडकं एका पाकिटात घालून ते पाकीट आपल्या कुडत्याच्या आतल्या कोपरीच्या खिशात ठेवून झाल्यावर तो स्टोव्हवरचं पातेलं, टेबलावरची किटली, वाटल्यांचा ढीग हे सगळं उचलून मागच्या मोरीवर नेऊन ठेवतो. कपबशा आवरतो आणि आता दार बंद करून झोपायला मोकळा होणार एवढ्यात एक एस. टी. त्या फाट्यावरच्या हमरस्त्यावर थांबते. आपलं दार बंद करायचं सोडून तो त्या एस्. टी.कडं बघत राहतो.

तिशीपस्तीशीचा एक तरुण आपल्या दोन्ही हातांत दोन मोठ्या थैल्या घेऊन त्या एस. टी.तून खाली उतरतो. गाडी निघून गेल्यावर तो उतारू हातातलं सामान खाली ठेवून एकदा आजूबाजूला बघतो आणि पुन्हा सामानाच्या त्या थैल्या उचलून थेट त्या हॉटेलवरच येतो. तो जवळ आल्यावर किशाबापू म्हणाला, "पावणं आताच हाटेल बंद झालं हो."

"हॉटेल बंद झालं तरी ही पडवी मोकळी हाय न्हवं? एक तास घंटा हितं पडवीला थांबायला मिळालं म्हंजे झालं."

"त्याला कुटं अडकाठी हाय? एकाला चार तास थांबाकी."

"मग ग्या जरा पाणी... चूळबीळ भरतो." असं म्हणून तो पुढं झाला. आता काही इलाजच राहिला नाही. किशाबापूनं आत जाऊन पाण्यानं भरलेला एक जर्मनी जग आणून दिला. मग त्या पडवीतनच बाहेरच्या अंगाला वाकून त्यानं हातावर पाणी घेऊन तोंड धुतलं. खळाळा चार-पाच चुळा भरल्या. वर मान करून धार तोंडाला लावली. घटाघटा पाणी प्याला आणि मग जग परत देऊन नेसूच्या धोतरानं तोंड पुसत विचारलं, "आता बावधनला जायाला गाडी कधी सापडंल?"

"बावधनला? आता कुठली हो गाडी?"

"आता गाडी न्हाई?"

"शेवटची वाई गाडी गेली की आता धाला."

"मग आत्ता हो!"

"आत्ता काय, ट्रकबिक गावला तर बघा."

"हा, तीच आपल्या हक्काची एस.टी. म्हणायची."

सहज विचारणा करावी म्हणून किशाबापू म्हणाला, "असं अवेळी कसं आला?"

त्याबरोबर त्याचा चेहरा समाधानानं उजळला. त्याला निमित्तच मिळालं. त्यानं लगेच एका थैलीत हात घालून पेढ्यांचा एक बॉक्स बाहेर काढला आणि त्याचं टोपण काढून अख्खा बॉक्स पुढं करून बोलला, "करा तोंड गोड."

किशाबापूनं त्यातला एकच पेढा उचलला हे बघून तो म्हणाला, "अहो घ्या. घ्या की आणि."

त्यानं आग्रहच केला तसा आणखी एक पेढा घेत किशाबापू म्हणाला, "हे पेढं कशाचं म्हणायचं?"

" बसा सांगतो." असं म्हणून त्यानं स्वतः बसलेल्या बाकड्यावर शेजारी हात आपटून बसण्याची खूण केली. पेढा अजून हातात होता, किशाबापू दार सोडून पुढं झाला आणि पडवीतल्या बाकड्यावर त्यानं हातानं दाखवलेल्या जागी शेजारी बसला, तसा पेढ्यांचा बॉक्स आणखी पुढं करत तो म्हणाला, " अहो घ्याकी आणि."

" बास. पुरं की."

मग स्वतःच आणखी एक पेढा त्याच्या हातावर ठेवून तो बॉक्स थैलीत ठेवत म्हणाला, " ज्योतिबा पावला—त्याच्या कृपेनं मुलगा झाला बगा! लगीन हून तेरा सालानं!"

" अरे वा-वा-वा! चांगली... "

" वा का लिका?" कानावर शब्द आले आणि किशाबापूनं तोंडातले शब्द तोंडातच ठेवून मागं वळून बघितलं—आपल्या नको त्या वयात गळ्यात पडलेली घोरपड दारात बघून तो हादरलाच. कचवचत म्हणाला, " आलो आलोच की,"

" काय आलो....? उटा आधी."

आता लगेच उठलं तर बरं, न्हाईतर ही बया बगलेला हात घालायला कमी करायची न्हाई, हे ओळखून किशाबापू म्हणाला, " बरं हाय, सकाळी आणि चार-साडेचारला उटावं लागतं... जातो पडतो जातो..." असं म्हणून तो उठला आणि दार बंद करून घेता घेता म्हणाला, " बसा, पडवीला आराम...ईल एकादा ट्रक आता."

आतनं दार बंद झालं. बाकड्यावर बसलेला उतारू बघतच राहिला. त्याला फुदकन हसूही आलं; पण हसू दाबत तो बाहेर रस्त्याकडं बघू लागला आणि साताऱ्याहून पुण्याकडं जाणारा एक ट्रक त्या हमरस्त्यावर थांबला. त्यातून मध्यम वयाचा एक पांढरपेशी माणूस खाली उतरला. ट्रक निघून जाईतोवर तिथंच थांबला. तो गेल्यावर आवती-भोवती बघून तोही त्या हॉटेलच्या दिशेनं येऊ लागला. एकएक पाय उचलत सावकाश येत होता. जावं का थांबावं, अशा विचारात असावा. एवढ्यात त्या पडवीतनंच त्याला हाक आली—

" या पावणं कुटं निघालाय?"

अवचित शब्द कानावर आल्यामुळं तो दबकला. चालता चालता थांबला आणि हॉटेलच्या त्या पडवीकडं बघून म्हणाला, " कोण ते?"

" कोण असतंय? तुमच्यागतच हाय हो. कुठं जायचंय?"

थोडं पुढं होऊन तो म्हणाला, ' जायचंय बावधनला.' हे ऐकून पहिल्या उतारूला आनंद झाला. तो म्हणाला,

" या...या, बसा हितं. मलाबी बावधनलाच जायचंय एकांदी ट्रकत्रिक ईल म्हणून बसलोय वाट बघत. बरं झालं सोबत गावली."

मग तो जवळ आला. त्यांच्या हातात फक्त एक लहानशी बॅग होती. ती बाजूला ठेवून तो त्याच्या शेजारी बाकड्यावर बसला.

" कुठनं आला?"

" सातारा."

" मग ट्रकनं का आला?"

" मिळेल ती गाडी धरली."

" साताऱ्यानं पुण्या-मुंबईला जाणाऱ्या रग्गड रातराण्या हैत की," यावर तो काही बोलला नाही. नजर बाहेर लावून तो बसून राहिला. मध्येच आठवण व्हावी तसं तो म्हणाला, " ट्रक मिळेल ना?"

" न मिळायला काय झालं? वाई-महाबळेश्वरकडं जाणारं ट्रक काय कमी हैत का?"

एक सुस्कारा सोडून तो पुन्हा बाहेर पाहू लागला. त्याची नजर अंधारात बुडून गेली. सोबत गावली या आनंदात पहिल्या उतारूनं थैलीतला पेढ्यांचा बॉक्स काढला आणि त्याचं टोपण काढून तो पुढं करत म्हणाला, " घ्या पेढं. करा तोंड गोड."

झोपेतून दचकून जागं व्हावं तसं वळून बघत तो म्हणाला, " अंऽऽ काय?"

" अहो पेढं हो— करा तोंड गोड. पुत्ररत्न झालं आम्हाला! लगीन हून तेरा सालांनी."

तो भरड आवाजात कसंबसं म्हणाला, "नो थँक्स... पेढे चालत नाहीत."

" काय डायबेटीस का काय म्हंत्यात ते हाय का?"

" हो तसंच.... "

" मग कायच गोड चालत नसल?"

" हो ना... "

" मग न्हाऊ द्या." असं म्हणून त्यानं त्यातला एक पेढा आपल्या तोंडात टाकला आणि बॉक्स परत थैलीत ठेवून म्हणाला, " बावधन गाव काय तुमचं?"

" होय."

" मग कोन कोन हैत घरात?"

" आई, मोठा भाऊ, वहिनी, भावाची मुलं...."

" आणि वडील ? "

" वडील जाऊन पाच वर्षं झाली."

" म्हंजे आता वडीलधाऱ्यांपैकी एकटी आईच म्हायलीया म्हणा की ! "

यावर तो काही बोलला नाही. मान वळवून दुसऱ्या बाजूला बघत राहिला आणि खिशातला रुमाल काढून तो नकळत डोळ्याला लावला; आणि प्रश्न कानांवर आला, " बावधनचं कोण म्हणायचं तुम्ही ? "

" देसाई."

" घरात शेतीवितो असल ? "

" आहे की."

" मग साताऱ्याला आपुन काय उद्योग करता ? "

" मी ? "

" व्हय, तुमीच की ? "

" मी प्राध्यापक आहे."

" म्हंजे मास्तर ? "

" हूं " असं म्हणून प्राध्यापक बाहेर बघत राहिले. एवढ्यात एका गाडीचा प्रकाशझोत त्या फाट्यावर पडला. दोघंही बघत राहिले. एक ट्रक पुण्याच्या दिशेनं आला. आणि साताऱ्याकडं भरधाव निघून गेला.

" आयला ट्रक आला न्हाई की हो." असं हळहळून झाल्यावर बोलण्याचा पहिला धागा पुन्हा उचलत तो म्हणाला, " तुमी शिकल्यासवरल्याली मानसं. एक इचारू का ? "

" काय ? "

" तुमचा देवाधर्मावर इश्वास हाय का न्हाई ? "

" मी मूर्तिपूजा आणि कर्मकांड, व्रत वैकल्यं असलं काही मानत न्हाई."

हे ऐकून त्याच्या मनानं चांगलीच उचल खाल्ली नवा हुरूप यावा तसा तो बोलू लागला, " मग ऐका. एकुणिशे बाहत्तरला माझं लगीन झालं तवा वीस बावीस वयाचा बांड गडी होतो. बायकुलाबी लगीच पदुर आला; पर देव पोटाला फळ दीना. अहो, एक नाही, दोन न्हाई अशी सताठ सालं गेली. आमच्या मागनं लगीन हून लोकासनी पोरं हू लागली. अहो वांझुटं म्हणू लागली मानसं आमाला आणि चार सालं गेली आणि मग एक गुरू भेटला–त्यो म्हणाला–पूर्व जन्मी तुम्ही नाग मारल्यात. अमकं अमकं कर आणि जोतिबाला खेटं घाल. त्याप्रमाणं केलं. एक वरीसभर जोडीनं खेटं घातलं आणि सांगायचं नवाल म्हंजे शेवटच्या खेट्यालाच बायकूची पाळी चुकली–न्हायली की पोटुशी ! कालच्या पुनवेलाच बघा बाळंत झाली– पुत्ररत्न झालं ! मग का मानूने देव आमी ? " असा सवाल करून त्यानं पाया-जवळची एक थैली वर बाकड्यावर घेतली. त्यात हात घालून तळ चाचपडला आणि स्टेनलेसचा डबा काढून त्याचं टोपण उघडलं. त्यातनं रुप्याचे दोन डोळे काढून त्याला दाखवत तो म्हणाला, " हे बघा, देवाला म्हणून मुद्दाम घडवून आणल्यात–रुप्याचं डोळं ! घ्या की हातात. हैत का न्हाईत घनसर ? "

त्यानं ते डोळे हातात घेऊन पाहिल्यासारखं केलं आणि ते परत दिले. ते डब्यात ठेवत तो म्हणाला, " रुपय साडेचारसे पडले ! जाईनात का, पर देवानं वंशाला दिवा दिला ! " असं म्हणून त्यानं एक चौकोनी, चपटी, मखमली डबी काढली आणि ती उघडून दाखवत म्हणाला, " ही बगा साखळी केलीया दीड तोळ्याची. पदक कसं हाय ? हाय का न्हाई झकास ? स्वस्तिक हो, आपल्या धर्माचं चिन्ह आणि ही अंगठी आपली तीन भाराची नाजूक..."

दागिने दाखवून झाले तरी तोंडाची टकळी थांबली नाही. दुसऱ्या थैलीतनं कपडे काढले आणि ती खरेदी दाखवत तो बोलू लागला, " बगा ही अंगडी-टोपडी... अहो, नवसासायासानं झालाय मग हौस नको करायला ? हयो, लोकरीचा बाबासूट बघा. पंचावन्न रुपयचा हाय हं हयो ! आमच्या गावातल्या साळत एक बाई हाय– देशपांडे. त्यांनी विनलाय. काय झक्कुबाज डिझाईन काढलंय बघा की ! "

कपडे दाखवून झाले आणि मग एका थैलीतला एक मोठा डबा बाहेर काढून त्याचं तोंड उघडलं आणि त्यातनं एक लाडू काढून त्यांना देत म्हणाला,

" घ्या, डिंकाचा हाय. आईनं मुद्दाम सुनेसाठी करून दिल्यात. बाळंतीणीची कंबरबी घट्ट येती आणि पोराला दूधबी मायंदाळ ! अहो घ्या की... अरं त्याच्या तुमाला हे गोड चालत न्हाई का..." असं म्हणून त्यानं पुढं केलेला लाडू परत त्या डब्यात ठेवला. तो डबा पुन्हा थैलीत ठेवत म्हणाला, " थांबा हं, तुम्हाला एक वस्तू अशी दावतो. कशी अगदी बगण्या लायक ! " असं म्हणून दुसऱ्या थैलीतनं एक पुठ्याचा बॉक्स काढला. त्यातून पाळण्यावर बांधायचं एक मोठं गोल फिरणारं प्लॅस्टिकचे हत्ती, घोडे असलेलं खेळणं काढलं. त्याला कुर्र कुर्र करून चावी दिली आणि ते खेळणं खिळ्याला

टांगावं तसं आपल्या एका हाताच्या बोटाला टांगून अंतराळी धरलं तसं ते गोल गोल फिरत राहिलं. लहान मूल ते पाहून आनंदून जावं तसा त्याला आनंद झाला. निरागस हसत तो म्हणाला, " बघा किती वेळ फिरतंय! पाच मिनिटं फिरतच न्हातंय."

खेळणं फिरत होतं; आणि ते फिरवून दाखवणाऱ्याच्या डोळ्यात वात्सल्याचा आनंद उसळत होता. तो पाहून त्या सहप्रवाशाचे डोळे तरारले. आपल्या खिशातला रुमाल काढून तो आपले डोळे टिपत म्हणाला,

" किती हौशी आहात हो ? "

" तुम्हाला अजून कुटं सगळं दावलंय ? " असं म्हणून बाकीची खेळणी तो काढू लागला. त्यात वाघ, सिंह, हत्ती, घोडे असे प्राणी होते. ' चुंई चुंई ' असा आवाज काढणाऱ्या बाहुल्या होत्या. तीन चार प्रकारचे खुळखुळे होते. आणि हे सारं किती दाखवू आणि किती नको असं त्याला झालं होतं ते त्याच्या चर्येवर स्पष्ट दिसत होतं. चेहऱ्यावरचा तो भाव पाहणाऱ्याला जाणवत होता. त्या सहप्रवाशालाही तो जाणवला आणि त्याला बरं वाटावं म्हणून त्यातलं एकेक खेळणं त्यानं मुद्दाम उचलून हातीही घेतलं. ही सर्व खेळणी पाहून झाली. मग एकेक खेळणं तो नीट त्या बॉक्समध्ये ठेवू लागला आणि वाट पाहून कष्टी झालेला तो प्रवासी लांबवर नजर टाकत स्वतःशी बोलावं तसं म्हणाला, "केव्हा येणार ट्रक ? ती केव्हा येणार आणि आपण केव्हा जाणार ? " धीर देत दुसरा म्हणाला, " ईल हो, का काळजी करता ? "

" बारा वाजून गेले ना ! "

" जाईनात... आता आपुन एकटं हाय का ? कसं झालं तरी दुकटं आहोत. एकाला दोघं असल्यावर बोलण्यात वेळ जातोय हो. त्याचं काय एवढं ! "

एवढयात प्रकाशझोत समोरच उजळला. डोळे एकदम दिपले. बसल्या बाकड्यावरून लांबवर बघत एक जीव मनातल्या मनात ट्रकचा धावा करू लागला. प्रकाश जवळ आला. धावणाऱ्या गाडीचा आवाजही मोठा होत कानावर येऊ लागला. वाई–महाबळेश्वरचा तो फाटा प्रकाशानं गिळून टाकला आणि पुढच्याच क्षणी फाटा मागे अंधारात ठेवून प्रकाश भरधाव सुसाटत पुणेमार्गे पळून गेला. मन सुन्न होऊन गेलं. कपाळ घामानं ओलं झाल्यासारखं वाटलं म्हणून त्यानं खिशातला रुमाल बाहेर काढला आणि सोबती त्याला म्हणाला,

" खिशातनं कसला कागुद बाहेर पडला बघा."

त्यानं पाहिलं आणि तारेचा तो कागद हातात घेऊन गुपचूप पँटच्या खिशात ठेवून दिला. त्या तारेची आठवण होताच मन पाखरू होऊन भरारलं आणि बावधनला जाऊन पोचलं. आईनं पोटाशी धरून आलवेला घेतला, कानशीलांवर बोटं मोडली आणि कानांवर नको तो प्रश्न आला, " मुलाचं नाव काय ठेवावं ? "

भानावर आल्यागत करून त्यानं विचारलं, " हं... काय म्हणता ? "

" न्हाई म्हटलं पोराचं नाव काय ठेवावं ? "

" तुम्हांला जे आवडेल ते ठेवा."

" तुम्ही शार गावात न्हाता. सुचवा की जरा झकास कायतरी."

" विचार करतो," असं म्हणून त्यानं वेळ मारून नेली आणि कुठंतरी शून्यात बघत घोर चिंता, काळजी, धास्ती ह्या डोहात तो बुडून गेला. थोडी वाट पाहून त्यानं विचारलं, " काय सुचतंय का ? "

तो बोलला, " नाही हो, काही सुचत नाही."

" अजून इचार करा. ट्रक येईतोवर आपल्याला काय काम ? "

यावर थोडा वेळ गेला आणि एकदम काहीतरी सुचल्यासारखं करून तो म्हणाला, " तुमच्या त्या गावसकरनं आपल्या पोराचं काय नाव ठेवलंय ? "

" मला माहीत नाही."

" कायतरी राहूल का काय असं हाय हो ? "

" मला कल्पना नाही."

एवढ्यात लख्खन प्रकाशाचा एक पट्टा समोरच झळकला. हॉर्नही कानांवर आला, आणि पाठोपाठ एक ट्रक हमरस्त्यावरून वाई-महाबळेश्वर फाट्यावर आली. या दोघांनीही हात केले. ट्रक उभी राहिली. कुठं जाणार, काय अशी चौकशी झाल्यावर त्या दोघांनाही फ्रंटसीटला बसवलं.

दोन अडीच तास वाट बघितल्यावर रात्री साडे-बाराला ट्रक मिळाली. एक काळजी मिटली आणि दुसरी मनात दाटू लागली... केव्हा ट्रक थांबला हे कळलं नाही. ते कळायला मन शुद्धीतच न्हवतं.

दोघेही खाली उतरले. मुख्य रस्त्यापासून गाव थोडं आड बाजूला होतं. काही अंतर चालावं लागणार होतं. दोन्ही हातांत थैल्याचं ओझं असून एकाला केव्हा

पोचीन असं झालं होतं. आणि दुसऱ्याच्या पावलांतलं सगळं बळच गळून गेलं होतं. घशाला कोरड पडली होती. आवंढाही गिळत नव्हता. वर आलेल्या चंद्राचा प्रकाश खाली सांडला होता; पण डोळ्यापुढं कुणीतरी आडवा पडदा धरावा, तसं झालं होतं. त्याचे पायच उचलत नव्हते. सोबती म्हणाला,

"काहो असं? उचला की झटक्यानं पाय– काय घरची वडबीड काय हाय का न्हाई तुमाला?"

काय बोलणार? तो मुक्यानंच चालत राहिला. गाव जवळ आलं. वेस दिसू लागली, तशी चौकशी केली, "साहेब, आपलं घर गावात कुठं हाय?"

"पेठेतच."

"आमची सासुरवाडी पेठ सगळी वलांडून गेल्यावर त्या शिरकाईच्या देवळाजवळ हाय." वेस जवळ आली. बोलणं कळेना झालं. त्या कशात लक्षच नव्हतं. शब्द कानांवर पडत होते; पण अर्थ आत शिरत नव्हता.

पेठ आली आणि लांबूनच दंगा कानांवर आला. त्याचे पाय ठेचाळल्यासारखे झाले. गळा हुंदक्यांनी दाटून आला. अंग सारं गदगदल्यागत झालं. हे बघून सोबत्यानं विचारलं, "काय हो काय झालं?"

त्याला बोलता येत नव्हतं. धड उभंही राहता येत नव्हतं. आधाराविना पाऊल उचलत नव्हतं. त्यानं कसाबसा त्यांच्या खांद्यावर हात टाकला. एका हाताचा तळवा आपल्या तोंडावर ठेवला आणि कमेनं पाय उचलत राहिला.

घर जवळ आलं. त्याचीच वाट बघत असलेला थोरला भाऊ त्याला बघताच हंबरडा फोडून आडवा झाला, गळी पडून हुंदके देत म्हणाला, "तुझ्यापायी आईनं जीव धरून ठेवला होता: एक अर्धा घंटा आधी आला असतास तर भेट झाली असती..."

गदगदल्या, दबल्या आवाजात 'आई' असं म्हणून आपल्या भावाच्या मिठीतून तो बाजूला झाला आणि घरापुढच्या गर्दीतनं आवेगानं आत घुसला. बंधारा फुटावा तसं घडलं.

अडीच–तीन तासांचा त्याचा सोबती हे सारं थक्क होऊन बघत होता. इतका वेळ बाड बाड करणारी त्याची जीभ लुळी झाली. हातातलं ओझं पेलेना झालं. गेलं माणूस कुणाचं कोण;पण त्याचा गळा दाटून आला. हुंदके अनावर होऊन आवर कसा घालावा हे कळेना झालं. तो तिथंच थोडा वेळ उभा राहिला. कढ जाऊ दिला आणि जड पावलं उचलत पुढं निघाला. ■

# चक्रव्यूह

## सुरेश वेंगुर्लेकर

इन्स्टिटयूटच्या परिसरातील माझी नेहेमची सकाळची राउंड संपवून मी माझ्या केबिनमध्ये शिरलो नाही तोच माझ्या टेबलावरचा इंटरकॉम वाजला.

माझी सेक्रेटरी सूझा लाइनवर होती.

'गुड मॉर्निंग सर !'

'मॉर्निंग.'

हेडक्वार्टर्सवरून एम्‌डींचा फोन होता सर. ही हॅज कॉंग्रॅच्युलेटेड यू ॲण्ड अदर्स.'

'सरप्रायजिंग ! इतक्या थोड्या वेळात बातमी मुंबईलाही पोहोचली ?'

'दॅट वे ही वॉज नॉट अवेअर ऑफ द गुड न्यूज सर. सिन्स ही वॉज ऑन द लाइन आय मेड द अपॉर्च्युनिटी. द बिग बॉस वॉज व्हेरी मच डिलायटेड विथ द न्यूज ॲण्ड रिस्पॉण्डेड विथ अ फेलिसिटेशन मेसेज फॉर यू सर.'

'थँक्यू सू. कमॉन नाऊ बी क्विक ॲंड टेल मी. फोन कशासाठी होता ? यू शुड हॅव सेंड मी अ वर्ड...'

'मी तुम्हाला निरोप पाठवणारच होते सर. बट एम्‌डी हिमसेल्फ डिप्राइव्ड मी फ्रॉम द थॉट. म्हणाले... आय नो ही मस्ट बी टेकिंग हिज युज्वल मॉर्निंग राउंड इन द प्रिमायसेस अलॉंग विथ मिसेस श्रीवास्तवा. यू नीड नॉट डिस्टर्ब हिम. यू जस्ट नोट द इन्स्ट्रक्शन्स ॲण्ड कॉम्युनिकेट टू युवर बॉस लॅटर.'

'आता एम्‌डीच असं म्हणाल्याने माझा नाइलाज झाला सर. बाय द वे इटस युवर टाइम फॉर कॉफी सर. आय विल अरेंज युवर कॉफी फर्स्ट ॲण्ड...'

'मिस डिसूझा यू विल कॉम्युनिकेट टू मी एम्‌डीज इन्स्ट्रक्शन्स फर्स्ट !'

एक एक शब्द स्पष्ट नि सुटा सुटा उच्चारत मी म्हणालो.

डिसूझाचा नाइलाज झाला. एमडीच्या इन्स्ट्रक्शन्स मग तिने मला जशाच्या तशा कॉम्युनिकेट केल्या.

डिसूझा म्हणजे तीच. माझी सेक्रेटरी...सूझा !

नॉर्मली मी तिला सूझा म्हणतो. खुशीत असतो तेव्हा फक्त सू म्हणतो. मात्र कोणत्याही कारणामुळे मी डिस्टर्ब्ड असलो की केवळ डिसूझा असा तिच्या नावाचा मी सरळ साधा उच्चार करतो.

या क्षणी मी तिचा डिसूझा असा उल्लेख केला याचाच अर्थ कालच्या एवढ्या सुंदर दिवसानंतर आज सकाळी सकाळीच माझा मूड खराब व्हावा असं काही तरी घडून राहिलं होतं.

मे आय अरेंज युवर कॉफी फर्स्ट असं डिसूझा म्हणाली तेव्हाच मला त्याचा वास आला. म्हणूनच मी तिला म्हणालो आधी मला एम्‌डींच्या ज्या काही इन्स्ट्रक्शन्स आहेत त्या सांग.

माझ्यासाठी एम्‌डींच्या इन्स्ट्रक्शन्स अशा होत्या.

आज शनिवार असला तरीही मी इन्स्टिटयूट सोडून संध्याकाळी पुण्यात वगैरे जाऊ नये. संध्याकाळपर्यंत मुंबईतल्या कुणा जरनॅलिस्टसह मुक्कामासाठी एम्‌डी इन्स्टिटयूटच्या रेस्ट हाऊसवर पोहोचणार होते.

मेन्टेनन्स स्टाफ पैकी रेस्टहाऊसचा खानसामा गुरशरण नि माळ्यांपैकी सूर्यभान भानुशाली यांनाही मी थांबवून घ्यावं अशा सूचना होत्या.

वस्तुतः एम्‌डी ज्या कामगिरीवर निघाले होते तिचा आमच्या या रिसर्च इन्स्टिटयूटशी काहीही संबंध नव्हता. पिग्माच्या बंगलोर फॅक्टरीतून तयार होणाऱ्या प्रॉडक्ट्‌सना, ॲड एजन्सिज मार्फत देण्यात येणाऱ्या रूटीन पब्लिसिटी व्यतिरिक्त काही डिग्निफाईड प्रेस पब्लिसिटी मिळावी अशी पिग्माच्या मालक मंडळींची इच्छा होती. गगराट फॅमिलीपैकी सुंदरदास गगराट या पिग्माच्या एका नव्या पार्टनरची बिझनेस वर्ल्डला ओळख करून देण्यासाठी एम्‌डीच्या देखरेखीखाली हा खास पब्लिसिटी कॅम्पेन अरेंज करण्यात येत होता. त्यासाठी खरं तर एम्‌डींनी त्या कुणा जरनॅलिस्टला घेऊन मुंबईहून सरळ

एअरवेजने बंगलोर गाठायचं. पण एम्डींनी अलीकडे काही नवीनच पद्धती पाडायला सुरवात केली होती. पाहुण्याला पुरेसं विश्वासात घ्यायचं असेल, पिग्मासाठी त्याच्याकडून काही खास इन्टरेस्ट साध्य करून घ्यायचा असेल, तर अशा माणसांना रिसर्च इन्स्टिट्यूटच्या रेस्ट हाऊसवर व्ही. आय. पी. ट्रीटमेन्ट देऊन खूश करायची नवीच टूम एम. डी. नी. काढली होती. ही व्ही. आय. पी. ट्रीटमेन्ट पुष्कळदा डबल डब्ल्यू टाइप असायची. सिंगल डब्ल्यू, डबल डब्ल्यू हे व्ही. आय. पी. ट्रीटमेन्ट संबंधातील सूचनांचे कोडवर्ड्स होते. सिंगल डब्ल्यू म्हणजे, 'ट्रीटमेन्ट विथ वाइन.' आणि डबल डब्ल्यू म्हणजे, 'ट्रीटमेन्ट विथ वाइन ॲण्ड वूमन' बिझनेस वर्ल्डमध्ये आपला गोल साधण्यासाठी या अशा मेथडस् वापरल्या जातात हे काही मला नव्याने समजत नव्हतं. पण त्यासाठी हवी तेवढी फाइव्ह स्टार हॉटेल्स पडली होती. काय झक मारायची ती तिथे जाऊन त्यांनी मारायची होती.

पिग्मा फूड आणि फार्मासिटिकल प्रॉडक्टस् तयार करत होती. नवनवी प्रॉडक्टस मार्केटमध्ये आणण्यासाठी ही रिसर्च इन्स्टिट्यूट म्हणजे पिग्माचा आत्मा होता. इथल्या कामासाठी टोटल इन्व्हॉलमेन्ट ही अत्यंत महत्त्वाची गरज होती. तेवढ्याचसाठी शहराच्या गजबजाटापासून दूर, सर्व त्या अत्याधुनिक सोयींनी परिपूर्ण अशी रिसर्च इन्स्टिट्यूटची वास्तू उभारण्याचा निर्णय पिग्माच्या मालक मंडळींनी घेतला होता. त्यासाठी खूप शोध घेऊन पुणे नासिक रोडवरील एका बाजूला असलेल्या भोसरी या गावातील जागा निवडण्यात आली होती. स्टाफवसने फक्त ॲडमिनिस्ट्रेटिव स्टाफ तेवढा पुण्यातून ये जा करत होता. इन्स्टिट्यूटमध्ये काम करणारी बाकी सर्व माणसं इन्स्टिट्यूटच्या कॉलनीतूनच राहात होती. लेबर, सिक्युरिटीस्टाफ यांच्यासाठी बैठ्या क्वार्टर्स होत्या. टेक्निकल ऑफिसर्ससाठी, सुपरवायझरी स्टाफसाठी त्यांच्या त्यांच्या योग्यतेनुसार लहान मोठे फ्लॅटस होते.

शिवाय इन्स्टिट्यूटच्या आवारात एका बाजूला दोन सुंदर बंगले होते. एक इन्स्टिट्यूटच्या चीफ एक्झिक्युटिवसाठी. ज्यात मी वास्तव्य करून होतो.

दुसऱ्यात इन्स्टिट्यूटचं आलिशान रेस्टहाऊस थाटण्यात आलं होतं.

इन्स्टिट्यूटचा सारा परिसर कायम हिरवागार नि ताजा राखण्यात येत होता. इन्स्टिट्यूटचं लहानसं फार्म होतं. स्वतःची छोटीशी डेअरी होती. लहानसं बॉटॅनिकल गार्डन होतं. येताचं पण प्राणिसंग्रहालयही होतं. ज्यात साप, बेडूक, ससे, उंदीर, कुत्रे, माकडं एवढंच नव्हे तर घोड्यापर्यंतच्या प्राण्यांचा समावेश होता. रिसर्चवर्कची गरज म्हणून ते सर्व सांभाळण्यात आलं होतं.

या व्यतिरिक्त मोठ्या कल्पकतेनं मेन्टेन केलेली लॉन्स आणि गुलाबांचा खास प्लॉट !

या सर्वांतून फळं, फुलं नि पक्षांनी एखाद्या आश्रमाचं वातावरण इथं जोपासलं होतं. सात वर्षांपूर्वी चीफ एक्झिक्युटिव म्हणून या इन्स्टिट्यूटचा ताबा मी घेतला तेव्हा इथं होतं आकाशाखाली एक उजाड माळरान. ज्यातून अविरत परिश्रमातून इन्स्टिट्यूटला मी हे स्वरूप दिलं होतं. इथला, हा शांत सुंदर वातावरणातला एकांत, संशोधनाच्या कामासाठी इथल्या माणसांना आवश्यक असलेली एकाग्रता पुरेपूर उपलब्ध करून देत होता. शहरापासून दूर अशा वातावरणात रिसर्च इन्स्टिट्यूट उभारण्यामागे पिग्माच्या मालकांचा तोच मूळ हेतू होता.

पण याच एकांतातलं इन्स्टिट्यूटचं रेस्टहाऊस हे बिझनेस वर्ल्डमधल्या माणसांचं अलिकडे काही निराळंच आकर्षण होऊ लागलं होतं. या रेस्टहाऊसवर व्हिआयपी ट्रीटमेन्ट मिळणं ही गोष्ट भाग्याची, प्रतिष्ठेची वगैरे समजण्यात येऊ लागली होती. इथली 'डबलडब्ल्यू' व्हीआयपी ट्रीटमेन्ट ही श्रीमंतांच्या खाजगीतील विशेष चर्चेची बाब होऊ पाहात होती. फाइव्हस्टार होटेल्समधून होणाऱ्या या व्यवस्थेत नाही म्हटलं तरी आता एक शिळेपणा जाणवू लागला होता. शिवाय कितीही काळजी घेतली तरी पुरेशा सिक्रसीची खात्री नव्हती. त्या पार्श्वभूमीवर रिसर्च इन्स्टिट्यूटमधल्या एकांतवासातील अनुभव खूप फ्रेश होता. उत्तम जेवण आणि उंची मद्य यांचा रात्री उशीरापर्यंत आस्वाद घ्यायचा मग मध्यरात्रीनंतर पहाटेपर्यंत शेतातील गावरान बाई अंगाखाली घेऊन जेवण जिरवायचं. सारा अनुभव मोठाच थ्रिलिंग. पुन्हा सगळा मामला गुपचुप. देर पिऊन निजलेल्या नवऱ्याच्या अंथरुणातूनच रोजच्यासारखी बाई सकाळला उठत होती. रेस्टहाऊसच्या दिशेने पाहात गालात हसत अंगणात शेणी थापताना दिसत होती. उशीरा जाग आलेला पाहुणा गार्डनचेअरमध्ये बसून निरशा दुधाचा ताजा चहा घेत

इन्स्टिटयूटच्या वातावरणाचं कौतुक करत होता. सगळं कसं पुन्हा शुद्ध होतं.

पिग्माच्या पार्टनरशिपमध्ये एक नवा गगराट उदयाला आला होता नि त्याच दरम्यान मॅनेजिंग डिरेक्टर होसमनींनी, रिसर्च इन्स्टिटयूटमधल्या रेस्टहाऊसवरच्या या व्हीआयपी ट्रीटमेन्टच्या फॉर्म्युल्याचा शोध लावला होता. ऐकत होतो एम्डींच्या या नव्या शोधावर ताज्या दमाचा गगराट विशेष खूश होता परिणामी रिसर्च इन्स्टिटयूटच्या रेस्टहऊसची एक निराळीच इमेज सध्या बिझनेस ग्रुपच्या अण्डर-वर्ल्डमध्ये स्थिर होऊ पाहात होती.

त्या एका मर्यादित जगातही ही इमेज स्थिर होऊ देणं रिसर्च इन्स्टिटयूटच्या मूळ कन्सेप्टला बाधा आणणारं होतं. पण त्याहूनही कितीतरी अधिक मोठा धोका अचानक समोर येऊन ठाकला होता. एखादी गोष्ट जगाला जाहीर करणं हाच ज्यांचा पोटापाण्याचा धंदा, अशा माणसाला घेऊनच एम्डी आज इन्स्टिटयूटच्या रेस्टहाऊसवर येत होते. त्याला व्हीआयपी ट्रीटमेन्ट देऊन खरीदण्याचा प्रयत्न करणार होते. जो कोण जर्नलिस्ट येणार होता त्याची मला व्यक्तिगत माहिती नव्हती. तरीही समाज-सेवेचं व्रत म्हणून पत्रकारितेकडे पाहाणारा, स्वातंत्र्यपूर्वकाळातील पत्रव्यवसायाचा प्रतिनिधी तो नक्कीच नव्हता. उलट पत्रकार म्हणून, स्वतःची एक न्यूसन्स व्हॅल्यू निर्माण करून ती एन्कॅश करत हिंडणाऱ्या आधुनिक पत्रकारांपैकी तो कुणी असण्याची शक्यता होती. त्याला खूश करण्यासाठी एम्डी त्याला व्हीआपी ट्रीटमेंट देतील. खूश होऊन बार्गेनिंगमध्ये ठरलेल्या मोबदल्यात बंगलोर फॅक्टरीच्या अचिवमेन्टससंबंधात नव्या गगराटला लाइम लाइटमध्ये ठेवून, पिग्माच्या पदरात तो प्रसिद्धीचं काही माप घालेलही. पण तो एवढ्यावरच थांबेल याची खात्री कुणी द्यायची ? पिग्माच्या रिसर्च इन्स्टिटयूटच्या रेस्टहाऊसचा असा वापर केला जातो हे एकदा प्रत्यक्ष अनुभवल्या-नंतर कधी काळी त्यातूनच काही मसालेदार न्यूज स्टोरी करायची बुद्धी त्याला झाली तर ? ती तसली व्ही-आयपी ट्रीटमेन्ट देण्यासाठी चक्क एका पत्रकाराला इथं घेऊन येण्याचा निर्णय घेताना एवढा मोठा संभाव्य धोका एम्डीना जाणवायला नको होता ?

का तो ठाऊक असूनही उघड्या डोळयांनी एम्डी तो पत्करत होते ? या होसमनींच्या मनात इन्टिटयूटचं काय करायचं आहे समजत नाही. पण तसं काही झालं तर पिग्माला जी डॅमेजीस पोहोचतील त्याला रिसर्च इन्स्टि-टयूटचा चीफ एक्झिक्युटिव म्हणून सर्वप्रथम मलाच सामोरं जावं लागेल. प्रसंगी एम्डी पवित्रा बदलून हेडक्वार्टर्समधल्या आपल्या एअरकण्डिशण्ड ऑफिसमध्ये बसून माझाच जाब मागणारं पत्र डिक्टेट करू शकतील; किंवा कदाचित् पत्र न पाठवता आजच्या सारखाच फोन करून जाब विचारण्यासाठी मला मुंबईला बोलावून घेतील. तसं करतानाही पुन्हा संभावितपणे टेलिफोनवर सुझाला म्हणतील. यू नीड नॉट डिस्टर्ब मि. ही मस्टवी टेकिंग हिज युज्वल मॉर्निंग राऊंड इन द प्रिमायसेस अलॉंग विथ मिसेस श्रीवास्तवा. यू जस्ट टेल हिम, ही इज बॅडली नीडेड हिअर इन द हेड ऑफिस. ज्युनिअर गगराट वॉण्टस हिम. टेल हिम टू स्टार्ट इमिजिएटली.

नि फोन ठेवण्यापूर्वी अत्यंत आस्थेवाइक आवाजात ते माझ्या सेक्रेटरीला म्हणू शकतील...आय विश बेव्री यू आर सेफ इन द हॅण्डस ऑफ मिस्टर श्रीवास्तवा.

कदाचित् तसं काहीही होणार नाही. हे सगळे माझ्याच अतिसावध मनाचे खेळ असतील. मी स्वतःला साव-रण्याचा प्रयत्न केला. तरीही सावध मन मला बजावत राहिलं... तसं काही होणार नाही असं गृहीत धरून तुला निर्धास्त राहाता येईल ?

मी कमालीचा अस्वस्थ झालो होतो.

तेवढ्यात अॅण्टी चेंबरमध्ये कपबशांचा आवाज झाला. सुझा माझ्यासाठी कॉफी तयार करत होती. वाटलं उठून आत जावं. अॅण्टी चेंबरमध्येच सुझाबरोबर कॉफी घ्यावी. वाटलं, पण कसा तो उठायला उत्साहच वाटेना. मोठ्या प्रयासाने हात लांब करून भरून ठवलेला पाण्याचा ग्लास उचलला. घशाखाली पाण्याचे दोन घोट उतरले तसं जरा बरं वाटलं.

सुझा कॉफी घेऊन आली.

माझ्यासमोर कॉफीची कपबशी ठेवून एकदम काळजीच्या स्वरात म्हणाली,

'आर यू सिक सर ?'

नुसतीच म्हणाली नाही. पुढे होऊन तिने माझ्या कपाळावर हात ठेवून पाहिला.

'फिवर नाहीय. पण केवढा घाम आलाय सर तुम्हाला ?'

नि सुझानं ड्रॉवर ओढून त्यातला नॅपकिन घाम

टिपण्यासाठी माझ्या पुढ्यात ठेवला. मग फोन उचलून डायल फिरवत म्हणाली,

'आय विल रिक्वेस्ट मिसेस श्रीवास्तवा टू जॉइन अस फॉर कॉफी...''

तिच्या हातून मी रिसिवर काढून घेतला. पुन्हा फोन-वर ठेवून दिला. पुटपुटलो.

'हाऊ हेस्टिली यू आर डिसायडिंग द थिंग्ज !'

सुझा नुसतीच हुप्प होऊन उभी राहिली.

मग अचानक मीही हळवा झालो. तिचा हात माझ्या दोन्ही हातांच्या ओंजळीत घेतला. क्षणभर त्याकडे नुसताच पाहात राहिलो. मग सुझाला म्हणालो,

'सू, आर यू सेफ इन द हँण्डस ऑफ मिस्टर श्रीवास्तवा ?'

सुझानं माझ्या हातातला हात काढून घेतला नाही. उलट माझ्या डोळ्यात खोल पाहात म्हणाली,

'आय ॲम, ॲण्ड आय विल वी ऑल्वेज सेफ इन द हॅण्डस् ऑफ मिस्टर ॲण्ड मिसेस श्रीवास्तवा. मच मोर सेफ दॅन दॅट ऑफ माय हजबण्ड !'

मी चमकून सुझाकडे पाहिलं.

आधी सुझा खदखदून हसली. मग म्हणाली,

'हे बरोबर नाही सर. आधी आपण एखाद्याला धक्कादायक प्रश्न विचाराचा. त्याची कशी तारांबळ उडते पाहायचं. आणि त्याच्याकडून काही अनपेक्षित उत्तर मिळाल्यावर आपणच असं दचकायचं ?'

'ओ नो सर. उगाच चिंताग्रस्त होऊ नका. मी गुपचुप लग्न वगैरे केलेलं नाहीय. बट वन ऑर द अदर डे आय मे गेट मॅरीड. आता लग्न केल्यानंतर हा नवरा नावाचा प्राणी कसा निघतो पाहायचं. उद्या कदाचित् नाही पटलं त्याचं माझं, किंवा कदाचित् आय फाउंड माय सेल्फ अनसेफ इन हिज हॅण्डस, आय मे क्विट हिज हाऊस इव्हन ॲट मिडनाईट. मात्र अर्ध्या रात्री असं नवऱ्याचं घर सोडून यावं लागलंच तर त्या वेळी मी माझ्या आईच्या घराचं दार ठोठावणार नाही. तेव्हा मी दार ठोठावेन मिस्टर ॲण्ड मिसेस श्रीवास्तवांचं.'

'मला इतकंच म्हणायचंय सर की इतकी मी तुमच्या नि नंदितातांईच्या हाती सेफ आहे.'

माझ्या कपात आणखी थोडी कॉफी ओतून सुझाच पुढे बोलत राहिली. म्हणाली,

'सर कॉफीची पंधरा मिनिटं तुमचा माझ्यावर नाही, माझा तुमच्यावर अधिकार चालेल असा आपला करार आहे. आणि या करारावर पिग्माचं नाही, नंदितातांईचं सील आहे. इन्स्पाइट ऑफ धिस ॲग्रिमेन्ट यू हॅव युटिलाइज्ड दीज अवर्स फॉर पिग्मा ऑन मेनी ऑकेजन्स. आय वॉन्ट यू टू स्पेअर मी मोर टाइम फॉर धिस कॉफी सेशन. तुम्हाला आवडणारी सर्व शिस्त मोडून मी आज वागणार आहे. प्रथम तुमच्याजवळ काही हट्ट करणार आहे.'

एवढं म्हणूनच सुझा थांबली नाही. तिने माझ्या टेबलावरची बेल प्रेस केली. बंगल्यावरचा ऑर्डर्ली कपबशा आवरून, कॉफीचं साहित्य वगैरे घेऊन गेला. तो गेला नि माझा प्यून आत आला. अर्धा तास साहेब कुणाला भेटणार नाहीत वगैरे सूचना तिनेच परस्पर देऊन टाकल्या. टेलिफोन ऑपरेटरलाही तसाच महत्त्वाचा फोन असल्याशिवाय मलाच नव्हे तिलाही डिस्टर्ब न करण्याबद्दल सांगून टाकलं.

तर असा सारा बंदोबस्त करून सुझा म्हणाली,

'सर, एमडींच्या इन्स्ट्रक्शन्स ऐकल्या तेव्हाच, आजच्या संध्याकाळच्या कार्यक्रमाचं काय होणार या विचाराने मीही अपसेट झाले. एमडींच्या इन्स्ट्रक्शन्स ऐकल्यावर तुम्ही डिस्टर्ब होणार हे मीही गृहीत धरलं होतं. पण मी तुमच्या हाती सेफ आहे का असा प्रश्न विचारण्याजोगं काय घडलं आहे ते अद्यापि माझ्या लक्षात आलेलं नाही.'

या वेळपर्यंत मी पुष्कळच सावरलो होतो. सुझाला म्हणालो,

'सू...तू मला म्हणालीस पिग्माचं काहीही काम मी तुम्हाला करू देणार नाही.'

'नाहीच करू देणार.'

'मान्य. पण मग मलाही तुझ्या प्रश्नाचं उत्तर देता येणार नाही. नो, नो. तुझ्यासारखा माझा सत्याग्रह वगैरे नाही. माझं उत्तर पुन्हा पिग्माशी, पिग्माच्या कामाशीच संबंधित आहे, आणि म्हणून ..'

सुझानं ऑर्ग्युमेंट केलं...

'सर मला वाटतं तुम्ही मला विचारलात तो प्रश्न अधिक पर्सनल आहे. पिग्माची त्याला बॅग्राउंड आहे.'

'सुझा मला जरा सांग, काल एवढ्या रात्री अकरा साडे अकरा वाजता मी तुला फोन केला. इट वॉज द मोस्ट पर्सनल टॉक. नंदिताबद्दल तुझ्याकडे अगदी काही व्यक्तिगत भावना व्यक्त करण्यासाठी मी तुला फोन केला.

पण इतक्या पर्सनल बोलण्यातील मुद्दाही एकीकडे पिग्माशी, पिग्माच्या या इन्स्टिट्यूटशीच निगडित होता. करेक्ट ? '

'आत्ताच मी तुला विचारून गेलो. आर यू रोफ वगैरे... मी खूप डिस्टर्ब्ड होतो. त्यामुळेच मी तसा रिॲक्ट झालो. ज्या प्रश्नाने तुलाही डिस्टर्ब केलं. तर माझी काय किंवा तुझी काय ही मानसिक अस्वस्थतताही पुन्हा इन्स्टिट्यूटशीच संबंधित आहे.'

'मला वाटतं सुझा, तुझा माझा मेंदू आपल्या लॅबोटरीत तपासायला नेला तर हे पिग्माचं नि हे आपलं पर्सनल असं कितीसं अलग करता येईल ? '

'टेल मी, अखेर या सर्वाला तू काय म्हणशील ? '

'इट इज अ टोटल इन्व्हॉलमेन्ट सर. इन्स्टिट्यूटच्या कामात इथल्या माणसांनी प्रसंगी स्वतःला विसरून गुंतवून घ्यावं अशीच तुमची, इन्स्टिट्यूटची अपेक्षा आहे.'

'यू हॅव सेड इट सू ! एग्झॅक्टली इट इज सो. माझी ती कमिटमेन्ट आहे. पिग्माला. पिग्माच्या मालक मंडळीतील सिनिअरमोस्ट घनःश्यामदास गगराटना. या इन्स्टिट्यूटचा चीफ एक्झिक्यूटिव म्हणून माझी नेमणूक करण्यापूर्वी त्यांनी मला विचारलं होतं, 'हाऊ मच डू यू बिलीव इन द कन्सेप्ट ऑफ टोटल इन्व्हॉलमेन्ट मिस्टर श्रीवास्तवा ? '

मी त्यांना म्हणालो होतो,

'आय डू बिलीव सर. ॲन्ट इट इज अ बेसिक नीड ऑफ एनी रिसर्च इन्स्टिट्यूट. परंतु मागून मिळणारी ही गोष्ट नाही. इट कॅनॉट बी वन सायडेड. अशा इन्व्हॉलमेन्टसाठी भोवताली तसं वातावरण निर्माण करणं आवश्यक आहे. ते कायम टिकवून धरणं आवश्यक आहे.'

'द सिनिअरमोस्ट गगराट वॉज देन व्हेरीमच एन्स्पायर्ड विथ माय वर्ड्स. आमच्याकडून तुम्हाला काही कमी पडणार नाही. गो अहेड. घनःश्यामदासजींनी शब्द दिला आणि पाळला. त्यांनी त्यांचा. मी माझा. स्वतःला विसरून रिसर्चच्या कामात इथल्या माणसांनी गुंतून पडावं म्हणून त्यासाठी आवश्यक असलेल्या वातावरणासह शहरापासून दूर अशी एका बाजूला इन्स्टिट्यूटची ही वास्तू उभारण्यात आली. पण ज्या हेतूने ही वास्तू अशी एका बाजूला उभारण्यात आली त्या मूळ कन्सेप्टलाच तडा जातोय की काय अशी परिस्थिती निर्माण झाली आहे.

'मला ते दिसतं आहे. पण मी ते बोलून दाखवलं तर टॉप लेव्हलला, मला कोण किती समजून घेऊ शकेल याची शंकाच आहे. ही माणसं मला कॉवर्ड म्हणतील. मला ऑर्थोडॉक्स ठरवतील, मी समाजकार्य करण्यासाठी इथं आलेलो नाही, नोकरी करण्यासाठी आलो आहे. तेव्हा सामाजिक नीतिमत्ता आणि व्यावसायिक नीतिमत्ता यांची गल्लत मी करू नये असा सल्ला मला देण्यात येईल.'

'ते जे काही करताहेत ती काळाशी निगडित अशी व्यावसायिक गरज आहे असं त्यांचं समर्थन असणार आहे. मला त्याच्याशी कर्तव्य नाही. मनाची एकाग्रता ही संशोधनाच्या कामाची एक महत्त्वाची गरज आहे. त्या एकाग्रतेसाठी इथला एकांत आणि हे सारं वातावरण जोपासलं आहे. रिसर्चवर्क ही एकप्रकारची तपस्या आहे आणि ही तपस्या इथली माणसं स्वतःसाठी नाही इन्स्टिट्यूटसाठी पर्यायाने पिग्मासाठीच करत असतात.'

'पण एमडींनी रेस्टहाऊसचा सध्या ज्या प्रकारे वापर सुरू केला आहे, ती ॲक्टिविटी वाढायला लागली तर त्या एकाग्रतेलाच तडा जाणार आहे. इथल्या लोकांचा त्यासर्वांशी संबंध येत राहाणार. आज तो प्रकार सुरू आहे. इन्स्टिट्यूटचं कुंपण रात्री कुठंकुठं सैल व्हायला लागलं आहे. आसपासच्या शेतावरच्या बायांना रेस्टहाऊसवर पोहोचवणारी पायवाट तयार होऊ लागली आहे. यू विल नॉट बिलीव, या कामात सूर्यभान गुंतायला लागला आहे.'

सुझानं जोराने मान हालवून ही माहिती स्वीकारायला नकार दिला.

पण माझी माहिती पक्की होती.

मला प्रथम शंका आली तेव्हाच मी माझ्या पद्धतीनं खात्री करून घेतली होती. इन्स्टिट्यूटच्या गरजेनुसार मला कॅज्युअल लेबर नेमता येत होतं. त्या अधिकारांचाच उपयोग करून सूर्यभानच्या मदतीला दिलेल्या माणसा-कडून मला सर्व माहिती मिळत होती.

हा सूर्यभान भानुशाली तळेगाव ढमढेऱ्याचा. गुलाबाची कलमं वगैरे बांधायचा पिढीजात व्यवसाय. इन्स्टिट्यूटचा गुलाबाचा प्लॉट डेव्हलप करायचं ठरलं तेव्हा नंदितानं त्याला इथं आणला. कलमं बांधायला एखाद्या कुशल सर्जनचंच कौशल्य लागतं. साधारणतः शंभरातली पंचवीस कलमं जगतात. त्यापैकी कलमं बांधणाऱ्या हातची शेकडा पन्नास कलमं जगतात.

नंदितानं या माणसाच्या बोटांतील जादू जाणली. इथं आणून त्याच्यातील या अंगभूत कलेला शास्त्रशुद्ध ज्ञानाचं खतपाणी घातलं. नि सूर्यभानच्या हातची शेकडा ऐंशी कलमं जगतात असा विक्रमी अनुभव इन्स्टिट्यूटला नोंदता आला.

नंदितानं त्याच्या जोडीला त्याच्या बायकोलाही तयार केलं. या युगुलाच्या यौवनसुलभ उत्साहाला ईर्षेची जोड दिली. मी पहात होतो सूर्यभान नि बानू या जोडप्याच्या परिश्रमातून इन्स्टिट्यूटचा गुलाबाचा प्लॉट तरारून उभा झाला होता. या जोडप्याला या उद्योगात असं गुंतवून नंदितानं या अशिक्षित माणसांचा संसारही मोठा सुंदर गुलाबी करून सोडला होता.

नंदिता एवढ्यावरच थांबली नाही.

बानू नि सूर्यभान या जोडप्याला तिनं शहरातून होणाऱ्या फ्लॉवर शोच्या रिंगणात आणलं. या युगुलाच्या बोटांतील जादूने तिथेही आपली करामत दाखवली. नंदिताच्या मार्गदर्शनाखाली, पिग्माच्या वतीने, काल पुण्यात या युगुलाने मोठीच धमाल उडवून दिली.

पुणे वुईमेन्स कौन्सिल नि पुणे रोज सोसायटीने संयुक्तपणे भरविलेल्या भव्य फ्लॉवर शोमध्ये, किंग ऑफ द शो, क्वीन ऑफ द शो ॲण्ड द बेस्ट रोज गार्डन या तीन सर्वोच्च बहुमानांसह दुसऱ्या व तिसऱ्या क्रमांकाची दोन दोन अशी एकूण सात पारितोषिकं पिग्मानं पटकावली होती.

जॉन ऑफ केनेडीला किंग ऑफ द शो चा तर लेडी एक्सला क्वीनचा बहुमान मिळाला होता. मॉन्टे झुमा नि फ्रॅग्रंट क्लाउडला दुसऱ्या क्रमांकाची, तर स्वार्थ भोर नि व्हिस्कि मॅकला तिसऱ्या क्रमांकाची पारितोषिके मिळाल्याचा सर्व तपशील बानू नि सूर्यभानने या फुलांच्या परदेशी नावांचा सहज उच्चार करीत मला सांगितला होता. बानू नि सूर्यभानचं ते नवं रूप पाहाताना नंदिता मला अपरिहार्यपणे जाणवत होती.

कालचा सारा दिवस मग बानू, सूर्यभान नि नंदिता तिघंही इन्स्टिट्यूटमधील प्रत्येकाच्या कौतुकाचा विषय झाली होती. उत्साहाची एक ताजी झुळूक इन्स्टिट्यूटच्या वातावरणात लहरत राहिली होती.

रात्री उशीरापर्यंत फोन येत राहिले होते अभिनंदनाचे. मी इन्स्टिट्यूटचा चीफ एक्झिक्युटिव्ह. तरी अभिनंदनाचे फोन नंदितालाच घ्यावे लागत होते. त्यावर तिचा रास्त अधिकार होता. मात्र अभिनंदनाचा स्वीकार करताना नंदिता म्हणत होती, पिग्माची मुळात चांगल्या गोष्टींकडे ओढ आहे म्हणून आम्ही हे करू शकलो. इन्स्टिट्यूटच्या वतीने नि सूर्यभान नि बानूच्या वतीने मी तुमच्या अभिनंदनाचा स्वीकार करते.

मुख्य म्हणजे नंदिताच्या या वागण्या-बोलण्यात कुठेही पोज नव्हती. नंदितातील या निरलस वृत्तीने मी विलक्षण सुखावलो होतो.

चीफ एक्झिक्युटिव्ह म्हणून टोटल इन्वॉलमेन्टच्या कन्सेप्टसह या रिसर्च इन्स्टिट्यूटची जबाबदारी मी पत्करली तेव्हा मला एकच चिंता होती. इथल्या कामात मी हरवून जाईन आणि नंदिता एकटी पडेल. तसं काही झालं तर नंदितावर माझ्याकडून मोठा अन्याय होईल. अन्याय काही झाला नाही. मात्र नंदिताच्या निरलस वृत्तीचा नवा नवा अविष्कार मी अनुभवत राहिलो.

नंदितासह मी प्रथम इथं आलो तो दिवस मला आजही आठवतो. इथल्या उजाड माळरानावर उघड्या आकाशाखाली मी आणि नंदिता उभे होतो. इथं जे उभं करायचं होतं त्या चॅलेंजने मी आतून स्फुरत होतो. पण त्याचवेळी नंदिताचं काय या विचाराने अस्वस्थ होत होतो. नंदिताला मी माझी ती मनःस्थिती बोलून दाखवली.

नंदिता हसली.

जवळ एका कातळावर फुलपाखरांची जोडी बागडत होती. नंदिता म्हणाली, 'पहा, उद्या या इथं तुम्ही एक नवी हिरवी सृष्टी उभी कराल तेव्हाही तिथं ही फुलपाखरं अशीच आनंदानं बागडत राहाणार आहेत, पण आज इथं तसं काही नाही म्हणून त्यांचं काही अडून राहिलेलं नाही. परिस्थितीशी जुळवून घेत एकमेकांना सोबत करणं त्यांना जमतं. आपल्याला का जमणार नाही?'

'तुम्ही माझी मुळीच चिंता करू नका. स्वतःला इथल्या कामात खुशाल तुमच्यापद्धतीने झोकून द्या. मी एकटी वगैरे मुळीच पडणार नाही. तुमच्या कामात मी कोणतीही लुडबुड करणार नाही. मात्र काही बाही करत स्वतःला मी त्यात गुंतवून घेणार आहे. पाहू या काय कसं जमतं ते.'

तेव्हा नंदिता काय म्हणते आहे मला नीट उमगलं नाही. पण नंदिताच्या त्या शब्दांनी तिच्याविषयीची माझी चिंता तेवढी तीव्र राहिली नाही. आणि पुढच्या अनुभवातून चिंतेला मुळी थाराच उरला नाही. इन्स्टिट्यूट-

## ग्रंथ पारितोपिकांसंबंधी निवेदन

महाराष्ट्र साहित्य परिषदेमार्फत पुढील साहित्य प्रकारातील १९८५ सालात प्रसिद्ध झालेल्या उत्कृष्ट ग्रंथांना पारितोषिके देण्यात येतील.

**कविता :**
कै. ह. स. गोखले स्मृत्यर्थ २०० रु.

**उत्कृष्ट प्रकाशन :**
कै. अ. स. गोखले स्मृत्यर्थ २०० रु.

**कादंबरी :**
कै. ह. ना. आपटे स्मृत्यर्थ १०१ रु.

**संपादित ग्रंथ :**
कै. गिरिजा गंगाधर जांभेकर स्मृत्यर्थ १०१ रु.

**समीक्षा :**
प्रा. ह. श्री. शेणोलीकर यांचे नावे रु. ५००

**संत वाङ्मय :**
तुळशीराम वाघ यांचे स्मृत्यर्थ रु. ३००

**कुमार वाङ्मय :**
सुशील प्रधान स्मृत्यर्थ २०० रु.

**ललितेतर वैचारिक ग्रंथांसाठी :**
कै. शि. म. परांजपे, कै. ना. गो. चापेकर, कै. विश्वनाथ – पार्वती गोखले यांचे स्मृत्यर्थ प्रत्येकी रु. २५०, २५० व १५० रु.

श्रीगणेश – सरस्वती ठाकूरदेसाई यांचे स्मृत्यर्थ रु. ५०१ व रु. ४०१ अशी दोन पारितोषिके **ललितेतर वैचारिक ग्रंथांसाठी** यंदा देण्यात येणार आहेत.

याशिवाय कॉन्टिनेंटल प्रकाशन पुरस्कृत **कुसुमाग्रज पारितोषिक** आणि कॉन्टिनेंटल प्रकाशन पुरस्कृत **चिं. वि. जोशी पारितोषिक** अशी दोन पारितोषिके एका **कवीला** आणि एका **विनोदी लेखकाला** देण्यात येतील. ही पारितोषिके प्रत्येकी रु. १२००|– ची असतील. शिवाय या पारितोषिकप्राप्त ग्रंथांच्या प्रकाशकांना प्रत्येकी रु. ५००|– चे पारितोषिक देण्यात येईल.

वरील सर्व पारितोषिकांसाठी १ जानेवारी १९८५ ते ३१ डिसेंबर १९८५ या कालावधीत प्रकाशित झालेले ग्रंथ विचारात घेतले जातील. ज्या लेखक-प्रकाशकांना वरील पारितोषिकांसाठी ग्रंथ सादर करावयाचे असतील त्यांनी ग्रंथाच्या किमान दोन प्रती कार्यवाह, महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळकरस्ता, पुणे ३० या पत्त्यावर पोचत्या कराव्या ही विनंती.

**पारितोषिकांसाठी ग्रंथ पाठविण्याची अखेरची मुदत पुढीलप्रमाणे आहे.**

कॉन्टिनेन्टल प्रकाशन पुरस्कृत पारितोषिकांसाठी : दि. ५ जानेवारी १९८६.
इतर सर्व पारितोषिकांसाठी : दि. ३१ जानेवारी १९८६.

राजा फडणीस
कार्यवाह
महाराष्ट्र साहित्य परिषद.

मधील संशोधनाच्या माध्यमातून नवनवी प्रॉडक्टस् निर्माण करून मार्केटमध्ये आम्ही पिग्माचा दबदबा सतत वाढवत होतो. त्याचवेळी इन्स्टिट्यूटमध्ये स्पोर्टस आणि कल्चरल ॲक्टिविटिजच्या माध्यमातून नंदितानं जणू एक सांस्कृतिक चळवळच उभी केली होती. या चळवळीला काही सामाजिक भानही होतं. रूरल एरिआतील किशोरवयीन मुलांच्या संशोधनाची वृत्ती जोपासण्याच्या दृष्टीने पिग्माच्यावतीने काही स्कॉलर-शिप्स् स्पॉन्सर करण्यापर्यंत नंदिताच्या ॲक्टिविटीजची व्याप्ती मोठी नि सखोल होती. त्या सर्वातून बाहेरच्या जगात पिग्माची एक स्वतंत्र इमेज प्रोजेक्ट होत होती. व्यापारी जगातील पिग्माच्या नावाला त्यामुळे अधिकच डिग्निटी निर्माण होत होती.

नंदिताच्या या ॲक्टिविटीज पाहून सीनिअर गगराट घनःश्यामदासजींनी इन्स्टिट्यूटची वेल्फेअर ऑफिसर म्हणून नंदिताला स्वतंत्र असाइन्मेन्ट ऑफर केली होती. नंदिताने त्याला नम्र नकार दिला. नकार देताना नंदिता गगराटना म्हणाली होती. 'मी हे सारं मिस्टर श्रीवास्तवांवरील माझ्या प्रेमाखातर करते. सॅलरीज घेऊन मी ते करायला लागले तर माझ्या प्रेमाची किंमत करायची संधीच मी कुणाला दिल्या-सारखं होईल. इन्स्टिट्यूटच्या कामात मिस्टर श्रीवास्तवा स्वतःला पूर्णतः गुंतवून घेतील तेव्हा मी एकटी पडेन अशी त्यांना चिंता होती. इथल्या रिसर्च वर्कमध्ये गुंतलेल्या सर्वच मंडळींचा कमीअधिक प्रमाणात तो प्रश्न असू शकतो असा विचार मनात आला. त्यातून हा काही उद्योग आरंभला. हे सर्व करताना एक भान ठेवलं की आपल्या ॲक्टिविटीजमुळे पिग्माला कमीपणा येईल असं काही होता कामा नये.'

नंदिताच्या या उत्तराने घनःश्यामदास गगराट क्षणभर अवाक झाले. मग नंदिताला म्हणाले, 'मिसेस श्रीवास्तवा तुम्हाला जॉब ऑफर करून मी तुमचा अपमान केल्यासारखं मला वाटायला लागलं आहे. पिग्मानं तुमच्या ऋणात राहाण्यातच अधिक शान आहे.'

पिग्मा, सूर्यभान नि बानूच्यावतीने मी तुमच्या अभिनंदनाचा स्वीकार करते असं नंदिता फोनवर काल म्हणाली, तेव्हा हे सर्व पुन्हा आठवलं, वाटलं की ही कुणी निराळीच नंदिता आहे नि मी नव्यानेच तिच्या प्रेमात पडतो आहे. या कल्पनेने माझा मीच विलक्षण सुखावलो होतो. पण मग अचानक एक नवीच जाणीव निर्माण झाली. माझ्या लक्षात आलं की मला जे वाटतं आहे ते तसंच्या तसं नंदिताकडे पोहोचवू शकेन याची मला खात्री नाहीय.

नंदिता दिवाणखाण्यात नाही असं पाहून सरळ सुझाला फोन लावला. तेवढ्या रात्री साडे अकरा वाजता. मनातलं सारं सुझाकडे मात्र मी व्यवस्थित बोलू शकलो.

सुझा म्हणाली होती,

'सर किती गंमतीची नि प्लेझंट गुंतागुंत आहे. तिथं नंदितार्ताई जवळ आहेत. पण त्यांच्याबद्दलची तुमची ही भावना तुम्ही त्यांना नेमकेपणानं सांगू शकत नाही. त्यासाठी तुम्हाला तुमची सेक्रेटरी हवीय. तुमची नि नंदितातार्ईची मी इतकी कुणी जवळची आहे, या गोष्टीचं माझ्या घरातल्या माणसांना केवढं कौतुक वाटतं सर!'

'बाय द वे सर, नंदितातार्ईबद्दल तुम्हाला जे वाटतंय त्या भावनेचा पहिला साक्षात्कार मी अनुभवतेय. ही सिच्युएशनच मोठी विलक्षण आहे. तुम्ही स्वतःच ते नंदितातार्ईना सांगण्याच्या फंदात नाही पडलात ते चांगलं केलंत सर. आता हे विलक्षण सुख मी रात्रभर छान मुरत घालणार आहे. मग सकाळी झोपेतून उठवून हा मोरावळा मी नंदितातार्ईच्या जिभेवर ठेवणार आहे. आयडिया कशी आहे सर?'

'तुला फोन करून पहिला गाढवपणा मी करून बसलो आहे. आता तुला असलं काही करू नको म्हणालो मी तरी बॉस म्हणून इथं तू थोडीच मला दाद देणार आहेस? माझ्या मनाला काही ओझं झालं होतं ते मी उतरवून टाकलं. गुडनाइट!'

सदाशिव पेठेत राहून या खिश्चन मुलीनं इतकं सुंदर ब्राह्मणी मराठी बोलणं आत्मसात केलंय याचं कौतुक वाटल्याशिवाय राहिलं नाही.

सकाळी मग नंदिताला सुखाचा गुणाकार करणारे दोन फोन आले. त्यातला पहिला पहाटेला आलेला फोन अर्थातच सुझाचा. सुझानं काय नि नेमकं कोणत्या शब्दात सांगितलं मला ठाऊक नाही. पण नंदिता त्या फोनने विलक्षण सुखावली होती. मला जाग आली ती माझ्या गालावर सांडलेल्या नंदिताच्या डोळ्यातील ऊन ऊन पाण्याने...

दुसरा बुइमेन्स कौन्सिलचा होता. अगदी आजच रात्री घाईने त्या मंडळींनी सूर्यभान नि बानूला एक

डिनर अरेंज केलं होतं. अनुताई वाघ पुण्यात होत्या. नि फक्त आज रात्रीपुरत्याच त्या अव्हेलेबल होत्या. त्यांच्या हस्ते हिरव्या बोटांची माणसं अशा शीर्षकाखाली सूर्यभान नि बानूला प्रशस्तीपत्र देण्याचा कार्यक्रम वुइमेन्स कौन्सिलनं घ.ईनं ऑर्गनाइज केला होता. अवघ्या एका दिवसात तसं प्रशस्तीपत्र कौन्सिलनं प्रिंट करून घेण्याचीही व्यवस्था केली होती. या सर्व धडपडीचं महत्त्व ओळखून नंदिता सूर्यभान नि बानूला घेऊन कार्यक्रमात सहभागी होईल असं त्यांनी सरळ सरळ गृहित धरलं होतं. नंदिताचे नि कौन्सिलचे तेवढे जवळचे संबंध होते. शिवाय प्रत्येक शनिवारी संध्याकाळपासून रविवार संध्याकाळपर्यंत पुण्यात घालविण्याचा आमचा परिपाठ होता. ज्याची त्या मंडळींना पूर्ण कल्पना होती. नंदिताच्या भरवशावर सारा कार्यक्रम परस्पर ठरवून नंदिताकडून कन्फर्मेशन मागण्यासाठीच इतक्या सकाळी त्यांनी फोन केला होता. त्यांच्या अपेक्षेप्रमाणे नंदितानं त्यांना होकार दिला होता. मला नि सुझालाही घेऊन येत असल्याचं त्यांना सांगून टाकलं होतं.

सूर्यभान नि बानूला बोलावून घेऊन त्यांच्याकडून काही अडचण नाही याची नंदितानं खात्री करून घेतली होती.

इन्स्टिटयूटच्या प्रिमायसिसमध्ये नंदितावरोबर मी नेहेमीप्रमाणे सकाळची राउंड घेतली. तेव्हाही सूर्यभान आमच्याबरोबर होता. संध्याकाळच्या कार्यक्रमाचं ऐकून मोठ्या खुषीत होता. मला म्हणाला, 'साहेब तळेगाव ढमढे-यात पिढ्यानपिढ्या आमी गुलाबाची कलमं बांधतोय. पण त.ईसायबांची आमच्याकडं नजर गेली नि त्याच कामाचं सोनं झालं बघा. ह्ये असले दिस कदी दिसतील वाटलं नवतं. आमची मानसं तर त.ईसायबानला नि तुमाला देवाजागी मानतायत बगा.'

ही भावनिक प्रतिक्रिया समजण्यासारखी होती. पण त्याचवेळी सूर्यभानचे अलीकडचे उद्योगही मी विसरू शकत नव्हतो. आत्ताचा सूर्यभान खोटा नव्हता. पण तसाच मला ठाऊक असलेला दुसरा सूर्यभानही तेवढाच खरा होता. एकाच माणसात ही दोन परस्पर भिन्न माणसं वावरत होती. नंदिताला दुसरा सूर्यभान ठाऊक नव्हता. त्यामुळं ती तिच्या ॲक्टिविटीजच्या माध्यमातून जुळलेल्या विश्वासाच्या नात्यानं त्याच्याशी बोलत होती. त्यामुळे नंदिता बोलते आहे याचा फायदा घेऊन काहीच न बोलण्याच्या नि तटस्थपणे सूर्यभानाला न्याहाळण्याच्या माझ्या पवित्र्यात सूर्यभानला काही निराळं जाणवलं नव्हतं.

माझी सकाळची राऊंड संपवली. सूर्यभान त्याच्या उद्योगाला गेला. नंदिता बंगल्यावर परतली. मी माझं ऑफिस रुटीन सुरू करण्यासाठी माझ्या केबिनमध्ये आलो. केबिनमध्ये आलो नि सुझाकडून एमडींचा फोन येऊन गेल्याचं कळलं. सुझाशी नंदितानं कधी संपर्क साधला होता ठाऊक नाही. पण सुझाला नंदिताकडून संध्याकाळचा कार्यक्रम समजला होता. म्हणूनच एमडींच्या इन्स्ट्रक्शन्स कन्वे करण्यापूर्वी माझी सकाळची कॉफी आधी उरकून घेण्याचा एक प्रयत्न सुझानं केला होता. एक बरं होतं की एमडींच्या इन्स्ट्रक्शन्स समजल्यातरी सुझानं नंदिताला त्याबद्दल मला विश्वासात घेण्यापूर्वी काही सांगितलं नव्हतं.

एमडींच्या इन्स्ट्रक्शन्स समजल्यानंतर संध्याकाळच्या कार्यक्रमात मी सहभागी होऊ शकत नव्हतो. नोकरीत अशा गोष्टी होतात. आपल्या नियोजित कार्यक्रमावर पाणी सोडून अशावेळी वरिष्ठांशी ॲडजेस्ट व्हाव लागतं हे मला नवीन नव्हतं. त्यामुळे संध्याकाळच्या कार्यक्रमात मला सहभागी होतायेत नाही म्हणून मी डिस्टर्ब वगैरे झालो नव्हतो.

पण एमडींना सूर्यभानही हवा होता. तो त्यांना कशासाठी हवा आहे ते मला ठाऊक होतं. पिग्माकडून एक दिडकीही न घेता नंदितानं ब.नू नि सूर्यभान यांना एका सांस्कृतिक जगात पिग्माचे प्रतिनिधी म्हणून काही सन्मानाचं स्थान मिळवून दिलं होतं. इकडे एमडीही सूर्यभानाला काही निराळ्या ॲक्टिविटीजमध्ये ओढून आपल्यापरिने पिग्माचं आणि सूर्यभानचंही हित साधू इच्छित होते. सूर्यभानला मध्ये ठेवून दोन परस्पर भिन्न प्रवृत्ती एकमेकांच्यासमोर उभ्या होत्या. एमडींचा निरोप सूर्यभानला ठाऊक नव्हता. तो त्याला न सांगता संध्याकाळच्या कार्यक्रमात त्याला सहभागी होऊ द्यायचं, का एमडींची मर्जी राखण्यासाठी त्याला इथे ठेवून घेऊन नंदिताला अडचणीत आणायचं असा माझ्यासमोर प्रश्न होता.

प्रश्न निव्वळ नंदिताला दुखावण्याचा नव्हता.

सूर्यभान शेतावरून रेस्टहाऊसवर बाया आणायला लागला याचा अर्थ इथल्या आडबाजूच्या जागेतील एकांताचा दुरूपयोग करून घेण्याकडे कल निर्माण झाला,

आहे. त्याचं मी काय करणार आहे. हा खरा प्रश्न आहे. या प्रकाराकडे दुर्लक्ष करून मी तो वाढू देणार आहे का? का तो मुळातून नष्ट करण्यासाठी सूर्यभानला इथून हुसकावून लावण्यापर्यंतच्या कोणत्याही ॲक्शनला प्रवृत्त होऊन, एमूडींबरोबरच्या संघर्षाला मी सामोरा जाणार आहे असा माझ्यासमोरचा चॅलेंज होता.

त्यातून एमूडी एका जरनॅलिस्टला घेऊन येत होते. सूर्यभानला मी पुण्याला पाठवला तर मोठ्या आशेनं बाईच्या वासावर आलेल्या एका जनावराला मी दुखावणार होतो. प्रसंगी नको तितकं हिंस्र बनू शकणारं हे जनावर होतं. दुखावलेल्या पत्रकारासारखं प्रभावी हत्यार अनायसे एमूडींना उपलब्ध होणार होतं. एमडी त्याचा कौशल्याने उपयोग करून घेऊ शकत होते. सूर्यभान नि पिग्माने फ्लॉवरशोमध्ये मिळविलेल्या यशाला,मुंबईच्या जर्नल्समधून वाईड पब्लिसिटी देण्यासाठी मुद्दाम मी जरनॅलिस्टला इन्स्टिटयूटमध्ये घेऊन आलो. पण मिस्टर श्रीवास्तवांनी कोऑपरेशन दिलं नाही. सूर्यभानला मिळणारी एवढी प्रसिद्धी त्याना रूचली नाही. पिग्मा नि सूर्यभान दोघांच्याही हिताची एक महत्त्वाची संधी त्यामुळे हुकली... वगैरे. एमूडी असा कोणताही पवित्रा घेऊ शकणार होते. प्रसंगी सूर्यभानला माझ्याच विरूद्ध भडकवण्याचाही प्रयत्न ते करू शकत होते.

सुझाकडे मी हे सर्व बोललो.

तिला म्हणालो, 'सू तुझ्यामुळे हे सर्व बोलण्याजोगी इन्स्टिटयूटमध्ये मला एक विश्वासाची जागा आहे ॲण्ड यू बेअर अ कपॅसिटी टू ॲण्डरस्टँड द थिंग्ज... ही एवढीच या घटकेला जमेची बाजू!'

सारं ऐकलं नि सुझा स्टर्न झाली.

स्वतःशीच पुटपुटली, 'ब्लडी डर्टी डोझन्टस! इट सीम्स टू बी रादर डिफिकल्ट टू गेट रीड ऑफ द डर्टी थिंग्ज. त्यातल्या त्यात एक गोष्ट बरी आहे की एक्सेप्ट मी नो वन् नोज रिगार्डिंग एमूडीज इन्स्ट्रक्शन्स.'

सुझाचे डोळे एकदम चमकले, म्हणाली,

'सर एमूडींच्या इन्स्ट्रक्शन्स तुम्हाला ठाऊकच नाहीत इथून सुरवात केली तर आजची परिस्थिती तरी तुम्हाला हाताळता येईल असं मला वाटतं.'

'हॅव यू गॉन मॅड टू से दॅट?'

मी एकदम एक्साइट झालो. सुझाला डाफरत म्हणालो,

'म्हणजे मी तुला एमूडींच्या तोंडावर फेकू? हाऊ यू डेअर टू प्रपोज दॅट?'

सुझा म्हणाली,

'मला समजतं सर. रिस्क आहे. पण मी ती घ्यायला हवी. आफ्टर ऑल आय ॲम अ वुमन आय कॅन हॅव सडन गायनिक ट्रबल ॲण्ड इन दॅट केस, इट विल बी अनह्युमेन ॲण्ड अनमॅनर्ली टू ऽऽ टू एस्पेक्ट मी टू ऑब्टेन पर्मीशन टू लिव्ह द ऑफिस...'

'नो ऽऽ स्टॉप मेईंग एनी मोर.'

मी ताडकन उठलो नि ॲन्टीचेंबरमध्ये निघून गेलो.

ॲन्टीचेंबरमध्ये डोळे मिटून पाचएक मिनटं आरामचेअरमध्ये पडून राहिलो. मग उठलो. थोडा वॉश घेतला. मनावर ओझं वाढू न देण्यासाठी टेबलावरच्या इतर कामात निर्धारानं लक्ष घातलं. ट्रेमधली एकएक फाइल समोर ओढून निकालात काढत राहिलो.

असा एक अर्धापाऊणतास गेला नि माझ्या टेबलावरचा इंटरकॉम वाजला.

इन्स्टिटयूटच्या गेटवरून मला निरोप होता. माझी सेक्रेटरी डिसूझा अचानक सिरिअसली सिक झाली होती. शी वॉज अनकॉशस ॲण्ड वॉज रिमूव्ड टू पुना वाय स्टाफ व्हेइकल.

प्रथमच सुझाने तिची पायरी ओलांडली होती.

मी घ्यायचा निर्णय तिने घेतला होता. माझ्यावर तो लादला होता.

सुझाला अचानक असं इन्स्टिटयूटमधून हालवावं लागलं या बातमीने इन्स्टिटयूटमध्ये थोडी धावपळ उडालीच. त्यामुळं या संबंधातील चौकशा नि चर्चा वगैरे परिस्थितीला आणि तोंड द्यावं लागणार होतं. नंदकिशोर डेप्युटी चीफ एक्झिक्युटिव होता. अधिकारी पातळीवरचा माझा इमिजिएट असिस्टंट. इंटरकॉमवर त्यालाच प्रथम सूचना दिल्या.

'लूक नंद, सुझाबद्दल इथली सारीच माणसं हळवी आहेत. पण म्हणून इथल्या कामावर त्याचा अजिबात परिणाम होता नये. हॅण्डल द थिंग्ज टॅक्टफुली. तुझ्याबद्दल कुणाचं वाईट मत होणार नाही याची काळजी घे. मुख्य म्हणजे मला कोणी डिस्टर्ब करणार नाही एवढं बघ."

नंदकिशोरनं सारं व्यवस्थित हॅण्डल करण्याबद्दल मला आश्वासन दिलं. एरवीही हे माझा इमिजिएट असिस्टंट म्हणून त्यालाच सांगितलं असतं. पण नंद तरुण होता. सुझाबद्दल सर्वांत जास्त तोच सिम्पथॅटिक होता. इतरांची

सिंपथी थोपवून धरायची जबाबदारी त्यालाच लावून दिल्यावर, त्याला स्वतःला तसं वागायला संधीच राहात नाही असा थोडा धूर्त विचारही त्यामागे होता.

नंदकिशोरनं परिस्थिती ठीक हाताळली.

फक्त एका व्यक्तीला सुझाची चिंता करत माझ्यापर्यंत पोहोचण्यापासून तो रोखू शकला नाही. नंदिताला!

बंगल्यावर सुझाबद्दलची बातमी पोहोचली तशी नंदिता उठून घाईने सरळ माझ्या केबीनमध्येच येऊन हजर झाली. इतकं सगळं झालं तरी तिला बोलावून घेतलं नाही म्हणून मला दोष देऊ लागली.

मी म्हणालो,

'सुझाला घेऊन स्टाफकार परस्पर निघून गेली. गेटवरून फोनने हे सारं मला नंतर कळवण्यात आलं. शी इज माय सेक्रेटरी. तिच्यासाठी तत्परतेने कोणतीही व्यवस्था इथे होऊ शकते. माझ्या पश्चातही. पण मी इथं असतानाही मला त्याबाबत कुणी विश्वासात घेऊ नये या प्रकाराने मलाच काही समजेनासं झालं आहे. अशा परिस्थितीत तुला मी केव्हा बोलावून घ्यायचं?'

माझीच समजूत घालत नंदिता म्हणाली.

'अहो बायकांचा आजार नेहेमीच सांगण्यासारखा असतो असं नाही. तुम्ही उगाच तुमचं डिसिप्लीन वगैरे सांभाळलं गेलं नाही म्हणून कुणाला धारेवर वगैरे धरू नका. मी पहाते काय ते.'

असं म्हणून नंदिता उठून गेली.

या घटकेला तरी नंदिताशीही मला खोटंच बोलावं लागलं होतं. माझा नाइलाज होता. अन्यथा नंदिताला मला नको ते नि नको तेवढं सारं सत्य सांगावं लागलं असतं. सुझानंही परिस्थिती अशी एकदम स्वतःच्या ताब्यात घेऊन वागावं हेही मला आवडलं नव्हतं. पण सध्यातरी तिच्या निर्णयाशी जुळवून घेण्याशिवाय मला गत्यंतर नव्हतं. एखाद्या परिस्थितीच्या आधीन यापूर्वी इतका असा मी कधीही झालो नव्हतो.

पण कालचा दिवस जेवढा आमचा होता तेवढाच आजचा दिवस एमडींचा होता. सुझानं हे सारं अखेर कशासाठी केलं असं म्हणायची वेळ आली. एमडी येणार हे मला ठाऊक होतं. त्यामुळे संध्याकाळच्या कार्यक्रमासाठी पुण्याला जाण्याचं प्रकृतीचं कारणच पुढे करून मी टाळलं. सूर्यभान नि बानूला नंदिताबरोबर पाठवलं. अगदीच वाईट दिसू नये म्हणून माझ्याऐवजी नंदकिशोरला इन्स्टिट्यूटचा प्रतिनिधी म्हणून त्यांच्याबरोबर पाठविण्याची व्यवस्थाही मी केली.

पण या सर्वांना घेऊन निघालेली इन्स्टिट्यूटची कार नाशिक फाट्यावर पोहोचण्यापूर्वीच, मुंबई पुणे मार्गावरून नाशिक फाट्यावरून वळून इन्स्टिट्यूटच्या दिशेने निघालेली एमडींची कार समोरून आली होती. त्यांची गाडी पाहून इन्स्टिट्यूटच्या ड्रायव्हरने गाडी थांबवली होती. सूर्यभान त्यांच्याबरोबर पुण्याला निघाल्याचं पाहून एमडी वॉज टू लूज हिज टेम्पर वगैरे वर्णन नंतर मला नंदिताकडून ऐकायला मिळालं. पण सुझा अचानक आजारी पडली नि तिला अन्‌कॉन्शस अवस्थेत पुण्याला हलवावं लागलं वगैरे स्टोरी समजली तेव्हा त्यांच्या इन्स्ट्रक्शन्स या सर्व प्रकारात ती कन्वे करू शकली नसावी या निष्कर्षाला ते पोहोचू शकले. सुदैवाने सूर्यभान त्यांच्या हाती लागला होता. त्यामुळे त्यांचा तोल त्यांनी जाऊ दिला नव्हता.

मग एमडींनी सर्वांना विश्वासात घेतलं. एवढा मोठा मुंबईचा जरनॅलिस्ट, जो उद्या पिग्मासाठी बंगलोरला ज्युनिअर गगराटांची मुलाखत घेणार आहे; त्याला फ्लॉवरशोमधील ग्रॅण्ड सक्सेसमुळे तुमचा सर्वांचा इन्टरव्ह्यू घ्यायला मुद्दाम इथे आणला. त्याला अगदीच नाराज करणं बरोबर नव्हे शिवाय कार्यक्रम वुइमेन्स कौन्सिलचा. तेव्हा बानूने त्या कार्यक्रमाला उपस्थित राहावं. सूर्यभानने बॉम्बेच्या जरनॅलिस्टसाठी इन्स्टिट्यूटवर परतावं अशी तोड एमडींनी सुचवली. नंदकिशोरसाठी एमडींची सूचना हा हुकूम होता. नंदिताचा कन्सेंट हा एथिक्सचा भाग होता. एमडींना कुणी नाही म्हणण्याचा प्रश्नच नव्हता. एमडींच्या गाडीतूनच सूर्यभान इन्स्टिट्यूटवर परतला होता.

पुढच्या सगळ्या वाईट घटना मग विलक्षण वेगानेच घडत गेल्या.

मला बरं नसल्याचं निमित्त करून मी पुण्याला जायचं टाळलं होतंच. तेच निमित्त करून रेस्ट हाऊसवर मुंबईच्या त्या जरनॅलिस्टला ट्रीट करायच्या कार्यक्रमापासूनही मी दूर राहिलो. सूर्य अर्ध्या तासानं मावळेल नि मग तुम्हाला गुलाबाचा प्लॉट नीट पाहता येणार नाही असं सांगून, त्यांना प्रथम सरळ त्या प्लॉटवरच नेलं. मग त्यांना पहिला चहा त्या प्लॉटसमोरच्याच लॉनवर अरेंज केला. फ्लॉवर शोमधील अचिवमेन्ट्सचे

तपशील सांगितले. इन्स्टिट्यूटविषयी थोडं सांगितलं. मग उद्या सकाळी पुन्हा सूर्योदयापूर्वीच तुम्ही बंगलोर-कडे निघणार आहात तर आता विश्रांती घ्या. रेस्ट हाऊसवर आमचा गुरशरण खानसामा आहे. एमडींचा आवडता आहे. माझी प्रकृती बरी नाहीय. तेव्हा मी डिनर जॉइन करू शकणार नाही याबद्दल मला एमडी सांभाळून घेतील...वगैरे शाब्दिक घोळ घालून, त्यांना रेस्ट हाऊसवर पोहोचवून दिलं.

सूर्यभानचं बुईमेन्स कौन्सिलचं डिनर चुकलं आहे. एमडींचा त्याच्यावर लोभ आहे. शिवाय जरनॅलिस्ट साहेबांना त्याचा इन्टरव्यूही घ्यायचाच आहे. तर रेस्ट हाऊसवर त्याला तुमच्याबरोबर ठेवून घ्या वगैरे एमडींना सुचवलं.

उशीरा का होईना पण त्यांच्या लक्षात आलं की त्यांच्या महत्त्वाच्या साऱ्या गरजा भागविणारे गुरशरण नि सूर्यभान त्यांच्या सेवेला आहेत तेवढे पुरे. उलट माझ्या अनुपस्थितीनंच त्यांचा कार्यक्रम अधिक सोयीचा होणार आहे.

'तुमची कंपनी मिस होतेय हे बरं वाटत नाही. पण प्रकृतीच बरी नाहीय म्हणता म्हणून तुम्हाला आग्रह करत नाही' वगैरे औपचारिक बोलून एमडींनी मला माझ्या बंगल्यावर परतायला परवानगी दिली.

आधीच इन्स्टिट्यूट एका बाजूला. तशात शनिवार असल्याने इन्स्टिट्यूटमधली बरीच मंडळी पुण्यात पोहोचलेली. तर एकूणच वर्दळ कमी. नि आता माझीही त्यांच्यात अनुपस्थिती. त्यामुळे ज्या मूलभूत कार्यक्रमा-साठी पाहुणा रेस्ट हाऊसवर पोहोचला होता तो सारा त्याच्या कल्पनेपेक्षाही उत्तमरीत्या पार पडला असावा.

नियोजित कार्यक्रमाप्रमाणे पत्रकाराला घेऊन भल्या सकाळीच एमडी बंगलोरला निघून गेले. जाताना सूर्यभानच्या हाती माझ्यासाठी त्यांनी एक लहानशी नोट पाठवून दिली. रात्रीचा कार्यक्रम किती उत्तमरीत्या पार पडला होता त्याचीच ती पावती होती.

बानूला दोन इन्क्रिमेन्टस नि सूर्यभानला मुख्य माळी म्हणून प्रमोशन देण्याबद्दल नोटमध्ये सूचना होत्या.

शिवाय नंदिताला नि मला धन्यवाद. रीत म्हणून.

सूर्यभानसमोरच ती चिठ्ठीवजा नोट मी फाडून टाकली.

मुंबईचा जरनॅलिस्ट रेस्टहाऊसवरच्या व्ही. आय. पी. ट्रीटमेन्टने फारच खुश झालेला दिसत होता. बंगलोर फॅक्टरीच्या अचिव्हमेन्टसना मुंदरदास गगराटच्या फोटोसह मुंबईच्या तीन इंग्रजी नि दोन मराठी दैनिकातून त्यानं वाइंड पब्लिसिटी दिली होती पण पत्रकार सूर्यभानलाही विसरला नव्हता त्या प्रत्येक आर्टिकलमध्ये रिसर्च इन्स्टिट्यूटच्या फ्लॉवरशोच्या जःएःण्टिक सक्सेसवरही एक एक दीड दीड कॉलमचा मॅटर होता. सूर्यभान नि बानूच्याही फोटोसकट! त्या सर्व मजकुरात नंदिताचा मात्र कुठे साधा उल्लेख नव्हता.

एमडींचा जरनॅलिस्ट मित्र एवढ्यावरही थांबला नाही. दोनापैकी एका मराठी दैनिकात तर त्याने माझ्यावर नि नंदितावर घाणेरडा आरोप करण्यापर्यंत मजल मारली होती. इन्स्टिट्यूटच्या एका ज्येष्ठ अधिकाऱ्याने पुण्यातील सर्व वर्तमानपत्रांना हाताशी धरून सूर्यभान नि बानूच्या यशाच्या श्रेयात आपल्या पत्नीचाही वाटा असल्याचा वाजवी दावा करून, त्या युगुलावर अन्याय केल्याचेही तारे तोडले होते.

त्यानंतर आठवड्याभरात एक अधिकच ओंगळ अनुभव नंदिताच्या पायापर्यंत वाहात आला. वर्तमान-पत्रातील त्या भन्नाट प्रसिद्धीनं सूर्यभानचे पाय जमिनीला लागेनासे झाले होते. ज्याचे पायच जमिनीवर ठरत नव्हते. अशा सूर्यभानच्या डोक्यात त्या जरनॅलिस्टने आणखी काय काय घालून ठेवलं होतं समजायला मार्ग नव्हता. पण सूर्यभान सारी सारी विवेकबुद्धी हरवून बसला होता. तसं नसतं तर त्याने बानूला त्या रात्री त्याच्या क्वार्टर्सवर वस्तीला आलेल्या पत्रकाराला बिछा-न्यात सोबत करायला सुचवलं नसतं. बानूचं नशीब म्हणून ते ऐकून धसक्यानं ती तिथेच कोसळली नाही. पाणी प्यायला म्हणून आत गेली नि मागच्या दारानं बाहेर पडून सरळ आमच्या बंगल्यावर पोहोचली. नंदिताच्या पायावर कोसळून धाय मोकलून रडत राहिली.

नंदितानं बानूला रात्री बंगल्यावरच ठेवून घेतलं.

सिक्युरिटीच्या माणसांना पाठवून सूर्यभानच्या क्वार्टर्समधील वस्तुस्थितीची नोंद घ्यायचा मी हुकूम दिला.

सूर्यभान नि जरनॅलिस्ट तिथं पिऊन टेर झालेले सापडले.

सूर्यभान बानूला शिव्या घालत होता. 'बायको मालकीची वस्तू. मी होय म्हटलं तिनं झोपायं पायजेल.

कुणाखालीही.' काय वाटेल ते बरळत होता. सिक्युरिटीच्या लोकांनी हे सारं रेकॉर्ड करायचं का म्हणून विचारलं होतं.

मी त्यांना म्हणालो होतो.

'अरे त्याला बानूच्या चारित्र्याची चाड नाही. पण आपल्याला तर आहे. तसलं काही नोंदवू नका.'

बानूला सकाळी घरी जाऊ देण्यापूर्वी सिक्युरिटीच्या माणसांना मी बोलावून घेतलं, बानूला त्यांच्यासोबत त्यांच्या क्वार्टर्सकडे पाठवून दिलं. बानू त्यांच्याबरोबर गेली नि त्यांच्याबरोबरच बंगल्यावर परत आली. सूर्यभाननं आपल्या क्वार्टर्सना कुलूप ठोकलं होतं. अधिक चौकशीनंतर समजलं आम्हाला शिव्या घालत गेर्यभान भल्या सकाळीच जरनॅलिस्टबरोबर कुठे निघून सूला होता. सूर्यभान परतेपर्यंत मग बानूला बंगल्यावरच ठेवून घेणं भाग पडलं होतं.

सूर्यभान जरनॅलिस्टबरोबर सरळ मुंबईला पोहोचला होता. दोन दिवस तिकडेच होता.

तिसऱ्या दिवशी हेडक्वार्टर्सवरून माझा जाब मागणारं



पत्र घेऊन सूर्यभान इन्स्टिट्यूटवर परतला होता. एमडींचा स्पेशल मेसेंजर त्याच्या सोबत होता.

पत्रात माझ्यावर दोन आरोप होते.

पहिला, सूर्यभान नि बानू यांचं गुलाबाच्या प्लॉट संबंधातील यश मी मिसेस श्रीवास्तवांच्या नावाने पुण्यातील वर्तमानपत्रातून कॅश केल्याबद्दलचा होता.

दुसरा आरोप वाचून तर माझ्या हातापायातलं बळ नाहीसं झाल्यासारखं वाटलं. बानूवर माझी वाईट नजर आहे, नि सूर्यभान विरुद्ध मी तिला फितवण्याचा प्रयत्न चालविला आहे, अशी सूर्यभानची तक्रार होती. बानू आमच्या बंगल्यावर होती हा त्याचा प्रथमदर्शनी पुरावा असल्याचं म्हटलं होतं.

पत्रामागोमाग तासा दीड तासाच्या अंतराने मला दोन फोन आले. पहिला एमडींचा मुंबईहून. दुसरा घनःश्यामदास गगराट यांचा, बंगलोरहून.

परिस्थिती अंगाशी आली तर एमडी कसे वागतील या बद्दलचा माझा तर्क अचूक ठरला होता. सूर्यभान नि बानूचं वर्तमानपत्रांनी केलेलं कौतुक म्हणे मला सहन झालं नाही. बानू नि सूर्यभानला इन्क्रिमेन्टस प्रमोशन वगैरे देण्याच्या सूचनांची चिठ्ठी मी फाडून टाकली वगैरे तपशील एमडींना पोहोचले होते. बानूला फितवण्याच्या माझ्या प्रयत्नांची खातरजमा करून घेण्यासाठी म्हणे जरनॅलिस्ट पुन्हा इन्स्टिट्यूटवर पोहोचला होता. रेस्टहाऊसवर पाहुण्यांसाठी शेतावरून बायका आणून पुरवण्याचा उद्योग चीफ एक्झिक्यूटिवनी सूर्यभानला कसा करायला लावला आहे त्याची माहिती जरनॅलिस्टला मिळाली होती. 'ब्लू नाइटस् इन पिग्माज रिसर्च इन्स्टिट्यूट' हा लेख त्याने प्रसिद्धीसाठी तयार ठेवला आहे, वगैरे तपशील एमडींनी मला फोनवर पुरवले.

'फार मोठी रक्कम नि पिग्माच्या रिसर्च इन्स्टिट्यूटच्या चीफ एक्झिक्यूटिवपदाचा राजीनामा या दोन मागण्या पूर्ण होण्यानेच जरनॅलिस्ट तडजोडीला तयार आहे. रक्कम मोठी असली तरी केवळ तुमच्यासाठी पिग्मा ती सोसायला तयार आहे.'

'राजीनामा देऊन पिग्माची बेअब्रू वाचवणं आता तुमच्या हाती आहे. तुम्ही राजीनामा देणं आपल्या सर्वांच्याच हिताचं आहे.'

एमडींचा फोन या सल्ल्यावर संपला होता.

त्यानंतर तासाभराने आलेल्या बंगलोरच्या ट्रंककॉल-

वरून पिग्माचे सिनिअर मोस्ट पार्टनर घनःश्यामजी गगराट माझ्याशी बोलले. मी राजीनामा देईपर्यंतही त्यांना धीर नव्हता. ते म्हणाले,

'मिस्टर श्रीवास्तवा, तू तडकाफडकी राजीनामा दिल्याचं मला समजलं. यू आर अ वाइज गाय. हरणारी लढाई लढण्यात शहाणा माणूस आपली शक्ती खर्च करीत नाही. उगाच आशेने माझ्याकडे पाहात बसला नाहीस ते बरं केलंस. पिग्माच्या आकाशातला मी मावळतीचा सूर्य आहे नि उगवतीच्या सूर्याला नमस्कार करण्याचं तंत्र तुझ्यापाशी नाही हे मला ठाऊक आहे.'

'पिग्मासाठी टोटल इन्वॉल्मेन्टचा कन्सेप्ट तू माझ्या अपेक्षेपलीकडे सक्सेसफुल केलास. मला त्या सर्वाबद्दल अजूनही किती वाटतं. पण बिझनेस वर्ल्डमध्ये नवे नवे ॲटिट्यूडस येतच राहाणार. पुन्हा सांगतो हरणारी लढाई लढू नये हेच बरोबर.'

'सुदैवाने फिनॅन्शीअली तू खूप साउंड आहेस, पुण्यात तुझं छान घर वगैरे आहे हे चांगलं आहे.'

'राजीनामा द्यायलाही करेज असावं लागतं. तुझ्यापाशी ते आहे हेच दाखवून दिलंस ' कॉंग्रॅट्स ! '

'प्लीज कन्वे माय लव्ह टू मिसेस श्रीवास्तवा.'

'पिग्माच्या मॅनेजिंग डिरेक्टरांनी नि मालकांनी करण्यासारखी माझ्यासाठी फारच लहान गोष्ट ठेवली होती.

मी ती करून टाकली.

राजीनामा देऊन टाकला.

आयुष्यातलं एक पर्व संपलं असंच मानून आम्ही पुण्याला परतलो. निर्धाराने सारं विसरायचं ठरवून. तरीही सुझाची आठवण मधून मधून खूप अस्वस्थ करायची.

आजारी पडायचं सोंग करून गेली ती परतलीच नव्हती.

आम्ही त्या तसल्या भयानक वावटळीत सापडलो होतो. कुणाशी संपर्क साधता आला नाही. साधता आला असता तरी साधला असता असंही नाही. विचार आम्ही एवढाच करत होतो की आपल्याबरोबर आणखी कुणाची परवड नको.

याच विचारानं सुझाशीही कोणताच संपर्क साधला नाही.

एक विचार अस्वस्थ करायचा. स्वतः सुझा आमच्यापासून कशी दूर राहिली ? नंदिता म्हणायची एक एक घडत गेलं ते कल्पनेपलीकडे भयानक असंच. पोर भ्याली असेल. भिऊन लांब राहिली तेच बरं. आपल्याबरोबर ती आणि भरडून निघायला नको होती.

तरीही कधी नंदिताला वाटायचं तिच्या घराकडे फोन करून तिची नुसती चौकशी तरी करावी. जीवाला फार त्रास करून तो विचार मागे रेटायची.

आणि अचानक एक दिवस अभावितपणे सुझा दिसली.

इट वॉज ॲन अनबिलिवेबल ॲण्ड रादर एक्साय-टिंग एक्सपीरिअन्स टू विटनेस हर फोटोग्राफ इन टाइम्स ऑफ इंडिया.

नि सुझा एकटी नव्हती. तिच्या सोबत बानूही होती.

टाइम्समधली ती घोषणा नि त्या घोषणे सोबतचा सुझा नि बानूचा फोटो !...ही वस्तुस्थिती आहे हे पटवताना फार त्रास झाला.

नंदिताला हाक मारली. माझ्या आवाजातील एक्साइटमेन्टने नंदिता क्षणभर भ्याली. तो फोटो पाहिला नि अधिकच चक्रावली. मग मात्र न राहावून आम्ही सरळ सुझाच्या घराकडे फोन लावला.

मिळालेली सारी माहिती मती गुंग करणारीच होती. बानूसह सुझा आताशा मुंबईत वास्तव्य करून होती.

मधल्या काळात सुझा बानूला घेऊन थेट मुंबईला पोहोचली होती. जरनॅलिस्ट असोसिएशनशी संपर्क साधून तिने एमडींच्या जरनॅलिस्टची माहिती मिळवली होती. बरेच कष्ट करून काही तपशील मिळवले होते. ज्यांच्या आधारे हा माणूस जरनॅलिस्ट म्हणून स्वतःची न्युसन्स व्हॅल्यू निर्माण करीत, त्या आधारे कुणाकुणाला ब्लॅकमेल करीत कसा जगतो त्याची स्टोरी तयार केली होती. थेट टाइम्सच्या एडिटरच्या पुढ्यात नेऊन ठेवली होती.

त्या स्टोरीत बानू, सूर्यभान, नंदिता नि मी अशा सूत्रातून गुंफलेली पिग्माच्या रिसर्च इन्स्टिट्यूटमधली स्टोरी प्रमुख होती. नि बानू हा त्या स्टोरीचा जिवंत पुरावा सुझा मोठ्या जिद्दीने स्वतःपाशी सांभाळून होती.

जरनॅलिझमला काळिमा लावणाऱ्या त्या पत्रकाराचं नि त्याला पोसणाऱ्या बिझनेसवर्ल्ड नि राजकारणातील माणसांनाही बुरखे ओढणारी स्टोरी सुझा बानूसह टाइम्सच्या एडिटरला सादर करीत असल्याचा फोटो छापून, संडे टाइम्सला हप्त्या हप्त्याने स्टोरी प्रसिद्ध

होणार असल्याची ती जाहिरात होती.

दुपारी बंगलोरहून मला फोन आला.

फोनवर पुन्हा एकदा घनःश्यामदासजी गगराट बोलत होते. हे मी काय आरंभलं आहे म्हणून विचारत होते. धिस इज नॉट अ फेअर गेम म्हणत होते. हरणारी लढाई लढू नये म्हणून मी सुझाला सल्ला द्यावा असा सल्ला मला देत होते.

मी त्यांचं बोलणं तोडून शांतपणे त्यांना म्हणालो,

'घनःश्यामदासजी आता थोडं माझं ऐका. या देशातल्या लोकांना महाभारत नवं नाही. त्यामुळे लढाईचा तुम्ही सांगता तो पाश्चात्य विचारच अंतिम मानायचं कारण नाही. लढाई हरणार का जिंकणार याचा विचारही न करता लढणारी माणसं महाभारत काळापासून आपल्याला ठाऊक आहेत. अन्यायाच्या चिडीने चक्रव्यूहात घुसणारा एखादा अभिमन्यू असू शकतो. घनःश्यामदासजी कौरव शंभर असू शकतात, तसेच पाच का होईना पांडवही असतात हे सत्य आपण विसरू नये. नि एखादा अभिमन्यू पांडवांच्या पोटीच जन्म घेतो, कौरवांच्या नाही.

सुझा लढाई हरणार आहे का जिंकणार आहे ते काळच ठरवील. पण हरणारी लढाई पाहायलाही एक आत्मबळ लागतं. राजीनामा देतानाचं तेच करेज याही वेळी मला उपयोगी पडणार आहे.

जाऊ द्या घनःश्यामदासजी, आपल्यापैकी प्रत्येकजण एक एक रोल घेऊन जन्माला येतो. तुम्ही कौरव-पक्षाकडे आहात नि त्यात पुन्हा तुमच्याकडे धृतराष्ट्राचा रोल आला आहे त्याला तुम्ही काय करणार ?

आपण आपापला रोल करत राहूया. कसं ?'

नि मी फोन बंद केला.

बोलताना बोलून गेलो.

पण सुझाचं हे धाडस चक्रव्यूहात शिरणाऱ्या त्या अभिमन्यूसारखंच आहे हा विचार मनातून जाता जाईना.

कळत नव्हतं, मला या सुझाचा अभिमान वाटतो आहे का काळजी?

■

# धा गा

## सानिया

– १ –

डॉक्टर वेदान्त राव अनेक वर्षांनी भेटलेल्या खास त्याच्यासाठी दूरवरून आलेल्या आपल्या चुलतबहिणीला म्हणाला, "केवळ माझ्या कामात मला विलक्षण रस आहे. गती आहे. त्याखेरीज दुसरं कुठलं क्षेत्र निवडावं असं मला कधीच वाटलं नाही, समज आली तेव्हापासून प्रयोगशाळा ही मला घराहून अधिक प्रिय आहे. तिथे मला समाधान मिळतं, शांति लाभते, तिथे मी दिवसाचा बहुसंख्य भाग घालवतो. कधी रात्रीचाही. तिथेच मला मरणही यावं अशी माझी इच्छा आहे."

प्रतिमा भयचकित होऊन त्याच्याकडे पाहात राहिली. मरण यावं म्हणजे काय! तितकं त्याचं वय निश्चित नाही. अजून पुष्कळ वर्षं जायची आहेत, काम करायचं आहे, याहून अधिक यश आणि सन्मान मिळायचे आहेत. मग अजून पंचवीस-तीस वर्षांनी सत्तरी ओलांडलेला म्हातारा समाधानी डॉक्टर वेदान्त राव मृत्यूच्या आधीन होणार आहे. शांतपणे, समाधानी वृत्तीने. प्रतिमा हसून म्हणाली, "ते सगळं तर झालंच पण मी फक्त सकाळी चालत जायचं म्हणत होते. लवकर उठून, सूर्योदय व्हायच्या आधी लांबवरची फेरी घ्यायची. इतकी स्वच्छ नितळ हवा मी तर एरवी पाहातही नाही. थोडा ऑक्सिजन फुफ्फुसात भरून परत गेले तर बिघडणार नाही."

त्यानं मान हलवली.

"पण तू तर उठतोस पहाटे साडेचारला."

"ते अभ्यासाला?"

"अभ्यास?"

"का? मनुष्य जन्मभर विद्यार्थीच राहायला हवा प्रतिमा. मिळवण्यासारखं एवढं असतं...एवढं की अनेक आयुष्यं मिळूनही ते पुरणार नाही. सकाळचे दोन तास मला स्वतःला लागतात. कुणी त्रास दिलेला मला खपत नाही. माझी ती समाधीच असते. दिवसाची सुरुवात स्वच्छ मनानं ज्ञानाचे कण वेचत करायची.

प्रतिमाला त्याच्या भाषेचं आश्चर्य वाटलं. परत जाऊन या सगळ्या गोष्टी घरी सांगायला ती अधीर झाली होती. आपण सगळे समजतो तसा वेदान्त मुळीच नाही. 'पण प्रतिमा, तुला ते ओळखता आलेलं नाही.' नाही, नाही. तुमची सगळ्यांची चुकीची कल्पना आहे. तो एवढा मोठा शास्त्रज्ञ. त्याचं नाव घेतलं की सगळे आदरानं माना डोलावतात. त्याचं श्रेष्ठत्व मान्य करतात. 'हे सगळं जगासाठी आहे प्रतिमा. त्याच्या व्यासंगाबद्दल वा बुद्धिमत्तेबद्दल प्रश्नच नाही. आहे तो मोठा शास्त्रज्ञ. मिळालं आहे यश त्याला. पण त्यासाठी त्यानं सगळ्या कुटुंबाचे पाश तोडून टाकायला हवे होते का? स्वतःच्या आईवडिलांपासून तर कॉलेजमध्ये असल्यापासूनच या ना त्या कारणानं दूर राहतो आहे. पण बाकी कुणाशीही संपर्कही ठेवू नये? भेट, पत्र कधी येणं जाणं?' 'नाही, तसं करण्यात त्यानं का श्रम नि वेळ फुकट घालवावा? त्याचं काम खूप आहे. त्याला पुरून उरायला शिवाय.... 'आणि एक महत्त्वाचं तू विसरतेस प्रतिमा. उमाचं काय? अजूनही आम्हाला खात्री नाही की वेदान्तानंच तिला जाळून मारलं की ती स्वतः जळून गेली आणि तसं असलं तरी का? तिनं आत्महत्या केली, असं गृहीत धरलं तरी पण मग... '

प्रतिमा हताश झाल्यासारखी म्हणाली, "मग मी एकटीनंच जायला हवं. तुझ्याकडे गजराचं घड्याळ आहे की. उठवशील मला?"

"घड्याळही नाही नि उठवणारही नाही," वेदान्त म्हणाला, "मी सांगितलं तुला, मी एकदा उठून वाचत बसलो की बसलो. आणि घड्याळाची जरूर कधी लागली नाही. तू मनात निर्धार केलास उठायचा तर सहज उठशील. हव्या त्या वेळेला."

पण प्रतिमाची खात्री नव्हती. सुट्टीच्या दिवशी आरामात साडेआठ नऊपर्यंत लोळत राहणं हा तर

आवडीचा कार्यक्रम. अगदी पूर्वी प्रश्न नव्हता, आई विशेष म्हणायची नाही काही, पण नंतर सकाळचा चहा तिनंच करायला हवा, अशा अपेक्षेत तिच्यावर नाराज असलेल्या विनयसारख्या नवऱ्याकडे दुर्लक्ष करायला ती हळूहळू शिकली, तरी ते लोळणं तितकंसं सुखावह राहिलं नाही.

ती म्हणाली, "बघीन प्रयत्न करून."

"मग संपलंच. तुझ्या बोलण्यातच निर्धार नाही. कशी उठशील मग ?"

"दाखवू का उठून मग ?"

"त्यानं माझ्यात काय फरक पडणार ? इट डझन्ट सिम्पली कन्सर्न मी" डॉक्टर वेदान्तराव सहज म्हणाला.

प्रतिमा समजत होती तितकं उठणं कठीण गेलं नाही. तिनं मनात वेळ ठरवली नव्हती. त्यामुळे सव्वासहाला सूर्य उगवल्यासारखाच बाहेर प्रकाश होता. तिनं ठरवलं की चहाकॉफीची खडखड आत्ता करा कशाला. उगीच वेदान्त डिस्टर्ब झाला तर काही चिडायचा वगैरे म्हणून तशीच चपला घालून ती बाहेर पडली. गवतावर दव पडल्याने ते ओलं दिसत होतं. मंद, गार वारा सुटला होता. तिनं नकळत हात छातीवर बांधून घेतले. पेपरवाला उगीचच सायकलची घंटी मारत गेला. एक वृद्ध गृहस्थ काठी टेकवत तिच्याकडे कुतूहलात पाहात पाहात पार झाले. दोघेजण मागून पळत आले नि तिला सहज ओलांडून गेले तेव्हा ती जरा दचकलीच. चालवंसं वाटत होतं पुष्कळ. पण एकटीनं लांब जावं की नाही याचा निर्णय होईना.शिवाय सूर्य वर आलाच होता त्यामुळे हवा किंचित् ऊबदार होत होती.

परतताना तिच्या लक्षात आलं की, ती का इतक्या लांबवर वेदान्तला भेटायचं म्हणून आलेली आहे. घरी तिकडे सगळे तिला हास्यास्पद ठरवत म्हणाले होते, की उगीच काहीतरी भलतं वेड डोक्यात घेतलं आहेस झालं तू. पण तिनं निग्रहानं ठरवलंच होतं की, या वेळी जायचंच. तसं तर पूर्वीही मनात आलेलं होतं, पण वेदान्तची भेट नव्हती कितीतरी वर्षं. तो कसा दिसतो किंवा बोलतो हे देखील माहीत नव्हतं. एखादा आठवतो तेव्हा त्याचा आवाजमुद्धा मनात उमटतो आणि विशिष्ट हालचाल, चालण्याची, बसण्याची, उभं राहण्याची लकब लक्षात राहिलेली असते याची जाणीव प्रतिमाला प्रथमच झाली. त्यामुळे हातात दिवस मिळताक्षणी तिनं तिकीटही काढलं आणि आधी अर्थात् पत्र लिहिलं पण वेदान्तनं उत्तर पाठवलं नाही. तिनं त्या भीतीमुळे आधीच 'मी येतेच आहे' असाच मजकूर लिहिला होता. तिच्या मनाचं समाधान झालं की मग उत्तर लिहिण्याची आवश्यकताच नाही.

वेदान्तचं टक्कल पडू लागल्यामुळे मागे मागे गेलेलं कपाळ, चष्म्याआडचे एकदम पुढे आल्यासारखे दिसणारे किंचित वटारलेले डोळे, सरळ निमुळतं नाक, थोडे पातळच भासणारे ओठ, सारखी कोटाच्या खिशात हात घालायची सवय, किंचित पडलेले खांदे त्यामुळे पाठीला नकळतच आलेला बाक... या सगळ्या गोष्टी प्रतिमाला चकवून गेल्या. तिनं कधी त्याचे फोटो पेपर-मासिकात पाहिले होते. घरी आईकडे होते ते लहान-पणचे फोटो, फॅमिलीसकट पण विशेष नव्हेत. प्रतिमाच्या लक्षात आलं की, आपल्या मनात वेदान्तबद्दल अगदीच अंधुक कल्पना होती किंवा नव्हतीच जवळ जवळ आणि तो जो प्रत्यक्षात पुण्यात दिसला सर्वप्रथम तो एकदम एकाच वेळी ओळखीचाही वाटला खूप, कदाचित नातं मनात पक्कं असल्यामुळे, आणि अनोळखीही वाटला ते बहुधा भेटी फारच कमी असल्यामुळे.

आता फिरून परतताना तिनं लांबून त्याचा बंगला पाहिला. लहान, थोडा जुना पण बाहेरच्या झाडावेलीत दडून गेलेला. तशी आत फारशी बाग वगैरेही नव्हती जी झाडं रोजच्या पाण्याशिवाय वाढतात तेवढी मुकाट्यानं वाढलेली. शिवाय बरीच जागा त्याच्या जुन्या फियाट मॉडेलनं व्यापलेली, जिची फारशी निगाही राखल्या-सारखी दिसत नव्हतीच.

प्रतिमा दार ओढून गेली होती. आता हॉलचं दार उघडच होतं आणि वेदान्त पेपर वाचत बसलेला होता. समोर चहाचा ट्रेही होता. तिच्या मनात आशेनं आलं की त्या किटलीत तयार चहा असेल आपल्यासाठी तर किती बरं होईल. पण तो नसणारच हे आता एकदोन दिवसातच तिला कळून चुकलेलं होतं. तरीही तिला तो ट्रे तसाच तिथे टाकवेना. तो उचलून तिनं आत नेला आणि विचारलं, "तुला पुन्हा चहा हवा आहे का ? माझा मी करणारच आहे."

"नको" त्यानं मान वर केली नाही.

"आणि काही ब्रेकफास्ट ?"

"मी सकाळी काही खात नाही."

"पण मी करते न काहीतरी."

"नो थँक्स."

प्रतिमा आत आली. हा मुद्दा तिच्या आधीच ध्यानात यायला हवा होता खरा, पण तो इथे आल्यावरच आला की वेदान्ताच्या घरी स्वयपाक वगैरे होतो का? की तो बाहेरच जेवतो रोज सकाळ संध्याकाळ? त्याच्या घराच्या स्वयंपाकघरात गॅस होता, हॉटप्लेट आणि इलेक्ट्रीकची केटलही होती, टोस्टर होता आणि बाकीची भांडीकुंडी, कटलरी सगळं बहुतेक होतं. मग तिला आठवलं की उमानं दोन-तीन वर्षे वेदान्ताबरोबर संसार केलेला आहे पण बऱ्याच वस्तू तशाच न वापरता पडून असाव्यातशा दिसल्या. मग त्यानं सांगितलं की सकाळी तो चहा करून घेऊन जातो. तो एकदम त्याच्या इन्स्टिट्यूटच्या कॅन्टीनमधे दुपारी जेवतो, संध्याकाळी कधी बाहेर, कधी कुणाकडे डिनर वगैरे असेल तर कधी घरी येता येता ब्रेड, फळं, अंडी आणून टाकायचं त्यावर. त्याच्याकडे कुणी नोकर नव्हता. तो स्वतः कधी पंधरा-वीस दिवसांतून घर साफ करायचा तेवढंच. रोजचे कपडे हाताबरोबर धुवायची सवयच होती, व की सगळे लॉन्ड्रीत जायचे. दोन-तीन दिवसांनी सिंकमधली भांडी धुवायची. आठवण झाली तर लगेच हाताबरोबर.

डॉक्टर वेदान्त राव काही वर्षे अमेरिकेत राहिलेला होता, एकटा. अर्थात, रिसर्चमध्ये स्वतःचं देहभान हरपून, पैसा आणि यश कमावत. तो परत येईल असंही कुणी गृहीत धरलेले नव्हतं. पण तो आला खरा आणि इथे लांब, सगळ्यांपासून दूर, स्वतः जवळजवळ नावारूपाला आणलेल्या इन्स्टिट्यूटलाच आयुष्य मानत राहिला.

प्रतिमानं तिथेच कट्ट्याशी उभं राहून चहा घेतला. ती बाहेर गेली असती तरी वेदान्त तिच्याशी काही बोलला नसता. सकाळची वेळ अर्थात गप्पा मारण्याची नव्हती. तिनं भांडी, कप धुवून टाकले. काय स्वयंपाक करायचा, त्यासाठी काय आणायला लागेल दुकानातून याचा विचार केला. दोन दिवस रात्री फक्त, घरी तिच्या हातचं जेवूनही वेदान्त एकदाही घरचं जेवण खाल्लं, समाधान झालं वगैरे म्हणाला नाही. अन्नाशी त्याचा चवीनं संबंध नव्हताच. प्रतिमानं घरी जेवण बनवावं अशीसुद्धा त्याची अपेक्षा नव्हती. तिला इतकं आश्चर्य वाटलं. पण फक्त तेवढंच. राग किंवा खेद वाटला नाही. मनात केवळ आलं की तरीही उमानं स्वतःला जाळून घेण्याजोगं यात काही नाही. तिला सहज यातून बाहेर पडता आलं असतं. वेदान्ताला सोडून देणं फार सोपं होतं.

प्रतिमानं बाहेर गाडी सुरू झालेली ऐकली. वेदान्त निघून गेला. ती मग बाहेर आली. पेपर चाळला. एका-एकी तिला रिकामं, गळून गेल्यासारखं झालं. जणू आता तिला या घराची सवय झाली होती, नावीन्य सरून गेलं होतं आणि ती ज्यापासून पळायचा प्रयत्न करीत होती ते सगळे प्रश्न तिच्या पुढ्यात सावकाश उभे राहिले होते.

मघाशी चालताना तिला आपण का आलो याचं उत्तर मिळालं पण त्यापुढची उत्तरं दडूनच राहिली. तिची एक नोकरी गेली होती, दुसरी अजून मिळाली नव्हती. ज्यासाठी तिनं दोन-चार ठिकाणी अर्ज केले होते पण तिची खात्री नव्हती की नोकरी सहज मिळेल. कारण जिथे जिथे ती जाणार होती त्या त्या ठिकाणी कुणी अगदी सहजपणे चेहऱ्यावर पांढरे डाग स्पष्टपणे पसरू लागलेल्या स्त्रीला न चाचरता आपल्या ऑफिसमध्ये लावून घेणार नव्हतं, तो योग येईपर्यंत कदाचित पुष्कळ दिवसही लागणार होते. याशिवाय विनय, ज्याच्याबरोबर उमेदीनं सुरू केलेलं आयुष्य तुटत जात ना तिला आत अगदी स्पष्ट जाणवत होतं आणि तिची दोन्ही मुलं, जी जवळजवळ आता आईकडेच लहानाची मोठी होत होती; त्यांच्याशी तरी तिला संवाद कुठे साधता येत होता?

आपल्या प्रश्नांची उत्तर मिळवायला जणू लांब एकटीनं ध्यान चिंतन करायला यावं तशी ती वेदान्तच्या घरी आली होती. तिच्या पत्राला उत्तर न देताही वेदान्त आपल्या घराचा दरवाजा उघडून म्हणाला होता, "ये मला आताच एका मिटींगला जायचं आहे. मला शंका होती त्या आत तू येते आहेस की नाही. अशा मिटींगन् टाळाव्यात असं वाटूनही उपयोग नसतो. त्यापेक्षा मी माझं काम करीन असं म्हटलं तरी चालतं आहे कुणाला? जायला हवंच...."

प्रतिमाला वेदान्तचं दर्शन चकवून गेलं, त्याचा आवाज परिचित अर्थातच नव्हता आणि मुख्य म्हणजे त्याची नजर जी एका संशोधकाची असूनही तिनं तिच्या चेहऱ्याची दखल अजिबात घेतली नाही. बेफिकीरीनं. साधी उत्सुकता, आश्चर्य, घृणा, दया, कुतूहल कुठल्याही रंगाशिवाय जी सहज ओघळून गेली, तिनं प्रतिमाच्या मनात आश्वासक आशेचे किरण दाखवले आणि ती त्याच्या घरात शिरली.

प्रतिमाला कुठेही घरात उमाच्या काहीही खुणा दिसल्या नाहीत. तिचा फोटो नव्हता, वस्तू, कपडे काहीदेखील नव्हतं. जणू तिथे कुणी स्त्री राहिलेलीच

नव्हती. केवळ एक घराची इमारत ज्यात सोयीनं कुणी रहात होता, झोपायला जागा हवी म्हणून, स्वतःच्या वस्तू ठेवायला काही सोय हवी याकरता. प्रतिमाच्या मनाला त्यानं भुरळ घातली. हे किती सहज-नैसर्गिक आहे, तिच्या मनात आलं. नाहीतर आपण धडपडत राहतो आपल्या मनासारखं घर उभं करायला. प्रतिमाची बहुतेक सगळी स्वप्नं आता विरत आली होती. वय आणि परिस्थितीबरोबर. शरीरावरचे डाग जसे अधिक स्पष्ट होत गेले तशी मनानं धरलेली आशा क्षीण होत गेली. वाटायला लागलं की सगळे आपल्याला हीन लेखतात, जे आज तसं करत नाहीत ते निश्चित उद्या करतील. विनय म्हणाला की खरा रोग तिच्या शरीरावरच्या कातडीत नाही तर आत मनाला लागलेला आहे जे दिवसेंदिवस दुबळं, संशयी, आत्मघातकी बनत चाललेलं आहे. यावरून तर प्रतिमाची खात्रीच झाली की तिच्या-विनयच्या संबंधाला आता कायमचे तडे गेले आहेत. दोन्ही मुलं तिनं आशा केली होती तशी निरोगी, व्यवस्थित होती, पण तिच्या स्वतःच्या भीतीखाली त्यांच्याशी काही संवादच कधी साधता आले नाहीत. ती नोकरीच्या नावाखाली सकाळी त्यांना आईकडे सोडून यायची ती हळूहळू संध्याकाळी परत आणणं टाळू लागली. मग आठवडे गेले. पंधरवडे उलटले, यावरूनही विनयशी पुष्कळ मतभेद झाले. ते सगळं जाणवून तर आई अधिक जागरूक झाली आणि मुलांनी तिच्याकडेच राहिलेलं बरं म्हणाली. प्रतिमाच्या मनात धास्तीनं घर केलं की विनय आपल्या मनाविरुद्ध, कधीतरी संधी साधून मुलांना पळवून नेईल, फितवेल. जी गोष्ट फार सोपी आहे. कारण मुलांना आईपेक्षा वडिलांचाच लळा अधिक आहे, मग ती तिघंही तिच्यापासून लांब जाऊन राहतील. तिचा संपर्क टाळून ती अस्तित्वातच नाही असं समजून, तिच्याविरुद्ध कट केल्याप्रमाणे. तिनं आईला सूचना द्यायचा प्रयत्न केला, पण आईनं समजून घेतलं नाही. विनय असा मनुष्य नव्हताच की जो भलतंच काही करेल; ती म्हणाली. पण प्रतिमाला कुणाची खात्री वाटली नाही, स्वतःची देखील नाही.

आता वेदान्ताच्या घरात उमाच्या खुणा कुठे दिसतात हे बारकाईनं पाहताना तिला स्वतःलाच लक्षात आलं नाही की हे आपण का करतो आहोत. उमाची फारशी आठवण तिच्या मनात नव्हती. एक अस्पष्ट फोटोसारखं चित्र होतं ज्यात गळ्यात हार घातलेलं नवं लग्न झालेलं जोडपं फुलांनी सजवलेल्या स्टेजवर गंभीर, अलिप्त, थकलेल्या अनोळखी नजरेनं बसलेलं आहे. पण तो पाहिलेला फोटो आहे किंवा खरीच तशी आठवण मनात आहे किंवा आपणच तयार केलेलं ते काल्पनिक चित्र आहे याची तिला खात्री नव्हती. त्याला स्पष्ट करण्याजोगा एकही खरा पुरावा तिला घरात आढळला नाही.

प्रतिमानं वेदान्ताच्या झोपायच्या खोलीत आपणहून आवराआवर केली. जिकडे तिकडे पसरलेली पुस्तकं, फायली, कागद, पेनपेन्सिली आवरून ठेवल्या. लहानपणी ती शाळेत पुष्कळ हुशार होती. गणित, सायन्स हे भाषांपेक्षा तिचे आवडीचे विषय होते. पण पुढे त्याचं काही झालं नाही. आता डॉक्टर वेदान्त रावची अनेक पुस्तकं तिला अनाकलनीय पण विलक्षण आकर्षक, जगाचे चमकदार तुकडे असल्याप्रमाणं वाटली. ती स्वतः बी. एस्सी. झाली, पण पुष्कळ प्रयत्न करूनही तिला फर्स्टक्लास मिळवता आला नाही. तिनं स्वप्न पाहिली होती. तिला बुद्धिमान म्हणवून घ्यायला फार सार्थ वाटलं असतं. विशेषतः बाराव्या वर्षी मांडीवर आढळून आलेल्या अगदी लहानशा पांढरट डागाच्या शोधानंतर तिची आई डॉक्टरांकडून आल्यावर म्हणाली होती की त्यांनी खात्रीपूर्वक सांगितलं आहे हे काही घाबरण्याजोगं नाही, डाग तसेच राहतील, जातीलही, कदाचित वाढलेच पुढे मागे तरी त्यात काही भयंकर नाही, ते संसर्गजन्य नाहीत, तिच्या मुलात पुढे येतील असंही नाही. पण प्रतिमाचं समाधान झालं नाही. ती आईला म्हणाली की काहीही होवो, ती असं काही साध्य करून दाखवेल की सगळ्यांनी म्हणायला हवं...म्हणायला हवं... प्रतिमाला आता ते शब्दही आठवले नाहीत. वर्षामागून गेलेल्या वर्षाखाली ते गाडले गेले होते.

वेदान्तच्या पुस्तकांची पानं तिनं उलटून पाहिली. आपण काय म्हणालो होतो तेव्हा आईला, तिने त्रासलेल्या आश्चर्यात स्वतःवर ओरडून विचारलं, तेवढंही आठवत नाही? तिला चकवून लांब, हातापलीकडे गेलेल्या त्या जगाच्या खुणा जणू तिला चिडवून दाखवू लागल्या. वेदान्तचं घर तिला परकं वाटलं, ओळख असूनही ती न दाखवणाऱ्या शिष्ट माणसाप्रमाणे.

संध्याकाळी तिनं वेदान्तसाठी चहा तयार ठेवला. तो आल्यावर ती सहज म्हणाली,

"मी आज सगळं घर झाडून काढलं.भिंतीवर केवढी कोळीष्टकं जमली होती."

"असं?" वेदान्त उत्सुकता न दाखवता म्हणाला, "असतील."

"आई घर फार स्वच्छ ठेवते. तुला माहीत असेलच."

"मला?" तो म्हणाला, "मला काय माहीत. मी कधी तुमच्या घरी राहिलो नाही. मला माझंच घर आठवत नाही.'

वेदान्तचे वडील आता नव्हते. आई दुसऱ्या मुलाकडे होती. प्रतिमा म्हणाली, "सगळे म्हणतात, तू तोडून टाकलंस. मुद्दाम एकटा, लांब राहिलास." तिला असं म्हणता म्हणता त्याला सुचवायचं होतं की ते तिला स्वतःला कसं वावगं वाटत नाही, त्याची बाजू घेऊन ती कुटुंबात कशी बोललेली आहे. पण त्याआधी वेदान्त म्हणाला, "काय संबंध? काय हक्क त्यांना असं म्हणायचा? मी कुणाकडे कधी आलो आहे का हात पसरून? माझं मी मिळवलं. माझा मी राहिलो. तुमचं काही देणं घेणं नाही या कशाशी.'

प्रतिमा त्यानं सगळ्यात आपल्यालाही सामावून टाकलं, यामुळे नाराज झाली. 'माझ्याही घरात जेव्हा माझी मुलं...' तिचं काही बोलणं पूर्ण व्हायच्या आत वेदान्त उठला आणि म्हणाला, "मला कशात इंटरेस्ट नाही. घर, कुटुंब, नवरा-बायको-मुलं, काका-मावश्या हे सगळं मी केव्हाच मोडून टाकलं आहे. उगीच काही-तरी रटाळ कुटुंबकथा सांगत बसू नकोस. म्हणून तर मी कुठे जात नाही, कुणाला बोलवत नाही."

प्रतिमा कशीबशी म्हणाली, "पण मी तर तुला पत्र लिहिलं होतं"

"मग?" तो उद्धट स्वरात म्हणाला, "तू पत्र लिहिलंस. आलीस. मी काही बोलावलं नव्हतं तुला. हा तुझा प्रश्न आहे. इथं रहायला माझी ना नाही. घर मोठं आहे." त्यानं हात पसरला. "हवं तर रहा. नको तर चालती हो. पण मला कुठल्या कौटुंबिक गोष्टीत गुंतवू नकोस. मला ते मुळीच आवडत नाही. माझं काम हे माझं आयुष्य आहे. त्यात कुणी ढवळाढवळ केलेली मी खपवून घेणार नाही."

रागवल्यासारखा तो ताड ताड चालता झाला. प्रतिमा बधिरल्याप्रमाणे काही वेळ बसून राहिली. यातून पुढे कसं जायचं याचा तिनं विचार केला. एखाद्या आव्हाना-प्रमाणे ती ते मनात उलटसुलट पेलत राहिली. मग स्वतःला झालेलं समाधान आणि आनंदाचा नकळता लहानसा प्रवाह तिच्या लक्षात आला. रागावून बोलला असला तरी वेदान्त तिच्याशी केवळ एक दुसरी व्यक्ती म्हणून बोलला होता. तिच्याशी असलेलं तथाकथित नातं, तिचं रूप, डाग, तिचा नवरा-मुलं, कुटुंबातले ताणाव नोकरी-पैसा त्याला तिच्या कुठल्याही गोष्टीशी कर्तव्य नव्हतं. आल्यापासून त्यानं तिला काही एका शब्दानंही विचारलं नाही. तिला दोन मुलं आहेत आणि तिची नोकरी गेली आहे आणि तिला स्वतः काही करून पैसे मिळवल्याखेरीज सुरक्षित वाटत नाही आणि विनयशी तिचे संबंध बिघडलेले आहेत या गोष्टी त्याला माहीत तरी

आहेत का? तिनं मनात नवल केलं आणि तो अनोळखी परकेपणा तिला एकाएकी आवडू लागला. जणू स्वतःच प्रश्नांनी भरलेलं जग मागे ठेवून ती इथे आली होती. आता तिला उत्तरांचं ओझं वाटलं नाही.

त्या रात्री ती व्यवस्थित झोपली. खोलीच्या भिंती रिकाम्या, उजाड होत्या. खिडक्यांना पडदे नव्हते. एखाद्या हॉटेलच्या खोलीत रहावं, जिथे यापूर्वी अनेक-जण येऊन राहून गेले आहेत, असं वाटलं. तिला डॉक्टर वेदान्त रावच्या आयुष्याचा हेवा वाटला. इतकं यशस्वी स्वतःतलं यशस्वी आयुष्य. जिथे स्वतःला हवं आहे ते केवळ करत राहणं आणि बाकीचं सगळं जग दारं बंद करावं इतक्या सहजपणे बाहेरच्या बाहेरच ठेवून ... तिला झोप लागता लागता वाटलं की जो अंश वेदान्ताला मिळू शकला तो तिच्यात का उतरला नाही, एकाच कुटुंबातल्या दोन भावांकडे जन्म घेऊनही?

तरीही जाग येण्याआधी तिला स्वप्न पडलं त्यात ती एखाद्या महाराणीसारखी सिंहासनावर बसली होती. पुष्कळ लोक आजूबाजूला होते जे सेवा करायला तत्पर होते. तरीही स्वप्नात, तिच्या मनात त्यांच्याबद्दल केवळ द्वेष होता. ते तिच्याविरुद्ध कट करणार याची खात्री होती. त्यांनी एका गुलामाला साखळदंडांनी जखडून आणलं. तो वेदान्त निघाला. तिनं सिंहासनावरून हुकूम केला की त्याचा शिरच्छेद करा. आणि ती मनात दुःखी झाली.

जागेपणी तिच्या मनात एकप्रकारची खंत आणि खेद दाटून आला होता. त्या दिवशी रात्री वेदान्त घरी जेवायला आला नाही. बाहेर कुठे डिनर असावं. तो नीट काही म्हणालाही नाही. तिच्या मनात कुतूहल उमटलं की हा बाहेर कसा वागत असेल, त्याच्या इन्स्टीट्यूटमध्ये सहकाऱ्यांशी काय बोलत असेल? एखाद्या परग्रहावरच्या काल्पनिक आकर्षक व्यक्तीबद्दल त्याच्या भोवताला-संबंधी कुतूहल वाटावं तसं तिच्या मनात वेदान्ताबद्दल ते दाटून आलं. त्यात स्वतःचा न साधलेला सहभाग उमजला आणि तिच्या मनात निराशतेने जाणीव उमटली की ती आता केवळ एक अनाहूत पाहुणी म्हणून शिल्लक उरली आहे. तिनं स्वतः धाडसानं आपणहून घेतलेलं पाऊल हे आता अशा जवळजवळ ओशाळवाण्या स्थितीपर्यंत येऊन थांबलेलं आहे.

— २ —

सामान घेऊन गेट उघडण्याआधीच प्रतिमाला तो मुलगा आवारातल्या गवतात दिसला. ती एकाएकी ओरडली. 'कोण आहे? काय हवं आहे रे तुला?' मग त्या मुलामागे तारेच्या कुंपणापलीकडे ती बाई दिसली. तशी तरुण, लठ्ठ, केस मोकळे सोडलेली ती म्हणाली, "इकडे बॉल पडला म्हणून शोधायला आला आहे तो." तोपर्यंत प्रतिमा गेट उघडून आत आली होती. वेदान्ताच्या घराभोवतीच्या कुंपणापलीकडे इतकी मोकळी मोठी जागा पसरलेली होती की त्यामुळे भोवतालच्या घरांचं अस्तित्वही नजरेत येत नव्हतं. ती बाई म्हणाली, 'आम्ही तिकडे राहतो' तिनं त्यातल्या त्यात जवळच्या घराकडे निर्देश केला, "हा म्हणाला बॉल आला इथे म्हणून मागोमाग शोधायला आले." तिची नजर एव्हाना धीटपणे प्रतिमाचा चेहरा न्याहळत होती. प्रतिमाला तिचा तिरस्कार वाटला.

मुलगा म्हणाला, "नाही मिळत आई. मी पलीकडे बघून येतो." एका बाजूला कुंपणात भगदाड होतं तिथून तो नाहीसा झाला. ती बाई मात्र हलली नाही.

"खूप दिवसांनी कुणी दिसलं इथे डॉक्टरांशिवाय. एरवी कशाला आमचा संबंध येणार आहे? उमा होती तेव्हा...." प्रतिमानं चमकून पाहिलं. उमाचा इतका जवळचा उल्लेख तिला अपेक्षित नव्हता. आपण काय म्हणतो आहोत याची पुरेपूर जाणीव त्या बाईला असावी. चेहरा हसरा ठेवत ती म्हणाली, "शेजारीच ना आम्ही. उमा यायची कायम माझ्याकडे. मोठी लाघवी मुलगी. माझी धाकटी वहीणच समजायची मी तिला..."

प्रतिमा चाचरली, एकीकडे हे सगळं खोटं आहे असं वाटत असून अचानक मिळालेला हा धागा तिला हातातून सुटू द्यायचा नव्हता. ती म्हणाली, "तुम्ही आत का येत नाही? तिकडून गेटमधून?" ती बाई तत्परतेनं वळसा घालून आत आली. प्रथमच पहात असल्याप्रमाणे तिनं बागेतल्या झाडाझुडुपांचं निरीक्षण केलं. पायरीवरचा पाचोळा पाहिला. प्रतिमानं दार उघडलं. ती आत आली. हॉलभर चटकन् पहात म्हणाली, "काही बदललेलं नाही हो...पूर्वी मी आले होते काही वेळा. उमाच जास्त करून यायची आमच्याकडे. पण मला जसं आठवतं आहे तसंच आहे सगळं....तुम्ही मला रेणुकाच म्हणा. मी उमालाही सांगायची."

प्रतिमा सामान ठेवण्याच्या निमित्तानं आत गेली.

तिला क्षणभर समजेना की आपण करतो आहोत ते योग्य आहे किंवा नाही. पण उमाबद्दल जाणून घेण्याच्या जबरदस्त आसक्तीपुढे वेदान्तवर होऊ शकणाऱ्या अन्यायाची तमा तिला वाटेनाशी झाली. रेणुका तिच्या मागोमाग सहज आत येत म्हणाली, "आणि स्वयंपाकघर-सुद्धा... डॉक्टर स्वतःच करतात की काय सगळं ! असतीलही बाई... अशा बुद्धिमान लोकांचं काय सांगावं तऱ्हेवाईक असले तरी... पण तुम्हाला कधी पाहिलं नाही यापूर्वी इथे."

"मी त्यांची चुलतबहीण !" तिला ते सांगताना जणू एखादं खोटं नातं वापरल्यासारखं वाटलं. वेदान्त आणि तिच्यात कसलंही साम्य सापडण्याजोगं नव्हतं. रेणुकानं तिकडे विशेष लक्षही दिलं नाही.

प्रतिमानं विचारलं, "सरबत करू का ?" "चालेल" रेणुका म्हणाली, "त्या वेळेपासून हे घर जसं आहे तसंच आहे पण आतून बाहेरून.... आमच्या घरावर आम्ही मजला चढवला. रंग दिला.... पण इथे तोच तो जुना रंग. उमा असती तर एव्हाना... पण काय सांगणार कुणाचं नशीब कसं ते..."

प्रतिमा म्हणाली, "का ? यात नशिबाचा काय भाग येतो ?"

"नाही का ? इतक्या तरुण वयात असं मरण येणं भयानकच की हो.प्रत्यक्ष नवऱ्याच्या हातून..." रेणुकानं शहारल्यासारखं केलं. "उमा होतीच तशी. गरीब, भोळी."

प्रतिमाचा श्वास जलद झाला. तिला रेणुका काय म्हणणार ते जणू तिला आत बोलवण्याआधीच माहीत होतं आणि ते ती म्हणाल्यावर प्रतिमा स्वतः सर्व शक्ती-निशी वेदान्ताचं समर्थन करणार होती.

रेणुका म्हणाली, "इतकं मोठं नाव, सगळीकडे वशिला नि पैसा.... या बळावर सगळं दाबून टाकलं डॉक्टरांनी. मी म्हणते म्हणून राग येऊ देऊ नका हो. सगळे असंच म्हणतात. मला राहवलं नाही म्हणून तुमच्यापाशी म्हणाले. तुम्हीही एक बाई आहात. लग्न झालेलं दिसतंय, तुम्हाला जास्त चांगली कल्पना येईल."

प्रतिमा सरबत घेऊन बाहेर आली. रेणुका आपला लठ्ठ देह सावरत मागोमाग आली आणि ती समोर बसली.

प्रतिमा शांत आवाजात म्हणाली, "तुम्ही लोकांनी असं म्हणणं बरोबर नाही. वेदान्ताला मी जवळून ओळखते." हे म्हणताच तिचा स्वर भरून आला. वेदान्ताला कुणीच जवळून ओळखत नाही आणि त्यात आपणही येतो हे इतरांना माहीत असायचं कारणच काय ? पण ते म्हणताना तिला सार्थ अभिमान वाटला. एखादी आवडीची भूमिका समरसून करावी तसा.

"पण उमाला मी ओळखायची ना. खूपदा आलेली आहे ती माझ्याकडे. खूप बोललेली आहे. बिचारीच्या नशिबी सुख म्हणून नव्हतं."

"म्हणून काही, कुणी प्रत्यक्ष बायकोला मारत नाहीत." प्रतिमा एकाएकी रागावून म्हणाली, "तुम्ही कुणावर इतका गंभीर आरोप करता आहात माहीत आहे ना ? शिवाय तसा कुठे पुरावाही..."

"पुरावा हवा आहे कुणाला ? डॉक्टर राव पडले

---

## नवीन आजीव सभासद

(२२-८-८५ ते ६-१०-८५)

**पुणे विभाग :** सर्वश्री स्नेहलता अ. बुधकर, दत्तात्रय शं. गांगण, अभय सरोदे, वर्षा वि. वझे, शिवमाला शिरोळे, आसावरी मथुरे, विश्वनाथ बनारसे, उदय अ. गोरे, शिल्पा बांदिवडेकर, राम शिंदे, अच्युत दा. घोसपूरकर, श्रीपाद वा. शिराळकर, मुरलीधर भाटीया, शशिकांत रा. कुलकर्णी, सुनंदा दि. थोरात, गोविंद कात्रे, कन्हैय्यालाल शर्मा.

**पुण्याबाहेरील :** सर्वश्री वसंत वणकुद्रे (कोल्हापूर), श्रीनिवास नाडकर्णी, (फोंडाघाट कणकवली), गंगाधर अ. बुवा, श्याम रा. सोनटक्के, पुंडलीक क. देशपांडे, हणमंत व्यं. देशपांडे, हरिहर आ. आठलेकर, मनोहर आ. दिवाण (सर्व सावंतवाडीचे), दिलीप कुलकर्णी (नंदुरबार), भास्करराव जाधव (अहमदनगर), अनिलकुमार वा. आचार्य (पनवेल), गो. तु. पाटील (येवला), जीवन तु. अत्तरदे (जळगाव), सौ. सुमन ऋषीकुमार श्रीवास्तव (सोलापूर).

---

माणूसघाणे. कधी स्वतःच्या आईवडिलांना बोलावलं नाही इथं.उमाच्याही नातेवाईकांना बंदी होती.माझ्याकडे यायची ती गुपचुप, दुपारी. डॉक्टरांची चाहूल लागली की पसार व्हायची. त्यांना कुणाला घरी बोलवायला नको की स्वतः कुठे जायला नको. पण बिचाऱ्या उमाचे काय हाल होतात ते कळायला नको होतं का?"

प्रतिमाच्या घशाला कोरड पडली. तिनं सरवताचा ग्लास रिकामा केला. रेणुका मात्र व्यवस्थित, शांत बसली होती. प्रतिमाची खात्री झाली की ती केवळ निमित्त शोधून आली होती, तिच्या मुलाचा बॉल इकडे आलेलाच नव्हता, तिला प्रतिमाकरवी डॉक्टर वेदान्त राववर चिखल उडवायचा होता. ज्यापासून वेदान्त हुशारीने आजपर्यंत वचावला होता. तिनं मनात पुष्कळ जुळवाजुळव केली. ज्यायोगे वेदान्तला वाचवता येईल,पण थोड्यावेळानं तिला आढळून आलं की तिला काहीच म्हणता येत नाही, जशी स्वतःच्या अपयशी, सामान्य आयुष्याची कारणं शोधता येत नाहीत.

रेणुका वारकाईनं तिच्याविषयी विचारू लागली, तिचा नवरा—मुलं—व्यवसाय—घर मग समाधानानं म्हणाली, "इतक्या दिवसांनी का होईना कुणाला इथे पाहून बरं वाटलं.बिचाऱ्या उमाचा आत्मा शांत होईल."

"तो कसा काय?" प्रतिमानं चकित होऊन विचारलं.

"कुणालातरी सांगायचं होतंच मला. तेव्हा काय झालं की...काही झालंच नाही पहा. रात्री विचारी जाळली गेली. सकाळपर्यंत सगळं संपलंसुद्धा. वर पेपर-मध्ये अपघाती मृत्यू म्हणून बातमी. सगळे गुपचूप बसलेले. डॉक्टरांविरुद्ध कोण काय बोलणार? एवढा मोठा माणूस, त्याच्यावर कोण का संशय घेईल? घेऊन उपयोग काय!...मला फार वाटायचं मात्र. एवढं मी उमाला वहिणीसारखं मानत आले. तिच्या बाजूनं थोडं तरी काही बोलावं." रेणुकानं सुस्कारा टाकला. पदरानं डोळे, टिपल्यासारखे केले. मग ती म्हणाली, "तुम्ही या एकदा आमच्या घरी." प्रतिमा हो देखिल म्हणाली नाही. तिच्या मनात कडवट जहरी तरंग उमटले होते. रेणुका गेल्यावर तिनं पुष्कळ विचार केला. तिचा रेणुकेच्या एकाही शब्दावर विश्वास बसला नाही. वेदान्त इतकं अघोरी कृत्य करणं अशक्य आहे यावर तिचा गाढ विश्वास होता. रेणुकेचे शब्द आठवून तिचा तिळपापड उडाला. त्या वेळीच आपण उत्तरं द्यायला हवी होती. फाडफाड, तिला अस्वस्थपणे वाटलं पण आपण तर ती जे म्हणेल ते मुकाट्यानं ऐकून घेत राहिलो. तिला काय माहीत वेदान्त प्रत्यक्षात कसा आहे ते? त्याला उमाबद्दल प्रेम वाटत असणं अशक्य तर नाही. तो ही शेवटी एक माणूस तर आहे, भावनांचा एखादा कोपरा शिल्लक असलेला! पण प्रतिमा विचारात थकत गेली. रेणुकेला आपण आत बोलावलं तेच चुकलं. कोण कुठली ती. शेजारची लठ्ठ, निरुद्योगी बाई आणि आपण ते सगळं मुकाट्यानं ऐकत राहिलो. जणू ते ऐकण्यासाठीच तिला आत बोलावलं आणि वर काही उत्तर न देता, वर तिला सरवत पाजून तिची बोळवण केली. गप्प, अन्याय-कारक.

— ३ —

वेदान्तनं तिला जाता जाता स्टेशनवर सोडलं. ती वाटेत म्हणाली, "मी आले तसा तूही एकदा येऊन जा. सगळ्यांना आनंद होईल."

"नाही होणार" तो सहज म्हणाला, "माझ्याकडून कुणाच्या काही अपेक्षा असतीलसं वाटत नाही. तू आलीस याचंच मला आश्चर्य वाटतं. पण अर्थात तो तुझा प्रश्न आहे. उगीच भलती आशा करू नकोस. मी येणार नाही."

प्रतिमा पड खाऊन म्हणाली, "मला समजतं सगळं, पण तू संधीच देत नाहीस." "कसली संधी?" तो पुन्हा त्याच्या कठोर, रुक्ष आवाजात म्हणाला, "मला कुणाचे संबंध नको आहेत म्हणून सांगितलं ना एकदा. माझं काम पुष्कळ आहे मला. आयुष्यात दुसरं काही नको आहे."

ती निराशतेनं म्हणाली, "असं वाटतं तुला पण शेवटी..."

"इथेच सोडतो तुला. रस्ता क्रॉस केलास की स्टेशन. गाडी वळवत नाही. मला वेळेवर पोचायला हवं." त्यानं आपल्या मनगटावरच्या घड्याळात पाहिलं. तो घाईत होता. ती उतरली. आपण केवढ्या खुळचट आहोत हं तिला कळून चुकलं होतं, पण त्याची विशेष खंत मनात उरली नाही. तिनं त्याची गाडी रहदारीत मिसळून गेलेली पाहिली.

प्रतिमा स्वतःच्या जगात परतून आली तेव्हा, ती नसण्यामुळं कशात काही फरक पडलेला नव्हता. विनयशी जेमतेम संभाषण झालं. तो तिच्या जाण्यामुळं

चांगलाच नाराज झालेला होता.

"तुला वटायला लागलेलं आहे की हे घर म्हणजे धर्मशाळा आहे." तो ऑफिसला निघतांना म्हणाला, "तुझ्या मर्जीनं हवं तेव्हा हवं तिथे जायचं. कुणाची काही कदर नाही."

"माझ्यावाचून तुमचं कुणाचं अडतं आहे का?" तिनं विचारलं.

"तुझी म्हणून काही जबाबदारी आहे की नाही? मुलं, नवरा, घरदार...कशाची फिकीरच नसेल तर राहतेसच कशाला इथं?"

ती दुपारी आईकडे आली तेव्हा ती ही तेच म्हणाली. वेदान्तविषयी ऐकून घ्यायलाही तिची उत्सुकता दिसली नाही. "शेवटी तुझ्या मनासारखं केलंस. आता आणखी काय हवं आहे?" ती प्रतिमाला म्हणाली. संध्याकाळी मुलं शाळेतून परतल्यावर तिच्याबरोबर घरी जायला नकार देऊ लागली. प्रतिमा बिथरून म्हणाली, "तू माझ्या मुलांना लाडावून ठेवलं आहेस." आई उत्तरली, "एवढं होतं तर माझ्या डोक्यावर का घातलीस जबाबदारी? करायचं होतंस आपल्या आपण. असली काही मायाच लावायची नाही. वर आणखी दुसऱ्याला दोष."

तिच्या प्रलोभनांनाही मुलांनी दाद दिली नाही. तिला ती स्वतः जन्म दिलेली कुणी वाटेचनात. हार मानून ती एकटी परतली. विनय आलेला नव्हता. घरी तिनं काही दिवसांपूर्वी एके ठिकाणी दिलेल्या मुलाखतीचं उत्तर म्हणून दिलगिरी दर्शवणारं नकारात्मक पत्र आलेलं होतं. प्रतिमाचं मन हळूहळू एक प्रकारच्या धारदार संतापात पेटून उठलं. आरशात तिला स्वतःचा कुरूप चेहरा दिसला ज्याचा तिला धगधगीत द्वेष वाटला. कुठल्याही क्षुल्लक यशांनीसुद्धा तिला हुलकावण्या दिल्या होत्या. सतत वर्षामागून वर्षे उलटून गेली आणि तिला फरफटवत तशीच ओढत राहिली. तिनं मुठी घट्ट आवळून धरल्या. संताप, मत्सर यामुळे ती आतून बाहेरून काळवंडून गेली होती. या सगळ्याचं कारण तरी काय, तिनं ओरडून स्वतःलाच विचारलं, का म्हणून हे असं माझ्याच आयुष्यात व्हावं आणि इतरांच्या नाही? एक प्रकारची बेउत्तरी पोकळी तिला सर्वत्र जाणवली आणि हळूहळू पेटत जाणाऱ्या रागीट हिंसक वृत्तीच्या विळख्यात तिला वाटलं, याचा सूड म्हणून आपण काय करायला हवं? आपलं घर, नवरा, मुलं यांचं आयुष्य आपल्यासारखंच जळत गेलं तर काय होईल? तसं 'आपण' घडवू शकलो तर?

स्वतःतल्या त्या विनाशी प्रवृत्तीच्या अचानक, नकळता झालेल्या दर्शनानं ती चकित झाली. आतवर थरथरत गेली. स्वतःच्या जबरदस्त वृत्तीचा तिला मोहच पडल्याप्रमाणे झाला. ती सकाळीच तर आली होती आणि रात्रीपर्यंत तिला कुणीही साधी तिची गरज असल्याचं भासवलं देखील नव्हतं. स्वतःच्या नशिबाचा चरचरता संतापही वांझ ठरत गेला. ती आज बुद्धिमान, यशस्वी, श्रीमंत असती तर तिनं जग सहज लाथाडून टाकलं असतं. डॉक्टर वेदान्त रावसारखं. पण ती तशी नव्हती आणि लाथाडली जाण्याखेरीज दुसरं हातात काही उरलं नाही.

अस्वस्थपणे ती हॉलमध्ये फेऱ्या घालू लागली. घड्याळ टिकटिकत होतं आणि बारा वाजून गेले होते. रस्त्यावरून क्वचित जाणाऱ्या वाहनाचा आवाज मधूनच किंचाळल्यासारखा येत होता. विनयच्या परतण्याचा पत्ताही नव्हता. नाहीतर तिनं आपला राग त्याच्यावर काढला असता. मुलं असती तर त्यांच्यावर हात टाकला असता. पाहतापाहता तिला तिच्या नजरेसमोर ते स्पष्ट दिसलं. मुलांच्या बेफिकीरीनं तिडीक उठून ती त्यांना जीव खाऊन मारते आहे, विनयच्या थंडवृत्ती

## साभार स्वीकार : कविता

**वांडगुळे** : विश्वास वसेकर, नवल पब्लिकेशन्स, अत्रेनगर, सेलू, १९८३, रु. १२ △ **हे बोल अंतरीचे** : रामदास कुहीटे, अज्ञात प्रकाशन, वर्धा, १९८३, रु. १५ △ **युद्ध** : नीलकांत चव्हाण, कविता प्रकाशन, नाशिक, १९८५, रु. २० △ **अनुवाद** : भगवान ठग-संपादक, अशोक त्रिपाठी, वर्धा, १९८५, रु. ५ △ **युद्ध** : भगवान ठग, जनसाहित्य प्रकाशन, वर्धा, १९८५, रु. १० △ **तरीही** : अनुराधा पाटील, कुश प्रकाशन, औरंगाबाद, रु. ३० △ **भाववेणा** : सौ. पद्मा मोरजे, पद्मगंगा प्रकाशन, अहमदनगर, १९८४, रु. २०

चवताळून त्याचे केस धरून डोकं भिंतीवर ताडताड आपटते आहे आणि तो गप्प, मान टाकून काही न करता एखाद्या बुजगावण्यासारखा तिच्या हातात... जशी तिची मुलंही तिच्या हातचा वाढता मार खात असहायपणे केवळ ओरडण्यापलीकडे काही करू शकत नाहीत.

स्वतःतून उफाळून आलेली हिंसा तिला मोकळी करता आली नाही. त्याचा ओघ स्वतःकडे वळवून ती आत आली. मनात पेपरमध्ये वाचलेल्या बातम्यांवरून तिनं रॉकेलची वाटली खाळून काढली. हे एवढं अंगावर ओतून काडी पेटवली की खेळ खलास. समाधान आणि शांती. सगळ्या समस्यांचे अंत...पण तिचा हात थिजलेला राहिला. रॉकेल स्वतःच्या अंगावर ओतून घेता आलं नाही. तिच्या नेहमीच्या भित्र्या मनानं तिला दगा दिला.

— ४ —

प्रतिमा स्वयंपाक घरात काम करत असताना बाहेरून विनय म्हणाला, "आजचा पेपर पाहिलास का?"

"नाही." ती आतून उत्तरली.

"तुझ्या त्या डॉक्टर वेदान्त रावचं नाव आलं आहे."

तिचे हात क्षणभर थांबले. एक सूक्ष्म थरथर डोक्यापासून सळसळत गेली. "कशाबद्दल?"

"असाच कसला तरी सन्मान... तपशील कोण वाचेल? नाव दिसलं म्हणून सांगितलं."

ती तशीच बाहेर आली. विनय पेपरची पानं उलटू लागला. ती स्वतःच्या आवाजावर ताबा ठेवण्याचा प्रयत्न करत म्हणाली, "एवढे मानसन्मान मिळतात त्याला पण मला ठाऊक आहे...पक्कं ठाऊक आहे." तिचा आवाज रहस्य सांगावं तसा कुजबुजल्यासारखा, उत्तेजित झाला.

"त्यानंच उमाला मारलं. जाळून मारलं आणि वर सगळं सफाईनं निस्तरून टाकलं..."

"असं?" विनय कुत्सितेत म्हणाला, "आणि हे गुपित त्यानं तुला खास सांगितलेलं दिसतंय..."

"नाही...." ती मान हलवीत म्हणाली, "मला माहीत आहे...माहीतच आहे कारण, कारण की...'

पण ते जसं तिला सांगता येईना तसा विनयचा तिच्या सांगण्यात काही रस होता हेही दिसून आलं नाही. तो उलट पुन्हा वेदान्तबद्दल काही कुत्सितेत म्हणाला आणि पेपर उगीचच तिच्या पुढ्यात आपटल्यासारखा करून चालता झाला. छातीवर हात बांधून जणू हृदयाची धडधड सावरावी तशी प्रतिमा अचल राहिली. दुसऱ्या कुणाची यशं आणि प्रतिष्ठा आनंदानं समजून घेण्यात भूषण मानतात पण एखाद्या अमानुष हिंसक समजल्या जाणाऱ्या प्रवृत्तीची नाती उघड सांगायची नसतात, तिच्या मनात आलं. ते तसंच आपण आपल्या आत जपून, समजून ठेवायचं असतं. उत्तेजित आनंदाची सूक्ष्म कंपनं तिनं अनुभवली. सावकाश, खाली बसून अर्धवट काम टाकून आल्यानं पिठाच्या ओल्या कोरड्या हातांनी पेपरचं पान उलटून ती लॉटरीच्या बक्षीस मिळालेल्या तिकिटांचा नंबर खात्रीपूर्वक ताडून पाहावा, तशी डॉक्टर वेदान्त रावच्या लौकिक यशाची बातमी अधीरतेने वाचू लागली.

■

## साभार स्वीकार : समीक्षा–चरित्रे, एकांकिका

**तेंडुलकरांची नाटके** : डॉ. चंद्रशेखर बर्वे, राजहंस प्रकाशन, पुणे ३०, १९८५, रु. ३० △ **लो. टिळक आणि क्रांतिकारक** : य. दि. फडके, श्री विद्या प्रकाशन, पुणे ३०, १९८५. रु. ५० △ **आनंदवनीचा श्रमयोगी** : अविनाश पितळे, कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे ३०, १९८५, रु. १५ △ **जिंकिले भूमी-जल-आकाश** : सविता भावे, ह. अ. भावे, वरदा बुक्स, पुणे १६, १९८५, रु. ४० △ **अमृतपुत्र साने गुरुजी** : राजा मंगळवेढेकर, सुरेश एजन्सी, पुणे २, १९८५, रु. २० △ **लोकनायक जयप्रकाश** : राजा मंगळवेढेकर, सुरेश एजन्सी, पुणे २, १९८५, रु. २० △ **स्वातंत्र्यसंग्रामातील आठवणी** : नानासाहेब गाडगीळ, समाजशिक्षण माला, पुणे ३०, १९८५, रु. २-५० △ **संशोधनाची क्षितिजे** : भा. ल. भोळे–संपादक, अमेय प्रकाशन, नागपूर, १९८५, रु. १०० △ **आत बाहेर** : सौ. पद्मा मोरजे, पद्मगंगा प्रकाशन, अहमदनगर, १९८५, रु. १० △ **एकोणिसाव्या शतकातील महाराष्ट्र : एक दृष्टिक्षेप** : संकलन व प्रकाशन म. श्री. दीक्षित, पुणे ३०, रु. ६

# धटिंगण

एस्. डी. इनामदार

मोठा चित्रविचित्र मनुष्य आणि त्याला शोभेसे नाव महिपत गणेश फातरफेकर. वय सुमारे चाळीस आणि उंची जेमतेम चार फुट. साधारणपणे असे दिसत होते की, असंख्य मानवी चेहरे घडवून झाल्यावर फाउंड्रीत उरलेल्या अवयवांच्या स्पेअरपार्ट्स्मधून विधात्याने त्याचा चेहरा घडवला असावा. बटाट्यासारखे वटवटीत डोळे जणू खोवणीतून बाहेर पडण्यासाठी उतावीळ. नाकाने चेहऱ्याशी सवतासुभा थाटलेला. चेहरा तयार झाला खरा; पण कानच चिकटवायचे राहून गेले असावेत, तसे ते लळत लोंबतांना दिसत. निग्रोसारख्या जाडजूड ओठांवर हिटलरछाप झुडूपमिशांचे भरघोस कलम आणि टाळूवर मात्र दोनचार तुरळक केसांचे तुरे. एऱ्व्ही सूर्यप्रकाशात चमकणारा टकलाचा चांदवा. निस्तेज पांढुरका वर्ण आणि कसल्याशा विचित्र फोफशेपणाने सुजल्यासारखे दिसणारे बेडौल शरीर. त्यामुळे त्याचा बुटकेपणा जास्तच जाणवायचा.

असा हा महिपत गणेश म्हणजे त्या खेड्यातल्या लोकांना फुकटची करमणूक म्हणून जणू रस्त्यावर आणून सोडलेला विदूषकच होता. पण प्रत्यक्षात तो गावच्या कॉलेजात तत्त्वज्ञानाचा प्राध्यापक होता. नामवंत व्यक्तींना ' पद्मश्री ', ' पद्मभूषण ' अशा पदव्या देऊन त्यांचा गौरव करण्याची समाजात पद्धत असते, तशा या माणसाला लोकांनी स्वेच्छेने पदव्या दिल्या होत्या. गल्लीतली पोरे त्याला ' जोकर ', ' बुजगावण्या ', ' गेंडा ' वगैरे नावांनी पुकारत; तर कॉलेजातल्या पोरांनी एका गॅदरिंगातल्या फिशपॉन्डमध्ये त्याचे नव्याने बारसे केले होते : ' बजरबट्टू '! मग पोरे आपापसात म्हणत; ' आज बजरबट्टूचा फिलॉसॉफीचा तास. मग मारा दांडी ! ' अशा रीतीने त्याचे खरे नाव केव्हाच जनमानसातून पुसले गेले होते. लोक त्याला कोणत्या ना कोणत्या टोपणनावानेच ओळखायचे.

रस्त्यातून तो चालू लागला की एखादे जहाज झुलत झुलत जावे तसा दिसे. त्याचे हात शरीराच्या दुतर्फा जोरजोरात विचित्र हालत. त्या छोट्याशा खेड्यात शहरी रीतिरिवाज पाळण्याचीही जरूरी नव्हती. म्हणून लोक त्याला पाहून उघडउघड फिदीफिदी हसत. टरटवाळी उडवीत. टिंगल करीत. त्याच्या मागेपुढे खेडवळ पोरांचा ताफा असे. आणि गावात एखादी सर्कस आली की तिची जाहिरात करण्यासाठी सर्कसमधला हत्ती बँडवाल्यांच्या ताफ्याबरोबर मिरवतात, तसा तो पोरांच्या घोळक्यात दिसे. तो पुढे चालला की पोरे त्याच्याम गून लगोरीतून बोराएवढे टपोरे खडे त्याच्या मानगुटीवर, टकलावर नेम धरून सोडीत. एकदा तर एका पोरट्याने त्याच्या शर्टाच्या सैलसर झोळण्यात गम्मत म्हणून एक झुरळ सोडले होते आणि त्यानंतर दहा-पंधरा मिनिटे बजरबट्टूचा तागडथोम नाच पाहातापाहाता पोरांची हासून मुरकंडी वळली होती. मात्र तो त्या पोरांवर कधीच रागवायचा, चिडायचा नाही. उलट त्यांच्याकडे पाहून कसनुसे, केविलवाणे हासायचा. उलट एकदा त्याच्याकडे पाहात ' जोकर, जोकर ' करून पळणाऱ्या एका पोराला ठेच लागून ते मातीत उताणे पडले, तेव्हा धावत जाऊन त्याला उचलून घेत तो कळवळून म्हणाला; " फार लागलं नाही ना रे तुला ?– "

महिपतीला आता अशा गोष्टींची सवयच पडून गेली होती. उलट लोकांनी अशी प्रतिक्रिया दाखवली नाही, तरच त्याला चुकल्याचुकल्यासारखे वाटायचे. लोकांच्या उपेक्षांचे अपमानाचे घाव झेलत तो मुकाट खाली मान घालून चालत राहायचा. त्याने कधी नजर वर उचलून निर्भय आत्मविश्वासाने कुणाच्या नजरेला भिडवली नाही. चुकून कुणाच्या डोळ्याला डोळा भिडलाच, तर तो पटकन घाबरून नजर बाजूला घेत असे. आणि त्याच्या चेहऱ्यावर एक गूढ चमत्कारिक हसू असे. स्वतःच्याच विचारांच्या तंद्रीत असलेल्या माणसाला नवनव्या कल्पना सुचत असताना फुटावे तसे अगम्य हसू.

पण जगावरच्या संतापाचा सगळा उद्रेक आतल्या आत दडपून टाकत तो एखाद्या सुप्त ज्वालामुखीसारखा वरकरणी शांत दिसे. हे सारे भोग तो अगदी लहानपणापासून, नव्हे गर्भात असल्यापासूनच, भोगत आला होता. त्याचा जन्म हाच मुळी एक अपघात होता. त्यावेळी त्याच्या आईबापांना मूल नको होते. तो पोटात वाढत असतानाच त्याच्या आईला पंडुरोग झाला होता. परिणामी गर्भाचे नीट पोषण होऊ शकले नाही. मग तो जन्मला तोच मुळी अशक्त, किरकिऱ्या, पांढुरका. त्याच्या जन्मानंतर, मुळातच विनसलेले आईबापांचे संबंध जास्तच बिघडत गेले. त्यानंतर बाप रोज रात्रीच जास्तच दारू पिऊन यायचा आणि आईला ढोरासारखा बडवायचा. अवलक्षणी जन्मलेल्या किरडूपोराचे तोंडही पाहण्याची त्याची इच्छा नसे. ते समोर चुकून आलेच, तर त्याला दुसऱ्या खोलीत नेऊन आदळत हा आपला पुन्हा दारू ढोसत बसायचा. नवऱ्याचा राग वाढल्याने आईही जन्मतःच पोराला हिडिसफिडीस करू लागली. त्याची बाकीची भावंडे तुलनेने जास्त गोरीगोमटी, गुबगुबीत असल्याने त्याला जास्तच हिडीसफिडीस करायचे. तेव्हा उपेक्षा, अवहेलना, कुचेष्टा हे त्याला जन्मजात चिकटून आलेले अंगभूत अवयवच होते.

शाळेतही तो एकटा–एकटाच राहिला. मुलांच्या कोंडाळ्यापासून दूर. धांदल–धावपळीच्या त्या उत्साही चिमुकल्या. आनंदी विश्वापासून दूर. तो कधी खेळायला मैदानावर गेला नाही, की स्नेहसंमेलनातून मिरवला नाही. तो आपला एकसारखा पुस्तकात डोके खुपसून बसलेला असायचा. प्रत्यक्ष जीवन जगण्यातल्या चैतन्यापासून तुरूतुरू दूर पळणारा पुस्तकातला किडा. पण ते ग्रंथच त्याला माणसांपेक्षा जास्त जिवंत वाटायचे. पुस्तकातली अक्षरेच जिवंत माणसांच्या हालचालींपेक्षा चैतन्याने जास्त सळसळत. इथून पुढे जगताना त्याला केवळ पुस्तकांचीच सोबत होती. माणसांच्या जगापेक्षा ग्रंथांचे निर्जीव जगच जास्त जवळचे. जास्त जिवंत. खरेखुरे. कारण प्रज्ञावंतांनी–प्रतिभावंतांनी निर्माण केलेल्या त्या जगाने त्याची कधी अवहेलना केली नाही. त्याला कधी दूर झिडकारले नाही, की हिडीसफिडीस केले नाही. ग्रंथांनी कधी त्याचा विश्वासघात केला नाही. त्याच्याशी प्रतारणा केली नाही. (जी त्याच्या लग्नाच्या बायकोने–पार्वतीने केली). पुस्तकांनी त्याला जे दिले, ते निरपेक्ष ममत्वभावाने दिले. मग ते ज्ञान असो वा सर्जनशील, जीवनव्यवहाराचा कलात्मक आनंद!– आणि जे दिले ते भरभरून, मुक्त हस्ताने उधळून दिले. काहीही हातचे न राखून ठेवता. त्याच्यापुढे ज्ञानाची भांडारेच्या भांडारे खुली केली. अलौकिक, अज्ञात दिव्य लोकीचे अनुभव दिले. मानवी सुखदुःखांची भव्योत्कट शिल्पे त्याच्या मनस्वी मनापुढे साकार केली. ह्या जगात जर ग्रंथ नसते, तर तो जिवंत राहिला असता का? – की त्याने या रूक्ष कठोर जगाला कंटाळून आत्महत्या केली असती?– पण तेवढे धैर्य खचितच त्याच्यापाशी नव्हते. पण तो एखाद्या जीवन्मृतासारखा केवळ शुष्क निर्जीवपणे जगत राहिला असता, हे खरे! पण पुस्तकांचा सहवास जगणे सुसह्य करीत गेला; हेही खरेच!

मग त्याने काही काळ, विशेषतः तारुण्याच्या उर्मीत, कविताही करून पाहिल्या. कुठे कुठे ‘गणेशसुत’ या टोपणनावाने त्या तुरळकपणे छापूनही येत राहिल्या. पण नंतर त्याच्या लक्षात आले की, हे काही खरे नाही. हा प्रांत आपला नव्हे. आपण शेवटपर्यंत हौशी आणि उदयोन्मुखच राहणार. प्रतिभेची बीजे पेलण्याचे सामर्थ्य आपल्या किरकोळ कुडीत नाही. मग त्याच्यातला ‘स्कॉलर’च बाकी उरला.

असाच एकदा महिपती कॉलेज सुटल्यावर घराकडे परतत होता. तेव्हा त्याच्या घराकडे वळणाऱ्या गल्लीच्या तोंडावर त्याला नेहमीचेच कॉलेजतरुणांचे टोळके भेटले. पण या वेळी त्यातल्या एका तरुणाच्या हातात एक कुत्र्याचे पिलू होते. त्या पिलाकडे नजर जाताच महिपत जणू भारावून जागच्या जागीच मंत्रमुग्ध झाल्यासारखा खिळून उभा राहिला. गोंडस, गोजीरवाणे कुत्र्याचे पिलू. ते पिलू आपल्याला हवेच, असा हट्ट त्याच्या मनाने धरला. त्या पिलाच्या रूपाने त्याला जणू जगण्याचे हरवलेले प्रयोजनच परत लाभले. त्याचे आणि त्या पिलाचे पूर्वजन्मीचे कसलेसे ऋणानुबंध असावेत, अशा अगम्य ओढीने तो त्या पिलाकडे खेचला गेला आणि त्या तरुणाला म्हणाला, “मोठं गोड अन् गोंडस आहे हे पिलू....”

“हवंय सर, तुम्हाला?–”

“हो, दिलंत तर फार आभारी होईन.”

“पण अस्सल अल्सेशियन आहे, प्युअर ब्रीड–”

“खरं? –”

“हो. अगदी पिलाशपथ –”

तसा महिपती अगदी कळवळून म्हणाला,

"नको. त्या पिलाची शपथ नको. मी मानतो ते अल्सेशियन आहे–"

"पाचशे रुपये त्याची किंमत आहे–"

"ठीक आहे" – तावडतोब महिपतीने खिशातून पाकीट काढले व शंभराच्या पाच नोटा त्या तरुणाच्या हातात ठेवल्या आणि त्याच्याकडून ते पिलू जवळजवळ हिसकावून घेत छातीशी घट्ट कवटाळून धरले. तसे ते केविलवाणे केकाटू लागले. आर्त, भयभीत आणि साशंक नजरेने महिपतीकडे पाहू लागले. पण तिकडे लक्ष न देता त्याला तसेच छातीशी कवटाळून महिपतची वटू वामन-मूर्ती हालतडुलत घराकडे चालू लागली.

इकडे तो तरुण अगदी चाटच पडला. त्याला वाटले होते, सौदा पटवताना फार घासाघीस करावी लागेल. फार तर दोन-तीनशे रुपये सुटतील. तेवढीच चोराची लंगोटी. पण इथे तर अक्षरशः घवाडच हाती लागले. मग तो खो खो करून हासू लागला. दोस्तांनी विचारले तसा त्यांना म्हणाला, "कशी फिरकी घेतली साल्याची -"

"म्हजे ? –" एका दोस्ताने विचारले,

"अरे कसलं अल्सेशियन नि काय ! साधी गावठी अवलाद. आपल्या गल्लीतल्या पवाराची उंडगी कुत्री व्याली अन् तिचं हे बेवारस पिलू रस्त्याच्या कडेला थंडीनं कुडकुडत पडलं होतं. मला त्याची दया आली म्हणून मी ते उचललं–पाळणारही होतो-- पण तेवढ्यात हा मामा भेटला – आपला बजरबट्टू !"

"मग काय– पाचशे रुपयाची चांदीच म्हण की–"

"आता होऊन जाऊ द्यात मोसंबी-नारंगी !"

अशा रीतीने मोठ्या खुशीत एकमेकांच्या हातांवर टाळ्या देत व खिदळत ते तरुणांचे टोळके कलालाच्या गुत्त्यावर निघून गेले.

इकडे महिपती पिलाला घेऊन खोलीवर आला. अलभ्य आनंदाचा ठेवा गवसावा तशी त्याची मुद्रा प्रसन्न उजळली होती. आता जगण्याला सोबत होती. खरीखुरी जिवंत सोबत. पुस्तकांच्या मायावी आभासमय जगापेक्षा जास्त जिवंत, खरेखुरे जग. मग ते पाशवी का असेना ! एका धगधगत्या सजीव स्पर्शाची ऊब–जी त्याने गेल्या कित्येक वर्षांत अनुभवली नव्हती. आणि केवळ पाचशे रुपयांत ही जिवंत ऊब. बायकोपासून सुख खरेदी करण्यासाठी त्याने जवळजवळ दहा हजार रुपये खर्च केले होते. सुखाचा सौदा. आणि तरीही ते एखाद्या मृगजळासारखे हुलकावण्या देत दूर दूर पळत होते. एखाद्या दरोडेखोरासारखी, बायकोने त्या सुखाच्या ओढीपायी त्याची लुटमार चालवली होती. 'आज काय, बापाच्या दम्यावर ट्रीटमेन्ट करायचीय, द्या दोन हजार रुपये–उद्या काय, धाकटा भाऊ उच्च शिक्षणासाठी फॉरिनला निघालाय, त्याला करियर करायचीय.– द्या पाच हजार रुपये'– असे छोटेमोटे दरोडे घालत अखेर तिने मोठा अखेरचा दरोडा घातला. आणि त्याच्या अब्रूचे खोबरे गल्ली-गल्लीतून वाटत ती फिजिकल इन्स्ट्रक्टर लोखंडेचा हात धरून पळून गेली. तेव्हा तो पुऱ्या अब्रूनिशी नागवला गेला. अगदी कफल्लक नंगा फकीर. आणि आता लुबा-

## साभार स्वीकार : कथा

**सर्वोत्कृष्ट मराठी कथा खंड १६** : राम कोलारकर–संपा., सौ. छाया कोलारकर, संत तुकारामनगर, पुणे १८, १९८५, रु. ५० △ **भुकेचे इंजेक्शन** : शंकरराव पोतदार, श्री विद्या प्रकाशन, पुणे ३०, १९८५, रु. ४० △ **निवडक शंकर पाटील** : वा. ल. कुलकर्णी-संपा., सुरेश एजन्सी, पुणे २, १९८५, रु. ५० △ **कथाकथन** : गिरिजा कीर, मधुवन ग्रंथ प्रकाशन, अंधेरी, मुंबई ६९, १९८५, रु. ४० △ **काली** (दीर्घकथा) कृष्णाबाई मोटे, श्री विद्या प्रकाशन, पुणे ३०, १९८५, रु. १०

## साभार स्वीकार : कादंबरी

**हा दैवाचा खेळ निराळा** : मधुराणी भागवत, श्री विद्या प्रकाशन, पुणे ३०, १९८५, रु. २५ △ **आभाळाचे गाणे** : रवींद्र भट, श्री विद्या प्रकाशन, पुणे ३०, १९८५, रु. ४० △ **गांधारीचे डोळे** : नागनाथ कोत्तापल्ले, शैलेंद्र प्रकाशन, पुणे २, १९८५, रु. ३०

डण्यासारखे त्याच्याजवळ काहीच न उरल्याने ती पुन्हा त्याच्या वाटेला फिरकलीही नाही. आता ती त्या लोखंडेबरोबर सुखाने संसार करीत नांदते आहे.

कुत्र्याचे पिलू घरांत येताच सगळीकडे घरभर फिरत हुंगू लागले. जणू ते राहण्याच्या दृष्टीने नव्या घराची पाहाणीच करत होते. पण त्याच्या हालचालीत भांवावलेपणा, घबराट होती. आत्मविश्वासाचा अभाव अन् कावरीबावरी भयभीत नजर. उंबरठ्यावरचे माप ओलांडून प्रथमच घरात प्रवेश करणाऱ्या नववधूसारखे ते लाजत होते. माणसाच्या पावलांची चाहूल लागताच ते अंग चोरून घेत, मागेमागे सरकत कॉटखाली कपाटाखाली किंवा एखाद्या कोपऱ्यात आसरा शोधे. जो स्वतःच मुळापासून भेदरलेला आहे, अशा माणसाचेही भय कुणालातरी वाटू शकते, ह्याचे महिपतीला फार नवल वाटले.तो त्या पिलाला चुचकारू लागला.'ये घाबरू नकोस. मीही तुझ्यासारखाच आहे. जगाला घाबरून कोपऱ्यात सुरक्षित आसरा शोधणारा.– आणि तू मला घाबरतोयस ?–' अगदी हळुवार, प्रेमळ शब्दात तो पिलाशी बोलत होता. आणि त्याला थोपटत होता. आंजारत-गोंजारत होता. त्याने कुत्र्यापुढे गरम दुधाची वाटी ठेवली; पण त्याने त्या वाटीला तोंडही लावले नाही ते कपाटाखाली दडून बसले आणि जवळ जवळ दोन तासांनी बाहेर येऊन त्याने वाटीतले दूध चटाचटा आवाज करीत पिऊन टाकले. महिपती हे कुतूहलाने व कौतुकाने पाहात होता. पोटात ऊब येताच ते पिलू काहीसे निर्धास्त झाले व महिपतीने त्याला उचलून जवळ घेताच ते त्याला बिलगले. थोड्या वेळाने ते त्याला प्रेमभराने चाटूही लागले. त्याला आता त्या माणसाचा विश्वास वाटू लागला होता. मग ते सुस्त, झोपाळू दिसू लागले. जांभया देऊ लागले. महिपतीने एका जाडजूड पुठ्याच्या खोक्यात वर्तमानपत्राचे तुकडे पसरून व त्यावर कापड घालून त्या पिलाचे अंथरुण तयार केले व त्यात त्याला झोपवून वरून पांघरुण घातले. मग दुसऱ्या दिवशी महिपतीने शहरातून एक मोठी वेताची वास्केट आणली, त्यात छोट्या आकाराची मऊ सावरीची उशी घातली. हा त्या पिलाचा मऊ ऊबदार बिछाना. वरून गुबगुबीत छोट्या रगाचे पांघरुण. जणू युवराज चे शयनमंदिर. पण तरीही ते कुत्र्याचे पिल्लू रात्रभर केविलवाण्या स्वरात केकाटत राहायचे. अजूनही त्याचा गारठा आणि एकाकीपणा गेला नव्हता. मग महिपतीने एक युक्ती केली. त्याने गरम पाण्याची रबरी पिशवी एका नॅपकीनमध्ये गुंडाळून ती पिलाच्या शेजेला ठेवली. त्याने त्या पिलाला ऊब मिळाली. महिपतीची युक्ती सफल झाली. आता ते पिलू केकाटत तर नसेच; उलट रात्र होताच टुणकन् उडी मारून त्या ऊबदार मऊ बिछान्यात शिरत असे. तेथेच त्याला त्याच्या हरवलेल्या आईची माया लाभली. आता हळूहळू महिपतीला आणि त्याच्या घराला ते पिलू सरावत चलले.

महिपतीला कुत्रे पाळण्याचा काहीच अनुभव नव्हता. त्याच्या घराण्यात कधीच कुणी कसला प्राणी पाळला नव्हता. उलट ते माणसांनाच 'पाळीव प्राण्या'सारखे वागवत असत. महिपतीने कधी बारकाईने कुत्र्याचे निरीक्षणही केले नव्हते. त्यामुळे कुत्र्याचा विशिष्ट स्वभाव आचारधर्म, वर्तन यांविषयी त्याला काहीच माहिती नव्हती. त्यामुळे तो फार काळजीत पडला होता.आईला मूल वाढवताना पडला नसेल इतका मोठा प्रश्न त्याला पडला होता. आणि एकूणच बालसंगोपनापेक्षा हे श्वानसंगोपन ही फार जिकीरीची व किचकट बाब होती. मग तो कुत्रा पाळण्याविषयीची पुस्तके आणून वाचू लागला. तो त्या पिलात भावनिकदृष्ट्या गुंतला होता. त्याने त्याला मातृप्रेमापासून वंचित केले होते, तेव्हा आता तोच त्या पिलाची आई, अन् तोच त्याचा बाप. आईबापाची कर्तव्ये त्या मुक्या बिचाऱ्या पिलाच्या संदर्भात पार पाडायची अवघड जबाबदारी त्याच्या शिरावर येऊन पडली होती. पण त्यात एक प्रकारचा आनंदही होता. कारण आजवर कुणीच इतक्या निर्धास्तपणे त्याच्या खांद्यावर आधारासाठी विसावले नव्हते- सगळीकडे संशय, भय, अविश्वास. मग त्यानेही मनाशी निश्चय केला की, या पिलाला फार चांगल्या रीतीने वाढवायचे. मग त्याच्या घरच्या लायब्ररीत कुत्र्याविषयीच्या नवनवीन पुस्तकांची भर पडत गेली. ('पेट बुक', 'पॉप्युलर डॉग कीपिंग', 'चॅम्पियन डॉग्ज ऑफ द वर्ल्ड', 'इंडियन डॉग्ज' वगैरे, वगैरे.) श्वानसंगोपनाचा शास्त्रशुद्ध पद्धतशीर अभ्यासच त्याने सुरू केला. त्यात एक वेगळाच इंटरेस्ट त्याला वाटू लागला. पार्वती सोडून गेल्यापासून तर महिपतीला ते घर खायलाच उठायचे. फार एकाकी वाटायचे. घरी यावेसेच वाटायचे नाही. तो गावच्या 'लोकमान्य टिळक' वाचनालयात अंधार पडेपर्यंत बसून राहायचा. मग ते बंद व्हायची वेळ

झाली की, घरी यावेच लागायचे. तर घरात एक शून्य, भकास पोकळी. रस्त्यावर टिंगल, कॉलेजात कुचेष्टा आणि घराला स्मशानाची अवकळा. तर, घरी आल्यावर आल्याकडे शून्य नजर लावून खाटेवर तासन् तास नुसते पाय हलवत पडून रहायचे. उठून दिवा लावण्याचे त्राण किंवा उत्साह अंगात नसायचा. भोवतालचा गच्च काळोख अजगरासारखा गिळायला उठायचा.

पण आता त्याच्या मरगळलेल्या आयुष्यात नवे चैतन्य आले होते. घरी परतण्याची ओढ लागून राहायची. निदान आता घरी वाट पाहणारे कुणीतरी होते. आणि महिपत येताच ते पिल्लूही आनंदाने नाचूबागडू लागायचे. त्याच्या अंगावर झेपावत उड्या घ्यायचे. कुत्र्याचे करण्यासवरण्यात त्याचा दिवस कुठल्याकुठे निघून जायचा आणि रात्री त्याच्या ऊबदार मायेच्या सहवासात निवांत झोपही लागायची.

हळूहळू कुत्र्याचे पिलू महिपतच्या घरात रमू लागले. त्याची वाढही निकोप अन् चांगली होत होती. त्याचा आहारही हळूहळू वाढत आता चांगला चौरस झाला होता. पहिल्यांदा नुसते दूध, मग दुधावरोबरच विनचरबीचे शिजवलेले मटण, मटणाच्या रश्श्यात कुस्करून डॉगबिस्किटस, उकडलेले बटाटे अन् खारवलेले टोमॅटो, अंडी, केक्स अशा प्रकारे खाण्यापिण्याच्या सवयी व आवडीनिवडी वयोमानानुसार दिवसेंदिवस वाढत होत्या. डोळे व हाडे यांच्या निरोगी वाढीसाठी 'ए' आणि 'डी' व्हिटॅमिन्सची आवश्यकता असते व ती कॉडलिव्हर ऑइलमध्ये मिळतात, असे महिपतीने कुठेसे वाचले होते. म्हणून तो पिलाला बळजबरीने रोज चमचाभर कॉडलिव्हर ऑइल पाजायचा. आता त्या पिलाला दात येत असावेत व ते फार शिवशिवत असावेत. कारण ते काहीही दिसेल ते चघळत बसायचे. एकदा तर त्याने, महिपतीने पुन्हा वाचण्यासाठी म्हणून बाहेर काढलेले नीत्शेचे 'दस स्पेक झरतुष्ट्र' हे पुस्तकच पळवले व त्याचा चावून चावून चोथा केला. आणि आणखी एकदा महिपतीची कोरी कोल्हापुरी चप्पल त्या चामड्याच्या वासाने मोहित होऊन चघळत बसले. मग महिपतने घरातल्या वस्तूंवर क्विनाईन पावडर व मिरपूड पसरली आणि कुत्र्याला खास चघळण्यासाठी म्हणून रबरी टॉयबोन्स आणून दिली. काही माणसांसारखी काही कुत्रीही भयंकर खादाडखाऊ असतात. 'धोंड्या' हा त्यापैकीच एक (होय, दरम्यानच्या काळात महिपतीने कुत्र्याच्या पिलाचे बारसे केले होते.) धोंडी एक थाळी संपवून पुन्हा लगेचच अधाशीपणे वचावचा भुंकू लागायचा. आणि महिपती अतिलाडाने त्याच्यापुढे दुसरी थाळी ठेवायचा. परिणामी अजीर्ण, अपचन होताच धोंड्या गवत खाण्यासाठी अंगणात पळायचा. गवत हे जणू त्याचे रेचक होते. आणि पोट साफ झाले की, तो पुन्हा खाखा करायचा. परिणामी लवकरच तो थोराड व लठ्ठ दिसू लागला. जसाकी, आडदांड लांडगा! (महिपतीने त्याची उत्तम निगा राखल्याचे, सुदृढ श्वान संगोपनाचे ते जणू चालतेबोलते सर्टिफिकेटच होते). शिवाय शहरी गेला की महिपती सुक्या डॉगफुडचे कॅन्स घेऊन यायचा. पण धोंड्या त्याचा एक-दोन दिवसातच फडशा पाडत असे. मग पुन्हा आपला म्हमद्या खाटकाच्या मटणाचा खुराक चालू!—आणि धोंड्याला तसे कशाचेच सोयरसुतक म्हणून नव्हते. त्याला गोमातेचे मांस फार आवडायचे. आता महिपतीच्या हिंदू मनाला ते फारसे पटत नसे. पण आपद्धर्म म्हणून काही गोष्टी कराव्या लागतात. आणि धोंडी कदाचित प्राचीनकाळी जन्माला

असता, तर तो नरमांसभक्षकही झाला असता.

कुत्र्याची अंघोळ हा महिपतीच्या लेखी एक अविस्मरणीय अनुभव होता. विशेषतः ते पिलू असतानाच्या त्याच्या पहिल्यावहिल्या अंघोळी. त्या साग्रसंगीत रासन्हाणीच असत. दर रविवार सकाळचा खास प्रोग्रॅम ' साप्ताहिकी ' ! अंघोळीपूर्वी पिलाचे केस बारीक दातेरी धातूच्या गोल फणीने कराकरा विंचरायचे. मग त्याच्या केसांतल्या गोचिडी, पिसवा मराव्यात म्हणून अंघोळीच्या कोमट पाण्यात पाण्यात जंतुनाशक ' मॅलॅथिऑन ' मिसळायचे. ( हे सगळे अगदी श्वान-संगोपनाच्या पुस्तकात दिलेल्या क्रमानुसार पद्धतशीर चालायचे). नंतर त्या पिलाला टबात बुडवून, त्यातून ते बाहेर पडू नये म्हणून दोरीने बांधायचे. नंतर लाइफबॉयने चोळून शॉवरस्प्रेने त्याचे सगळे अंग धुवून काढायचे. त्या वेळी साबणाच्या फेसाळ पांढऱ्या पाण्यात ते पिलू अक्षरशः दिसेनासे होई. पूर्वी अंघोळीच्या अगोदर महिपती पिलाच्या डोळ्यांत खनिजतेलाचे थेंब आणि कानात कापसाचे बोळे घालायचा. पण नंतरनंतर ह्या खबरदारीची काही जरूरी नाही, हे त्याला अनुभवाने कळून चुकले. अंघोळ झाल्यावर तो कुत्र्याला खरखरीत डॉग-नॅपकीनने खसाखसा चोळून चोळून पुसायचा. पिलाचे अंग अगदी स्वच्छ कोरडे करून टाकायचा. कारण ओल्या अंगाने ते पिलू बाहेरच्या गारठ्यात गेले, तर त्याला थंडी वाजून ताप येईल, मग त्याची भूक नष्ट होऊन त्याला डिस्टेंपर हा भयंकर रोग होईल. त्याला बळी पडून ते पिलू मेले तर पुन्हा आपण या जगात एकटे पडू, अशी भीती त्याच्या या काळजी वाहण्यामागे असे. ( हे त्याने एका पुस्तकातच वाचले होते ). पण दरम्यान या जुलूम जबरदस्तीने ते पिलू बिचारे कासावीस, घाबरेघुबरे होऊन केविलवाण्या सुरात केकाटू लागायचे. मग त्याच्या अंगावर कुठे साबण तर राहिला नाही ना म्हणून महिपती त्याच्या केसांतून पुन्हा पुन्हा बोटांनी चाचपून खात्री करून घ्यायचा. कारण साबण राहिला, तर त्याच्या कातडीला खाज सुटेल. बाळंतपणात आई मेली आणि मूल मागे राहिले, अशा अवस्थेत विधूर बाप मुलाला वाढण्याच्या जबाबदारीच्या ओझ्याने जसा कावराबावरा, सचिंत दिसतो, तसा महिपती या काळात दिसे.

आता कुत्र्याला महिपतीचा व महिपतीला कुत्र्याचा चांगलाच ळळा लागला होता. दोघांना एकमेकांशिवाय मुळीच चैन पडत नसे. महिपतीच्या पोटातली माया त्या कुत्र्याच्या पिलालाही आतून कुठूनतरी जाणवत असावी. कारण ते जास्तच लाडात येऊन महिपतीच्या अंगाखांद्यावर नाचत बागडत असे. त्याला प्रेमभराने चाटत असे. महिपतीने त्याला खेळायला एक मोठा चेंडूही आणून दिला होता. त्या चेंडूमागे पळताना पिलाची होणारी धांदलधावपळ, धडपडउड्या, पडझड, नाचणे-बागडणे हे पाहताना महिपतीचे मन आनंदाच्या लाटांवर उचंबळत असे. तो दमल्याभागल्या जीवाला एक विरंगुळाच होता.

शिवाय धोंडी मोठा आज्ञाधारक होता. महिपतने त्याला अनेक गोष्टी शिकवल्या होत्या. सुरुवाती-सुरुवातीलाच अगदी लहान पिलू असताना ते घरातच घाण करीत असे. मग महिपतीने त्याला ' दैनिक करुण भारत 'ची सवय लावली. पुढेपुढे तर ते अंगणात जाऊन ' शिशुविहार ' करण्याइतके शहाणे झाले. शिवाय कधी बक्षिसादाखल बिस्किटाचे आमिष दाखवून, तर कधी कठोर शब्दात निर्भर्त्सना करून व शिक्षेदाखल मानगुटीला चिमटे काढून महिपतीने त्याला अनेक आज्ञा पाळायला शिकवल्याः ' नो ! नो !! ' ' स्टॉप ' ' हील ! ' ' कम ', ' स्टे ', ' सीट ', ' डाऊन ' वगैरे, वगैरे. ( मराठीपेक्षा इंग्रजी आज्ञा पाळण्याकडेच धोंडीचा जास्त कल असल्याचे महिपतीला शिकताना आढळून आले. कदाचित तो 'अल्सेशियन' असल्याने आंग्लाळलेला असू शकेल !) पण महिपतीच्या आणखीही एक गोष्ट लक्षात आली की, धोंडीला आज्ञाधारकपणाची किंवा आरोग्याची मुळात आवड होती म्हणून ते तसे वागत होते, अशातला प्रकार बिलकूल नव्हता. तर महिपतीला खुश करण्यासाठी, त्याची मर्जी सांभाळण्यासाठी धोंडीचा सारा खटाटोप असे. महिपतीची शाबासकीची थाप मिळाली, किंवा त्याने जवळ घेऊन कुरवाळले की ते आनंदाने हुरळून उड्या मारू लागायचे आणि महिपती रागावला की हिरमुसले तोंड करून कोपऱ्यात जाऊन बसायचे. हे लक्षात आले तसा महिपतीचा अहंकार सुखावला. या जगात बाकी कुणाला नसली तरी एका कुत्र्याच्या पिलाला आपल्या मायेच्या आधाराची गरज आहे, रागलोभाची पर्वा आहे हे त्याच्या आनंदाचे निधान होते. कुत्र्याच्या या निरागस, निरपेक्ष, अबोल लोभाचा प्रत्यय त्याला आणखीही एका प्रसंगातून आला.

तो निवडणुकांच्या धामधुमीचा काळ होता. आणि

गल्लीतल्या पोरांनी महिपतीची फिरकी घेण्याची एक आगळी व नामी शक्कल लढवली. त्यांनी महिपतीला निवडणुकीचा उमेदवार बनवून त्याचा धुमधडाक्याने प्रचार चालू केला. त्यासाठी पोस्टर्सही रंगवली. एका पोस्टरमध्ये तर शेतातले बुजगावणे काढले होते व त्याखाली 'बुजगावण्यालाच मते द्या' अशी घोषणाही रंगवली होती. शेतातून उडत चाललेली एक मोठी चिमणी रंगवून तिला बाईचे तोंड काढले होते. 'बायको उडाली भूर्र ऽऽ'! मग ते मोठमोठ्यांदा घोषणा देत बुजगावण्यालाच मते द्या. ह्याची खूण हिजडा. हिजड्यावर शिक्का मारून प्रचंड मताने निवडून द्या बुजगावणे! 'येऊन येऊन येणार कोन?—हणगोबा-शिवाय हायेच कोन?'—आणि हे सगळे महिपतीच्या जाण्यायेण्याच्या वाटेवर. गल्लीच्या तोंडाशी. महिपतीच्या घरावरून पोरांच्या मिरवणुका जात. मग महिपती आतल्या आत नुसता धुमसत रहायचा. त्याला वाटायचे, इतक्या नेभळया कुरापतीपेक्षा कुणीतरी आपल्या फाडफाड मुस्काटात माराव्यात. आपल्या कंबरड्यात बुटाच्या लाथा घालाव्यात. रात्रीच्या काळोखात चार धटिंगणांनी रस्त्यात एकटे गाठून डोक्यात काठ्या घालाव्यात. मग चेहऱ्यावरून भळभळून रक्त ओघळू लागेल. युद्धात पराक्रम गाजवून धारातीर्थी पडलेल्या सैनिकासारखे आपण दिसू. भव्य हौतात्म्य! जगाला वंदनीय शूर लढवय्या वीर. अशा हिरोगिरीची महिपतीला मनातून फार आवड होती. पण लोकच षंढ होते. त्यांच्यात तेवढे धैर्य, तेवढा पराक्रम नव्हता. चोरट्या अंधाराचा फायदा घेऊन मवाली बायकांची काढतात, तेवढीच छेड ते त्याची काढायचे. भुरटेपणाचे चोरटे हल्ले, किरकोळ कुरापती, बस्स! फक्त खाजवून जखमेवरची खपली काढावी, तसे. त्यात ना कसले हौतात्म्य, ना कसली हिरोगिरी! आज गल्लीतल्या पोरट्यांनी अशीच किरकोळ कुरापत काढली होती.

महिपत घरी आला. दारात स्वागतासाठी धोंडिबा सज्ज. त्या कुत्र्याच्या चेहऱ्यावर लोचटपणा होता. लाचारी, स्वामीभक्ती लाळेसारखी थोबाडावरून गळत होती. आर्त ओल्या डोळयात केविलवाणे भाव होते. ते एकदम पुढे आले अन् पायात रेंगाळू लागले. महिपतीने उचलून छातीशी घ्यावे, ह्या अपेक्षेने. पण महिपतीने त्याच्या पेकाटात जबरदस्त लाथ घातली, तसे ते केकाटत दूर पळाले. महिपती घरात येऊन गुडघ्यात मान खुपसून सुन्नपणे बसून राहिला. थोड्या वेळाने ते पिलू पुन्हा जवळ येऊन महिपतीच्या पायाला ओलसरपणे चाटू लागले. तसा महिपत जास्तच संतापला आणि त्याने त्या पिलाच्या मानगुटीला धरून त्याला दूर भिरकावून दिले आणि जिवलगाच्या मृत्यूनंतर सुतक पाळावे, तसा तो बसून राहिला. किती वेळ, कुणास ठाऊक! भोवती गच्च साचत चाललेला काळोख त्याने तसाच राखेसारखा साचू दिला. उठून दिवा लावला नाही. नाहीतरी काय फरक पडणार होता! तो ओंजळभर क्षयी पिवळसर प्रकाश जगाने त्याच्यावर रचलेले काळोखाचे सरण दूर करू शकणार नव्हता. मग थोड्या वेळाने ते पिलू पुन्हा त्याच्याजवळ आले व त्याला हुंगत त्याच्या भवती फिरू लागले. यावेळी मात्र महिपतीला अगदी भडभडून आले. पिलाला जवळ ओढून तो गदगदून हुंदके देऊ लागला. ते पिलू त्याच्या कुशीत शिरून मूकपणे त्याला चाटू लागले. त्याच्या डोळयात अवघ्या विश्वाची करुणा साकळून आल्याचे महिपतीला जाणवले. त्याच्या त्या ओलसर मूक स्पर्शात रक्ताच्या आतड्याची माया होती. मग त्या काळोखात

वीज लखलखून जावी, तसा त्याला साक्षात्कार झाला. ' साऱ्या जगाचा राग या पिलावर काढण्याचा आपल्याला काय अधिकार आहे ? ' आणि मग त्याला जास्तच भडभडून आले. आपण म्हणजेच हे कुत्र्याचे पिलू आहोत. असहाय्य, निराधार, मानवी प्रेमापासून वंचित. मग त्याने त्या पिलाला जास्तच उराशी कवटाळून धरले. त्याच्या उबदार स्पर्शात सारे दुःख, सारी उपेक्षा विसरण्याची ताकद होती. मग त्या पिलाला कुरवाळत तो भडभडून बोलू लागला–

' फार दुष्ट आहे हे जग, नाही ? आणि ज्यांना आपण निरागस, निष्पाप समजतो, ती लहान मुलंसुद्धा ? एखाद्या बेडकाला दगडांनी ठेचून ठार मारण्याचा खेळ त्यांनी का खेळावा ? का हा अकारण दुष्टावा ? '

आणि त्याची ही भाषा आणि त्यामागची भावना त्या पिलाला समजत असावी, तसे विलक्षण समजदारीचे भाव त्याला पिलाच्या अती पाणीदार डोळ्यात दिसले. मग तो जास्तच उमाळ्याने बोलू लागला;

" अरे, आहेच कोण माझं तुझ्याशिवाय या आख्ख्या दुनियेत ? ' नाही कुणी कुणाचे । जग हे दिल्या घेत्याचे । ' अशा ह्या हरामखोर जगाचा राग मी तुझ्यावर काढला– तुझ्यावर– ज्यानं मला निरपेक्ष दया, माया दाखवली; प्रेम, निष्ठा अर्पण केल्या ! केवढे थोर उपकार आहेत तुझे माझ्यावर ! तू माझ्या वंशाचा दिवा आहेस. अरे, मी सूर्यकुलोत्पन्न आहे आणि तू माझा मानसपुत्र आहेस. इथून पुढं तूच माझं नाव लावत जा– ' धोंडोपंत महिपत फातरफेकर.' तुझं नाव मी धोंड्या का ठेवलंय, ठाऊक आहे तुला ? अरे, एखाद्या बाईला पटापट पोरं होतात आणि तशीच ती पटापट मरून जातात. मग ती अंगारेधुपारे करते. नवससायास करते. हमखास नवसाला पावणाऱ्या देवाला चांदीचा करदोटा बांधते. मग तिचं एखादं पोर जगतं. नवससायासानं जगलेल्या पोराचं नाव ठेवते दगड्या नाहीतर धोंड्या. त्याला दृष्ट लागू नये म्हणून ! तसाच तू मला या धटिंगण जगात नवससायासानं लाभलेला मायेचा पूत. म्हणून तुला मी प्रेमानं म्हणणार ' धोंड्या,' कधी लाडानं ' धोंडिबा ', तर कधी आदरानं ' धोंडोपंत ! "

हे ऐकता ऐकता कुत्रेही जणू कळत असल्यासारखे मान हालवत होते. त्याच्या आर्त डोळ्यात तरारलेले पाणी त्या अंधारातही मोत्यासारखे चमकत होते.

आणि तो जिथे नोकरी करीत होता, त्या कॉलेजातही सगळा आनंदी आनंदच होता. त्याचे कुणाशी जिव्हाळ्याचे तर राहू द्यातच; पण साधे औपचारिकही संबंध नव्हते. तो स्टाफरूममध्ये देताच तिथल्या मुखंड प्राध्यापकांची तोंडे एरंडेल प्याल्यासारखी वाकडी होत. कपाळावर आठ्यांची कोळीष्टके जमत. मग त्याला चुकवण्यासाठी कुणी स्टाफरूममधून उठून लायब्ररी गाठत. कुणी पत्त्याचे अड्डे किंवा कॅरम खेळण्यात इतके रंगून जात, की मान वर करूनही त्याच्याकडे पाहात नसत. एकदा तर एका जरठ कुमारी प्राध्यापिकेने तो आपल्याकडे वाकड्या नजरेने पाहतो, म्हणून प्रिन्सिपॉलकडे तक्रार केली होती आणि प्रिन्सिपॉलने त्याला त्याबद्दल झापले होते. पोरे त्याच्या तासाला हमखास दांड्या मारत. सुरुवातीला वर्गात आल्याआल्या तो खालमानेने रोलकॉल घ्यायचा आणि नंतर मान वर करून पाहातो तो शेकडा पंचाण्णव टक्के पोरे मागच्या खिडकीतून गायब. मग हे लक्षात आल्यावर तो तास संपताना रोलकॉल घेऊ लागला. तर पोरे मोठमोठ्यांदा जांभया देत. पादण्याचे, खाकरण्याचे आवाज काढीत. कुणी गेंगाण्या आवाजात बकरीसारखे ' म्हँ म्हँ ' करी तर ज्यांच्याजवळ अशी कौशल्ये नसत ते नुसतीच बाके बडवत. किंवा फरशीवर बुटाच्या आवाजाचे ठेके धरीत शिवाय फळ्यावर काही लिहिण्यासाठी त्याची पाठ फिरताच मागून कागदी बाणांचा वर्षाव होई. मग तो शरपंजरी पडलेल्या भीष्माचार्यापेक्षाही जखमी दिसू लागे. मुळात हुशार, करियरिस्ट पोरे फिलॉसॉफीकडे ढुंकूनही फिरकत नसत. ज्यांची लग्ने होता होत नाहीत अशा जून जठर कुमारिका आणि ज्यांना कुठलेच भवितव्य नाही अशी नाठाळ, मद्दड पोरे. त्यांना फिलॉसॉफी काय शिकवणार, हाडकं ! दगडातून पिळून दूध काढता येईल एकवेळ, पण या पोरांच्या डोक्यात फिलॉसॉफी भरता येणार नाही ! त्याची लेक्चर्स भगीरथाच्या गंगेसारखी पोरांच्या डोक्यावरून वाहात जात. आणि तरी पोरे ठार कोरडीच राहात. बाकीचे प्राध्यापक फाजील पाचकळ कोट्या करीत, किंवा हिंदी सिनेमाच्या स्टोऱ्या नाहीतर नटनट्यांच्या गॉसिप्स यावरच गुजराण करीत आणि पोरेही त्यावर खूष असत. पोरांची मने जिंकून घेण्याची प्राध्यापकांच्या भात्यातली ही हमखास यशस्वी अस्त्रे ! किंवा अमोघ मैदानी वक्तृत्वाचा धबधबा. त्यात अधूनमधून तोंडपाठ केलेली इंग्रजी अवतरणे घालून पोरांना अगदी चकित

करून सोडत. पण असल्या गीमिक्सचा महिपतीला मनापासून तिटकारा होता. सततच्या वाचनाने झालेले ज्ञानाचे अजीर्ण तो पोरांपुढे भडाभडा ओकून मोकळा होत असे, त्यात मग विषयांतराचे भान रहात नसे. विवेचनाच्या ओघात किती सांगू न् किती नको, असे होऊन जाई. आणि अतिज्ञान किंवा विषयाचा जादा व्यासंग हा प्राध्यापकी पेशाला निर्माण झालेला धोकाच होता. शिक्षणक्षेत्रातली दुष्ट, घातक रूढी. महिपती हा त्या रूढीचा बळी होता आणि बाकीच्या प्राध्यापकांनी त्या रूढीचे निर्मूलन करण्याचा विडाच उचलला होता. ते पोरांना परीक्षार्थी दृष्टिकोनातून व्हि. आय. पी. नोटस् लिहून देत, पोरांच्यात पॉप्युलर होत आणि सफारी सुटात पोरींवर इंप्रेशन मारत.

महिपतीला क्लासकंट्रोल तर नव्हताच, पण पर्सनॅलिटीच्या बाबतीत तर शुद्ध बोंबाबोंब होती. सुरुवातीला त्याने झकपक रंगीबेरंगी कपडेही वापरून पाहिले. पण त्यात उलट तो जास्तच 'जोकर' दिसायचा. मग तो कपड्यांच्या बाबतीतही बेफिकीर, गबाळ्या राहू लागला. बोट बोट दाढीही वाढू लागली. तर एकदा प्रिन्सिपॉल म्हणाले; 'अहो, निदान दाढी करून चांगले कपडे तरी घालून येत जा. म्हणजे पोरांवर जरा इंप्रेशन पडेल.' त्या अनाहूत सल्ल्याने त्याला थोबाडीत मारल्यासारखे झाले. पण त्याची वर्तणूक काही सुधारली नाही. या खेडवळ गांवढ्या गावात आपल्या व्यासंगाची, ज्ञानाची यत्किंचितही कदर होणार नाही, हे तो नोकरीवर रुजू होतेवेळीच जाणून होता. इथला वाणीही आपल्याला महिन्याचा किराणा उधार देणार नाही, की न्हावी आपखुषीने दाढी खरडणार नाही. जिथे जाऊ तिथे आपल्या वाट्याला येईल ती टरटवाळी, टिंगल, कुचेष्टा, अपमान आणि उपेक्षा. आणि हे आयुष्यभर तो सोसत आला होताच. मग त्यात नवीन असे काय होते?— होय, पण नवीन होते की, या गावाने त्याला आणखी काही दिले होते. त्याची बायको लोखंड्याचा हात धरून गेली, तेव्हापासून लोक त्याच्या तोंडावर शेणकाला फेकल्यासारखे फिदीफिदी हासत. मग तो त्यांना चुकवत, एखाद्या वर्मी बाण लागलेल्या घायाळ हरणासारखा अंधाऱ्या कोपऱ्यात दडून राहिला होता. आणि परिणामी जिवंत जगापासून दूर जात जात त्याचा पुरता स्कॉलर झाला होता. जगाच्या दृष्टीने वाया गेलेला विद्वान— तत्त्वज्ञानाच्या अरण्यात भटकणारा, वाट चुकलेला मुशाफिर!

त्यातून सध्या गॅदरिंगचे दिवस होते. आधीच उल्हास आणि त्यात फाल्गुन मास. आणि एक दिवस तर पोरं त्याला एक शब्द बोलू देईनात. त्यांना एन्टरटेनमेन्ट हवी होती. गप्पांचा मूड होता. ते त्याला सिनेमानट्यांविषयी छेडू लागले. आणि त्याला तर सगळ्याच नट्या साच्यातल्या गौरीच्या मुखवट्यांसारख्या एकसारख्याच दिसत आणि त्याला एक नटी दुसऱ्या नटीपेक्षा वेगळी ओळखू येईना, तशी पोरांनी त्याची जास्तच हुर्यो उडवली. आणि त्याच्या केविलवाण्या अज्ञानाला पोरी फिस्कारून हासू लागल्या. मग तो वैतागून घरी आला. धोंडी मोठ्या प्रेमाने चाटूनपुसून त्याची वास्तपुस्त करू लागला. मग त्याच्या डोक्यात एक चमकदार कल्पना चमकून गेली. तेवढेच शिकवल्याचे समाधान आणि ज्ञानदानाचे पुण्य. भरीला ज्ञानेश्वर माऊलींनी रेड्याच्या तोंडून वेद वदवल्याची पार्श्वभूमी होतीच. मग त्याने कुत्र्याला समोर बसवले आणि तो बोलू लागला—

'पोरं माझी फिलॉसफी ऐकत नाहीत. आता तू

माझा विद्यार्थी. सरेन किर्केगॉरचं नाव ऐकलंयस तू?— त्याचा अस्तित्ववाद तुला समजवून सांगतो. हे बघ, मानवी अस्तित्वाचं स्वरूप बुद्धिप्रणीत नाही आणि म्हणून ते निरर्थक आहे. वस्तुनिष्ठपणे जगण्याचा चांगला व योग्य मार्ग असा नसतोच. तो आपला आपल्यालाच निवडावा लागतो. तेव्हां स्वतःचे जीवन कसे जगावे, कोणता मार्ग सुखकर हे ठरवण्याचे, जीवनाचा मार्ग निवडण्याचे स्वातंत्र्य माणसाला आहे, मी काय म्हणतोय ते समजतंय ना तुला ?— '

आज आपल्या धन्याला काय झालंय, तेच धोंडीला कळेना. तो आश्चर्यचकित नजरेने मालकाकडे पाहू लागला. पण महिपतीला त्यात एक प्रकारची समजदारी आढळली. निदान वर्गातल्या मद्द व नाठाळ पोरांपेक्षा तो नक्कीच जास्त चाणाक्ष व सिन्सिअर होता. त्याच्या चेहऱ्यावर कळतेपणाचे भाव होते व आर्त पाणीदार डोळ्यात सहानुभूतीची लकेर.

' तेव्हा हे निवडीचे स्वातंत्र्य—स्वतःचा जीवनमार्ग निवडण्याचे स्वातंत्र्य—माणसाला आहे म्हणूनच माझी बायको लोखंडेची निवड करते आणि एका तत्त्वज्ञानाच्या प्राध्यापकाला कुत्र्याबरोबर राहण्याचा हक्क प्राप्त होतो. तर ते जाऊ देत ! मी काय सांगत होतो, हां अस्तित्ववादाचे तत्त्वज्ञान. तर, काय मजा येतो यार, कार्ल यास्पर्स वाचताना आणि गाब्रीएल मार्सेलची गम्मत तर काही औरच आहे. तो ईश्वरवादी आहे. तो म्हणतो; मानवी अस्तित्वाची समस्या हे एक गूढ आहे आणि प्रेम, निष्ठा, श्रद्धा ह्यांचे अधिष्ठान जर विचाराला लाभले, तर तिचा उलगडा करता येतो आणि हे ज्ञान केवळ वैचारिक नसते, आपल्या जीवनाला उजळून टाकणारा तो प्रकाश असतो.'—महिपतीचे लेक्चर संपले, तेंव्हा धोंडी त्याच्या मांडीत येऊन निवांत झोपला होता.

असाच एक दिवस महिपत कॉलेजातून घरी आला, तो संतापाने धुमसतच. तर दारात रोजच्यासारखाच धोंड्या. त्याच्या चेहऱ्यावर तोच तो लोचटपणा, लाचारी, स्वामिभक्ती. लाळ गळावी तसा डोळ्यातून ओघळणारा केवीलवाणेपणा. आणि तो लाडात येऊन अंगावर उड्या मारू लागला. रोजच्यासारखाच. त्या लुब्रेपणाने आगीत तेल ओतल्यासारखा महिपतीचा संताप जास्तच उफाळून आला. त्याने त्या कुत्र्याला मानगुटीला धरून उचलले आणि कमरेचा चामड्याचा पट्टा काढून त्याने तो कुत्र्याला सपासप बडवत सुटला.

कुत्रे विव्हळू लागले, रडल्यासारखे केकाटू लागले. त्याच्या जबरी पकडीतून सुटण्यासाठी धडपडू लागले तसा महिपतीला जास्तच चेव चढला. तो जास्तच त्वेषाने दातओठ खात कुत्र्याच्या पाठी—पोटरीवर सपासप वार करू लागला. अनेकदा पट्ट्याच्या लोखंडी बक्कलाने कुत्र्याचे अंग रक्ताळले, चामडे सोलून निघाले आणि त्यावरच कातडी पट्ट्याचे जोरदार चाबकासारखे घाव बसत. आता कुत्र्याला विव्हळण्याचेही त्राण राहिले नव्हते. महिपतीच्या चेहऱ्यावर वेडसर क्रौर्य लकाकत होते. आतून सूड उगवल्याच्या आसुरी आनंदाच्या उकळ्या फुटत आणि मनाच्या त्या बेभान वेड्या अवस्थेत तो ऊरी फुटल्यासारखा बडबडत सुटला. ' भडवे, माझ्यापुढून मिरवतात. मला कुचकेपणाने हासतात. माझ्या षंढपणाच्या जाहिराती गावभर वाटत हिंडतायत. तळपट होईल मेल्यांचे. ' आता त्याला त्या कुत्र्याच्या जागी लोखंडे आणि पार्वती दिसत होती. मग तो अधिकच प्रक्षुब्ध होऊन पिसाटपणे चामड्याच्या पट्ट्याने कुत्र्याचे वाभाडे सोलू लागला. अखेर कसेबसे ते त्याच्या हातून निसटले आणि अगदी भयभीत होऊन कपाटाखाली दडू लागले. तसे महिपतीने त्याच्या शेपटीला धरून त्याला फराफरा बाहेर ओढले आणि त्या अर्धमेल्या मुक्या जनावराला तो लाथाबुक्क्यांनी तुडवू लागला. अखेर या पिसाट क्रोधाच्या मनक्षोभाने तो स्वतःच दमला. हताश होऊन त्याने त्या पिलाला सोडून दिले व अवसान गेल्यासारखा तो मटकन् खालीच बसला.

आज त्याने पार्वतीला लोखंडेबरोबर गॅदरिंगमध्ये मिरवताना पाहिले होते. आणि तिच्या अंगावर निळी रेशीमकाड्यांची तीच झुळझुळीत साडी होती. महिपतीने मोठ्या हौसेने लग्नाच्या पहिल्या व ढदिवशी घेऊन दिलेली. आज मोठ्या दिमाखाने त्यांच्या लग्नाच्या मार्तिकात ती मिरवत होती. आणि शेजारी तो बलदंड युगपुरुष. गर्द तपकिरी सुटात फिजिकल इन्स्ट्रक्टर लोखंडे. एकमेकांच्या गळ्यात गळे घालून मोठ्याने खिदळत ते महिपतीच्या अंगावरून मिरवत गेले आणि जाताना त्याची लाडकी ' पारू ' त्याच्याकडे विखारी नजरेने पाहून कुत्सितपणे हसली ( आणि लोखंडेने सुटावरचे झुरळ झटकावे तशा बेफिकीर ऐटीत त्याच्याकडे पाहून मान झटकली ). हे तिचे विखारी कुत्सित हास्य लग्नाच्या पहिल्या रात्रीपासूनच त्याच्या पूर्ण परिचयाचे होते. एखाद्या चेटकीप्रमाणे ते अघोरी विकट हास्य त्याचा पाठलाग

करीत आले होते. त्या हसण्यातला विखार, किळस, तिरस्कार, संताप, तुच्छता, उपेक्षा एखाद्या दाहक आम्लाप्रमाणे जिव्हारी झोंबे. असे हसण्यापेक्षा तिने पचकन तोंडावर थुंकावे. त्या रात्री आठवल्या की, अंगावर अजून शहारे येतात. तिचा उपभोग घ्यायचा ह्या कल्पनेनेच अंगावर काटा यायचा. दरदरून घाम फुटायचा. आणि छातीवर प्रचंड दडपण. पहिल्या रात्री त्याला काहीच जमले नाही. आणि पुढेही कित्येक रात्री तिला नुसते जवळ घेताच तो गलितगात्र होऊन जायचा. अखेर एका रात्री वैतागून कर्कश स्वरात त्याला ती ओरडून म्हणाली; 'काहीच कसं जमत नाही तुम्हाला?— आणि जमत नाही तर फुका आव तरी कशाला आणता पुरुषार्थाचा?' आणि ती उरी फुटल्यासारखी विकटपणे खदखदा हसत सुटली. हसता हसता मध्येच दसदसून रडू लागली. मग तशीच नग्नावस्थेत धावत बाथरूममध्ये गेली व दरवाजाला आतून कडी लावून घेऊन डोक्यावर गार पाण्याच्या बादल्या ओतून घेऊ लागली. मधूनच हसू लागे, तर मधूनच रडू लागे. रात्रभर ती बाथरूममध्येच होती. आणि तेव्हापासून तिने ते विखारी कुत्सित हसणे सुरू झाले. जिव्हारी रुतणारे. रात्री महिपती कपडे उतरू लागताच ती हसू लागे आणि आधीच नर्व्हस झालेला महिपती जास्तच खचून जाई. त्याला तिच्याकडून दिलाशाची, उत्तेजनाची, कॉन्फिडन्सची जरूर असे आणि ती त्याच्याकडे पाठ वळवून व तोंड फिरवून उसासे सोडत राही. स्वतःच्या हातांनी स्वतःचे स्तन कुरवाळत कुस्करत राही. आणि महिपती जवळ येऊ लागताच एखाद्या झुरळाकडे पहावे तशा किळसवाण्या, तिरस्काराच्या नजरेने महिपतीच्या रोगट, पिवळसर, निस्तेज कातडीकडे पहात राही.

आणि तेव्हापासूनच माजावर आलेल्या कुत्र्यासारखा लोखंडे घराभोवती घिरट्या घालू लागला. पहिल्यांदा महिपतीच्या ओळखीचा फायदा घेऊन. पण त्याच्याशी एक शब्दही बोलण्याची महिपतीची इच्छा नसे आणि बोलण्यासारखे होतेच काय लोखंडेजवळ? त्याला कुठल्याही बौद्धिक गोष्टीत रस नव्हता. मूर्ख, ठोंब्या मनुष्य. एकूण सात वर्षांत चार वेळा परीक्षेला बसून भूगोलाचा थर्डक्लास एम्. ए. पण प्रोफेसर म्हणून मिरवण्याची हौस दांडगी. मग जातीच्या बळावर रोस्टरचा फायदा उठवत कसाबसा एकदा प्रोफेसरचा टिळा लागला. पण पोरांच्यात भलताच पॉप्युलर! पोरे त्याला 'लफडा-मास्टर'

या लाडिक नावाने ओळखत. त्याने स्वतः तर लफडे केले होतेच; पण नट-नट्यांची खरीखोटी लफडी रंगवून सांगण्यात त्याचा हातखंडा होता. म्हणून लफडा-मास्तर! शिवाय बॉडीबिल्डर. काय बिशाद पोरगे हू की चू करेल. कानाखाली फाडदिशी आवाज काढला तर फळ्ळकन चड्डीतच मुतेल. म्हणून दरारा. म्हणून सोकॉल्ड स्कॉलर कारटीही त्याला घाबरून चुपचाप बसायची. आणि मद्द-नाठाळांना तो आपला बाप-भाई वाटायचा. त्यातून महिपतीची बायको पटवल्यापासून त्याच्या पुरुषार्थाच्या शिरपेचात आणखी एक मानाचा तुरा खोवला गेला.

आणि अशा लोखंडेवर आपली बायको भाळावी, हे महिपतीला फार अपमानास्पद आणि लाजिरवाणे वाटायचे. केवळ कातडीची खाज, बाकी काय! बॉडीबिल्डर लोखंडेचे दणकट शरीर. छातीवर तंग स्पोर्टस शर्ट आणि मांड्यांवर घट्ट क्वार्टर पँट घालून तो हातात टेनिसची रॅकेट मिरवत घरी यायचा, तेव्हा पार्वती त्याच्याकडे कशी वखवखलेल्या नजरेने पाहात असेल, ह्याची नुसती कल्पना केली तरी अंगावर सरसरून काटा येतो. आणि तो आपल्याकडे यायचाच नाही मुळी. आपल्या मैत्रीचा बहाणा करीत यायचा तो पार्वतीकडे (कदाचित आपल्या अपरोक्षही). हे तेव्हा लक्षात आले नाही. आज कळलेय. नाहीतरी आपण काय करू शकत होतो?—

आणि अशाच काही पराभूत, लांछनास्पद रात्री-नंतर त्या दोघांचे बिछाने अलग अलग झाले. कधी उबळ आलीच तर धीर करून महिपती तिच्या बिछा-न्यात घुसायचा. आणि ती अर्धवट झोपेत असतानाच तिच्या अंगाशी झटू लागायचा. ती जागी होताच त्याला एखाद्या झुरळासारखी दूर झटकत असे, किंवा कधी दयाभावाने त्याला जवळ येऊ देत असे. पण तिच्या कुशीत झोपल्यावर— ती त्याच्यापेक्षा फूट, दीड फूट तरी उंच असेल— तो एखाद्या आईच्या कुशीत झोपलेल्या बछड्यासारखा दिसे. मग त्याने मोठ्या धीराने गोळा करून आणलेले हे उसने अवसान गळून पडे. त्याच्या पुरुषार्थाचा शेणकाला होऊन जाई. तो गलितगात्र होऊन एखाद्या भिजलेल्या उंदरासारखा स्वतःच्या बिछान्यात येऊन पडे.

अशातच एक दिवस तो कॉलेजातून संध्याकाळी घरी आला, तेव्हा पार्वती घरात नव्हती. केवळ तीच नव्हती, एवढेच नव्हे, तर तिचे दागदागिने, कपडेलत्ते काहीही नव्हते. किंबहुना, तिच्या अस्तित्वाची कोणतीच खूण तिने मागे ठेवली नव्हती. मागे ठेवल्या होत्या त्या फक्त आठवणी. आणि तेव्हापासून महिपती जास्तच एकाकी झाला. बाकी काही असो; पण तिचा घरातला नुसता वावरही त्याला सुखद, सांत्वनपर वाटायचा. तिच्या बांगड्यांची सळसळ, कपडे बदलतानाचे आरशातले प्रतिबिंब, मधूनच ती गुणगुणत असलेली एखादी गाण्याची लकेर, फडताळामध्ये भांडी लावतानाची लगबग, ओचे बांधून केर काढताना... कपाळावर विस्कटलेले भुरभुरणारे केस अशी मनाला भुरळ पाडणारी नानाविध रूपे. आणि आता केवळ आठवणी उरल्या होत्या. तिने रात्रभर त्याला झिडकारले असते, ती कुत्सित विखारी नजरेने त्याच्याकडे पाहून हसली असती, दिवसभर अबोला धरला असता, किंवा कचाकचा भांडली असती तरी चालले असते. तिने लोखंडेबरोबर चोरून वा राजरोसही संबंध ठेवले असते, तरी त्याने ते खपवून घेतले असते. पण घराचे घरपण शाबूत ठेवण्या-साठी तिचा घरातला वावर कायम राहायला हवा होता. ती घर सोडून गेली आणि जाताना आपल्याबरोबर घरही घेऊन गेली. मग उरली ती शून्य धर्मशाळा. घुमटीत घुमणारे आठवणींचे पारवे. एक कर्कश हिंस्रता. ते दिवस फार वाईट गेले. तो जिवंतपणी रोज शंभर मरणे अनुभवत होता.

आणि तशातच एक दिवस ते कुत्र्याचे पिलू घरात आले. त्याने घराला पुन्हा घरपण आले. एक चिमुकला आनंद घरभर वावरू लागला. धोंडीबरोबर त्याचा सुखाचा ठेवा त्याला परत मिळाला.

आता महिपतीचा राग निवळला होता. आपण धोंडीची केलेली दुर्दशा पाहून त्याचे मन कळवळले. तो पिलाला जवळ घेऊन कुरवाळू लागला. गोंजारू लागला. त्याच्या ओल्या जखमांवर मलमपट्टी करता करता त्याची सौम्य हळुवार शब्दात समजूत काढू लागला; 'अरे, आज त्या रांडेला पाहिलं मी लोखंड्याबरोबर— आणि माझं डोस्कंच फिरलं. पण माझं खरंच चुकलं. तिचा राग मी तुझ्यावर काढायला नको होता. फार लागलं का रे तुला?—अरे, या जगात आहेच कोण माझं तुझ्याशिवाय?—' कुत्रे अजूनही केविलवाणेपणाने केकाटतच होते. आणि जास्तच घाबरून जाऊन महिपतीच्या हातातून सुटण्यासाठी धडपडत होते.

त्यानंतर धोंडी आजारी पडला. पुढे आलेल्या अन्नाच्या थाळीला तो तोंड लावेना. त्याची अन्नावरची वासनाच उडाली होती. तो सारखा अस्वस्थ, बेचैन दिसे. त्याचे खेळणे, वागडणे बंद झाले. तो एकसारखा झोपू लागला. जागेपणीही सुस्तावल्यासारखा झोपाळू दिसे. साधे शेपूटही हालवण्याचे भान उरले नाही, इतका तो अशक्त झाला होता. त्याला बोलावले, हाका मारल्या तरी जागचा हालत नसे. त्याच्या जवळ गेले की अंगाला भपकन् दुर्गंधी येत असे. अंगावरची मऊ तुकतुकीत केसाळ दुलई विस्कटल्यासारखी अन् राठ झाली होती. त्याच्या अंगाला हात लावताच चटका बसेल इतके ते गरम झाले होते.

मग महिपतीने भाड्याच्या सायकलवर टांग टाकून तावडतोब शहर गाठले व शहरातून तो पशुवैद्याला घेऊन आला. पशुवैद्याने धोंडीची कसून तपासणी केली. त्याच्या गुदद्वारात थर्मामीटरची नळी घालून ताप पाहिला. त्याला १०२° ताप होता. शिवाय डोळे एखाद्या जखमी श्वापदासारखे दिसत. करुण ओलसर, लाल. त्यातून पू वाहात होता. शिवाय नाकपुड्या ओलसर व त्यातूनही घाण येत होती. तो एकसारखा शिंकत असे. त्याच्या हिरड्या सुजल्या होत्या. श्वासोच्छवास जड झाला होता. थोडीसुद्धा हालचाल केली की धापा टाकायचा. त्याच्या भुंकण्यातही पूर्वीचा जोम राहिला नव्हता. ते वेदनांनी विव्हळल्यासारखे, कण्हल्यासारखे झाले होते. डॉक्टर म्हणाले; ' संभाळा. काळजी घ्यायला हवी. नाहीतर डिस्टेंपरवर जाईल.' आणि डॉक्टर औषधाच्या गोळ्या, ड्रॉप्स देऊन गेले.

मुख्य म्हणजे, धोंडी भेदरलेला होता. तो सारखा भयभीत दिसे. धन्यावरचा त्याचा विश्वासच उडाल्यासारखा झाला होता. महिपतीकडे तो अनोळखी भेदरलेल्या नजरेने पाही. तो जवळ येताच अंग चोरून घेई. त्याने त्याला जवळ घेऊ पाहताच दूर पळू लागे. कॉटखाली लपून बसे. आता महिपतीपुढे प्रश्नच पडला की, त्याच्यात आपल्याविषयी विश्वास कसा निर्माण करायचा ?– मग महिपती रात्रंदिवस त्याच्या उशा-पायथ्याशी बसून राहू लागला. त्याची सेवासुश्रूषा करण्यात रात्रीचा दिवस होत असे. आणि दिवसाचा वेळ पुरत नसे. असे दिवसच्या दिवस

निघून गेले. त्याला वेळच्या वेळी औषधपाणी द्यायचे; त्याच्या अंगाला येणारा कुबट दर्प जावा म्हणून स्प्रे मारायचा; केसात उवा, पिसवा, गोचिड्या होऊ नयेत, किंवा झाल्याच तर मराव्यात म्हणून गरम पाण्यात डी. डी. टी. ची भुकटी मिसळून, त्या पाण्यात नॅपकीन बुडवून त्याने अंग पुसून घ्यायचे (त्या वेळी गरम पाण्याचा शेक मिळाल्याने धोंडीला ते बरे वाटायचे); नंतर त्याच्या ओल्या जखमांवर मलमपट्टी करायची; कोमट पाण्यात बोरिक ॲसिड मिसळून त्या द्रावणाने डोळे धुवायचे तर आल्कोहोलमध्ये कापसाचा बोळा बुडवून त्याने कान पुसून घ्यायचे. अशा प्रकारे महिपतीने नाइटिंगेलच्या सेवाभावाने रात्रंदिवस धोंडीची शुश्रूषा केली. धोंडीच्या आजारपणाच्या काळात त्यालाही अन्नपाणी गोड लागत नव्हते. त्याची झोप उडाली होती. अखेर महिपतीच्या प्रयत्नांना व उपासनेला फळ आले. हळूहळू धोंडी आजारातून पूर्ण बरा झाला. इतकेच नव्हे तर, रात्रंदिवस महिपतीला उश्या-पायथ्याशी बघून त्याच्याविषयी पूर्ववत् निष्ठा व विश्वास त्याच्या मनात निर्माण झाला. त्या मुक्या प्राण्यालाही आतून कुठेतरी महिपतीची माया जाणवली असावी.

महिपतीही या काळात तनमनाने संपूर्ण धोंडीत गुंतला होता. तो जणू पुरा श्वानमयच झाला होता. त्याला कुत्र्याच्या आजारपणाचा काहीच अनुभव नव्हता. म्हणून त्याने ह्या काळात कुत्र्यांसंबंधी भरपूर वाचन केले. शिवाय पदरी धोंडीचा जिवंत अनुभव होताच. मग त्याच्या डोक्यात एक विलक्षण कल्पना चमकून गेली. आणि त्या कल्पनेनेच तो मोहरून गेला. आपणच कुत्र्याच्या जीवनपद्धतीविषयी एक पुस्तक का लिहू नये? शिवाय त्याला एक तत्त्वज्ञानात्मक पार्श्वभूमीही देता येईल. ही ती कल्पना.

मग पुस्तकाची काही प्रकरणे त्याच्या मनात जुळत गेली. 'श्वानवंशाचा सोपपत्तिक इतिहास', 'श्वानवंशाचे जातिभेदात्मक स्वरूप', 'एका कुत्र्याचे मनोगत', 'कुत्र्याच्या दृष्टिकोणातून माणूस' वगैरे, वगैरे आणि पुस्तकाचे शीर्षक : "सारे काही, कुत्र्याविषयी!" (Everything About Dog).

पण एक गोष्ट खरी की, कुत्र्याच्या वर्तनाचा, स्वभावविशेषांचा, कुत्र्या-कुत्र्यातील परस्परसंबंधांचा तार्किक उलगडा काही त्याला करता आला नाही. कदाचित् प्रेमद्वेषाचे परस्परात गुंतलेले मूलबंध त्यांना एकत्र ठेवत असावेत. माणसांपेक्षा कुत्र्यांमध्येच ते जास्त प्रकर्षाने व उघडपणे जाणवत. एका क्षणी ते एकमेकांवर घोगऱ्या कर्कश स्वरात गुरगुरतील, एकमेकांच्या अंगावर धावून जातील, पोटऱ्यांचे लचके तोडतील; तर पुढच्याच क्षणी ते एकमेकांच्या जखमा जिभांनी चाटतील, गळ्यात गळे अन् तंगड्यात तंगड्या अडकवून हिंडतील, एकमेकांच्या अंगावर उड्या घेतील, लाडात येऊन पाठीला पाठ घासत भुईवर लोळण घेतील. शरीराला आळोखेपिळोखे देत, आ वासून, दात विचकत मोठमोठ्या जांभया देतील (त्यांनी दात विचकले की ते हसतायेत, असे वाटते). आणि त्यांच्यात एक प्रकारची 'प्रादेशिक अस्मिता' असते. एरव्ही एकमेकांशी अटीतटीने भांडणारी एका गल्लीतली कुत्री त्या गल्लात परके कुत्रे येताच एकसाथ भुंकू लागतील, त्याच्यावर एकसाथ तुटून पडतील, त्याचा लांडग्यासारखा पाठलाग करीत त्याला गल्लीबाहेर पिटाळतील....'एका कुत्र्याच्या मनोगता'तले कुत्रे म्हणते की, तुम्हा माणसांच्या मुलांना आईस्फ्रूटची कांडी चोखतांना जो आनंद मिळतो, तोच आम्हा कुत्र्यांना हाडे चघळतांना मिळतो. आणि तीही मानवी हाडे. आम्ही जी हाडे जमिनीत पुरून ठेवतो, ती आमच्या उद्याच्या अन्नाची बेगमी असते. वास्तविक आमच्या दूरदर्शी धोरणाची व भवितव्याच्या तरतुदीची तुम्ही तरफदारी केली पाहिजे...शिवाय कुत्र्यांना उपजतच संगीताची एक विलक्षण जाण असते. एका कुत्र्याने गळा काढला की बाकीची त्याच्या सुरात सूर मिसळून भुंकू लागतात. मग त्यांचा एक 'कोरस' होतो आणि त्या कोरसचाच 'सिंफनी ऑर्केस्ट्रा'. कधी करुणरम्य शोकात्म सूर (त्यालाच पामर मानव कुत्र्याचे रडणे समजतो व ते अशुभ मानतो) आळवतील, तर कधी 'काळी पाच' उच्च सुरात गातील (त्यालाच माणसे कर्कश केकाटणे म्हणतील), तर कधी मंद मधुर भुंकतील. ही संगीताची संसर्गजन्य साथ एका कुत्र्यापासून पसरत पसरत आख्ख्या कुत्र्यांच्या टोळीत पसरते व ते एका साथीत एका सुरात गाऊ लागतात. 'आम्ही श्वान महान; हा तर इमानाचा मान; आम्ही श्वान महान कुत्र्यावाचून माणूस जगतो, ठेवून प्राण गहाण' असे आमचे एक 'राष्ट्रगीत' असून ते वृंदगानाच्या चालीत बसवलेले आहे. माणसाला अगम्य व दुर्बोध असणारी कुत्र्यांची भाषा ही मूलतःच संगीतमय आहे. कुत्र्यांमध्येही गानकोकिळा लता मंगेशकर व स्वरसम्राट महंमद रफी

मराठी कथावाङ्मयात मोलाची भर घालणारे
कथा या वाङ्मयप्रकाराची कक्षा रुंदावणारे
'मौज प्रकाशन गृहा'चे उपलब्ध कथासंग्रह

**ढग / सांज** : सखा कलाल : अनुक्रमे १४–०० / २०–०० △ **कॉग्ज** : शरच्चंद्र वासुदेव चिरमुले : १२–५० △ **मुखवटे** : आनंद विनायक जातेगावकर : १७–५० △ **वेलबुट्टी** : ए. वि. जोशी : ७–५० △ **एरियल आणि पोरकं पाखरू** : अनिल डांगे : १५–०० △ **गाणे** : विजय तेंडुलकर : ५–०० △ **विअरन्ने सहा कॅन्स** : नरेश : १८–०० △ **यक्षांची देणगी** : जयंत नारळीकर : ३२–५० △ **विभूत** : मंगेश पदकी ७–५० △ **एका नृत्याचा जन्म / जांभूळ** : श्री. दा. पानवलकर : अनुक्रमे १५–०० / २८–५० △ **त्रिसुपर्ण** : प्रभाकर पाध्ये : २१–५० △ **देवचाफा** : विद्याधर पुंडलिक : २०–०० △ **जुम्मन** : श्री. ना. पेंडसे : ६–०० △ **जहाज** : बाळकृष्ण प्रभुदेसाई : १५–०० △ **मारवा** : आशा बगे : २८–०० △ **मिटलेले आकाश** : वी. रघुनाथ : ६–०० △ **आणि बाकीचे सगळे** : श्याम मनोहर : १२–०० △ **सीताराम एकनाथ** : व्यंकटेश माडगूळकर : ४–५० △ **आदिकथा** : दि. बा. मोकाशी : १५–०० △ **हुंकार** : विजया राजाध्यक्ष : ५२–०० △ **पश्चिमकडा** : तारा वनारसे : ५–५० △ **शिरवा** : शांताराम : ३–५० △ **चाहूल** : अंबिका सरकार : ८–०० △ **शोध** : सानिया : १२–०० △ **सोलेदाद** : विलास सारंग : १३–२५ △ **कवडसा** : उर्मिला सिरुर : १०–००.

**मौज वितरण :**

**सावली** : सुमा करंदीकर : १०–०० △ **मांडियला खेळ** : नीलिमा भावे : ३६–०० △ **कमान** : विजया राजाध्यक्ष : १६–००.

**मौज प्रकाशन गृह**

खटाववाडी, मुंबई ४०० ००४.

निपजू शकतात, हे तुम्हा माणसांनी ध्यानात घेतलेले बरे– 'कुत्र्याचे मनोगत' या प्रकरणात आणखीही बऱ्याच गंमतीजमती होत्या; त्यातला एक कुत्रा म्हणतो की, 'मुळात कुत्र्याची जात सरसकट एकच होती. आमच्यात 'वांशिक एकात्मतेची भावना' होती. पण तुम्ही मानवांनीच आमच्यात जातीय तणाव निर्माण केले. आमची जातवार विभागणी केली (कारण मुळात तुम्ही जातीयवादी आहात). तुम्हीच आमच्यात अल्सेशियन, डॉबरमन, पॉमेरियन, बूलडॉग, डॅशहऊंड, ब्लडहाउंड, रीट्रीव्हर, पॉइंटर, सेटर, कॉकर स्पॅनिएल, बॉक्सर, सलुकी, अशा असंख्य बारीकसारीक जातीजमाती निर्माण केल्या आणि त्यातून आमच्यात उच्चनीचतेची, स्पृश्यास्पृश्यतेची भावना निर्माण झाली व जातीय संघर्ष पेटले (मुळात आम्ही फक्त नैसर्गिक भिन्नता व वर्णभेदच मानत होतो. उदाहरणार्थ, गोरा कुत्रा, काळा कुत्रा, तपकिरी कुत्रा, सोनेरी, तांबुस ठिपक्या-पट्टयांचे कुत्रे; कुणी केसाळ तर कुणी टकल्या कुत्रा; उंच-बुटके, कुणी ताठ शेपटीचे, तर कुणी गोल शेपटीचे कुत्रे वगैरे, वगैरे. आणि हे भेद ईश्वरनिर्मित मानून त्याविषयी कधी आम्ही खेदखंत, वा न्यूनगंड–अहंगंड बाळगले नाहीत)...आजवर आम्ही तुम्हा मानवांच्या कल्याणासाठी आणि उपयोगासाठी आमचे देह चंदनासारखे झिजवत आलो; पण त्याची तुम्ही काहीच कदर केली नाहीत (काही सन्मान्य अपवाद वगळता) उलट कृतघ्नपणेच वागत आलात. आम्ही तुमचे रक्षक–राखणदार होतो, शिकारी–मदतनीस होतो. आमच्या निष्ठा आमचे इमान सर्वस्वी तुमच्या पायी वाहून सेवा करणारे स्वामीनिष्ठ सेवक होतो. पण तुम्ही आमच्या निष्ठांचा गैरफायदा उठवून आम्हाला नकोनकोती लाजिरवाणी कृत्ये करायला लावलीत. केवळ 'शोभेची कुत्री' म्हणून जी आमची जात आहे, ती मूळ कुत्र्याचे स्वभावधर्म, आचारधर्म पार विसरून गेली आहे. कुत्र्याचा लढाऊ शिकारी बाणा, मर्दानी रुबाब, तिखट आक्रमक स्वभाव सारे काही विसरून ते श्रीमंत बायकी मिजास सांभाळण्यात स्वतःला धन्य मानू लागलेत. शिवाय तुम्ही तुमची लाचारी तुमच्या अन्नाद्वारे आमच्या रक्तात भिनवून स्वतःच्या स्वार्थांध दुष्टतेचेच जणू प्रदर्शन केले आहे. आज पायात शेपूट घालून व कान पाडून गल्लीबोळातून लाचार हिंडणारी केविलवाणी बेवारशी कुत्री पाहिली की आम्हाला आमच्या जातीचीच लाज वाटू लागते. शरमेने आमची मान खाली जाते. आम्हालाही आमची अशी एक निसर्गदत्त श्वानसंस्कृती आहे. त्यात काही नीतिमत्ता पाळण्याविषयीचे रूढ पारंपरिक संकेत आहेत. आम्ही जेव्हा चार पायांवर चालत असतो, तेव्हा आम्ही आमच्या गुप्तेंद्रियांची गुप्तता स्वाभाविक रीत्याच पाळत असतो. त्यासाठी आम्हाला कपड्यांची गरज लागत नाही (ही कृत्रिम उपरी वस्त्रसंस्कृती तुम्हा मानवांची. आणि ती तुमची तुम्हालाच लखलाभ होवो). पण तुम्ही सर्कशीतल्या कुत्र्यांना दोन पायांवर चालायला शिकवून आमची जाहीर विटंबना करता. आणि तुमच्या मटणपावाला चटावलेली ती कुत्रीही तुमच्या कौतुकाच्या व टाळ्यांच्या अपेक्षेने निर्लज्ज नागडेपणाचे प्रदर्शन करीत, ऐटीत मागच्या दोन पायांवर हिंडून दाखवतात. धन्य तुम्हा मानवांची! ही सर्कशीतली कुत्री म्हणजे आमच्या कुळजातीला लागलेला एक कलंकच आहे. आणि आता तुम्हा माणसांच्या नीतिविषयी बोलायचे, तर पंचपांडवात एक द्रौपदी म्हणून तुम्ही त्या पतिव्रतेचे सारे कौतुक करता. पण त्या आम्हाला मुळीच आश्चर्य वाटत नाही. कारण आमच्या संस्कृतीत एक कुत्री अनेक कुत्र्यांबरोबर गुण्यागोविंदाने एकत्र नांदू शकते. या नैतिकतेच्या पार्श्वभूमीवर आम्हाला आमच्या 'सर्बेरस' या प्राचीन आद्य पूर्वजाचा विलक्षण अभिमान वाटतो. तीन डोक्यांचा व सर्पाच्या शेपटीचा सर्बेरस. नरकाच्या दारावरचा राखणदार. नरकाच्या गर्तेत खितपत पडलेल्या पापात्म्यांना तो नरकातून बाहेर पडू देत नाही आणि स्वर्गाऐवजी वाट चुकून नरकाच्या दारात येणाऱ्या पुण्यात्म्यांना तो भुंकून भुंकून नरकाच्या जवळपासही फिरकू देत नाही. अशा रीतीने तिथे तो तुमच्या मानवी नीतिमत्तेचे रक्षण करतो आहे आणि इकडे पृथ्वीवर तुम्ही आमची नीतिमत्ता भ्रष्ट करीत आहात. वारे वा! खासा मानवी न्याय!

इकडे महिपतीचे पुस्तक जसे पूर्ण होत आले; तसा तिकडे धोंडी वयात आला!

वयात आलेला धोंडी मोठा रुबाबदार व देखणा दिसायचा. घोटीव, निमुळता चेहरा. पिंगट, टपोरे, पाणीदार डोळे. डोळ्यांभोवती व तोंडावर सतेज काळेपण. बाकी झळझळीत तपकिरी वर्ण, त्याला सोनसळी झाक. कपाळावर गंधाचा बाटावा असा लालसर केशरी उभट पट्टा. त्यामुळे दैवी अंश. जणू





अनुक्रमणिका

दत्तगुरूंच्या तसविरीतून उडून आल्यासारखा वाटावा. उंच टवकारलेले टोकेरी निमुळते, केवड्याच्या पानासारखे कान. शेपटीची गिर्रेबाज वेलांटी, वयात आल्याने तो आता चांगला उंचनींच, धिप्पाड आणि आडदांड दिसायचा. त्याच्या अंगाला, माद्यांना आकर्षित करणारा, मदोन्मत्त पुरुषी गंध येत होता. त्यामुळे त्याला जपणे फार आवश्यक होते. म्हणून महिपती त्याला कुठे एकटे भटकू देत नसे. त्याला घेऊन तो फिरायला बाहेर पडायचा. आणि त्याच्याभोवती गावठी कुत्र्यांची नुसती झुम्मड उसळे. हाड हाड करून त्यांना हाकलताना महिपतीला पुरेवाट होऊन जाई. महिपतीने मोठ्या हौसेने धोंडीच्या गळ्यातल्या कॉलरपट्टयाला घुंगूरमाळ बांधली होती. त्याने मान झटकली की, त्या घुंगरांचा किंकिणनाद होत असे. आणि धोंडी माद्यांना आकर्षित करून घेण्यासाठी आर्जवी मधूर स्वरात, घुंगरांच्या तालावर भुंकत असे. त्या कॉलरपट्टयात गुंतवलेल्या साखळीचे एक टोक महिपतच्या हातात असे.

महिपती कुत्र्याला घेऊन फिरायला बाहेर पडला, की ते दृश्य पाहून लोक फिदीफिदी हासू लागत. कारण ते मोठे विचित्र दिसत असे. जणू कुत्राच महिपतीला घेऊन फिरायला बाहेर पडला आहे. कुत्रा बेफाम धावत सुटे आणि त्याच्यामागे साखळीला धरून महिपती फरफटत जाई. कुत्रा त्याला अक्षरशः वाटेल त्या दिशेला खेचून नेत असे. त्याच्या मागून धावताना महिपतीची नुसती त्रेधातिरपीट उडत असे. आणि त्याला पळता भुई थोडी होऊन जाई. त्या थोराड आडदांड कुत्र्यापुढे बुटबैंगण महिपती लहानखुरा, किरकोळ वाटे. मग गल्लीतली टवाळ कार्टी हे विजोड जोडपे पाहून कुत्र्याला म्हणत मिस्टर बजरबट्टू आणि महिपतीला मिसेस बजरबट्टू !

पण महिपतीला लोकांची पर्वा नव्हती. त्याला काळजी होती धोंड्याची. कारण तो आता वयात आला होता आणि त्याला मोकळे सोडण्यात नैतिक धोका होता. माजाला आलेला धोंडी कुठल्याही गावठी कुत्रीबरोबर लौंगट करील, ह्याचीच महिपतीला भीती होती. तो फिरायला जात असताना वारंवार धोंडीला बजावायचा;

'तू उच्चकुलीन खानदानी कुत्रा आहेस, हे विसरू नकोस. अल्सेशियन हे तुझं ब्रीड आहे. रस्त्यातल्या कुठल्याही सडकमैना कुत्रीकडे मान वर करून पाहशील, तर याद राख, चाबकाने फोडून काढीन. शिवाय तू एका तत्त्वज्ञ प्राध्यापकाचा चारित्र्यसंपन्न कुत्रा आहेस, हे लक्षात ठेव. तुझ्याबरोबरच माझ्याही कुळाला बट्टा लागेल, असं काही करू नकोस–' मग धोंडीकडे मोठ्या कौतुकाने व अभिमानाने पाहात व त्याची पाठ थोपटत तो कधी कधी म्हणायचा; 'मी एखादी खानदानी उच्चकुलीन कुत्री पाहून तिचा तुझ्याशी रीतसर शरीरसंबंध जोडून देईन. पण तोवर तू सक्तीचे ब्रह्मचर्य पाळलेच पाहिजेस. रस्त्यावरच्या कुणा भिनी-यांशी व्यभिचार केलास तर फोकळून काढीन.' मग तो रोज धोंडीला साखळीने बांधून घरात कोंडून ठेवू लागला. त्याला कधीच मोकळा सोडेना. त्याला फिरायलासुद्धा रोज सकाळ-संध्याकाळ स्वतःच घेऊन जायचा. आणि त्या माजाला आलेल्या जनावराच्या मागे धावताना त्याची होत असलेली फरपट पाहून लोक रोजच हसायचे.

पण धोंडी दिवसेंदिवस जास्तच उन्मत्त व आडदांड होत चालला होता. तो महिपतीला जुमानत तर नसेच; उलट त्याच्यावरच गुरगुरत असे. एक सारखा साखळीला हिसडे देत राही. ती साखळी तोडण्यासाठी दाताने कचाकचा चावत असे. हीटवर आलेला तो धिप्पाड आडदांड कुत्रा लैंगिक उपासमारीने पिसाळल्यासारखा झाला होता.

आणि अशातच महिपत एक दिवस मोठ्या खुषीत घरी आला. त्याचा आनंद मनात मावत नव्हता. तो उसळी मारून सगळ्या शरीरात पसरला होता. त्याच्या हालचालींतून, चेहऱ्यावरून, चालल्या-बोलण्यातून तो ओसंडत होता. आपणही कुणीतरी आहोत, जगाने कितीही नगण्य मानले तरी आपल्यालाही मानाने जगण्यासाठी आपला असा एक कोपरा आहे, अशा प्रकारचे स्वैर विचार त्याच्या मनात तरंगत होते. त्याच्या कुत्र्यावरच्या पुस्तकाला राज्य शासनाचा पुरस्कार मिळाल्याची बातमी आली होती. त्या गांवढ्या खेडेगावाला त्याची यत्किंचितही कदर नव्हती. कॉलेजमध्ये तर त्याचे साधे औपचारिक अभिनंदनही कुणी केले नव्हते. ती आनंदवार्ता कुणाला तरी ओरडून सांगावी; आपल्या आनंदात कुणीतरी हार्दिक सहभागी व्हावे, अशी तीव्र उत्कंठा त्याला लागून राहिली होती. आणि त्याला धोंडीशिवाय जिवाभावाचे असे दुसरे कोण होते?

शिवाय ते पुस्तक लिहिण्याची प्रेरणा त्याला धोंडीच्या आजारपणातूनच मिळाली नव्हती का ? – म्हणून त्या यशाचे निम्मेशिम्मे श्रेय धोंडीचे होते आणि यावद्दलचे ऋण व्यक्त करण्यासाठी म्हणून त्याने ते पुस्तक धोंडीलाच अर्पण केले होते. पुस्तकाची अर्पणपत्रिका म्हणजे कृतज्ञतेची पावतीच होती.

'चि. धोंडीस—तुझ्या स्वामीनिष्ठेला जाज्वल्य इतिहास आहे.'

छत्रपती शिवाजी महाराज, शाहू महाराज यांनी आपल्या लाडक्या इमानी कुत्र्यांच्या समाध्या बांधून त्यांची स्वामीनिष्ठा चिरस्थायी स्मारकाच्या रूपात अजरामर केली होती. आणि महिपतीने आपले बक्षीसपात्र पुस्तक धोंडील अर्पून.

त्यामुळे आज महिपती धोंडीवर भलताच खूष होता आणि त्याला खूष करण्यासाठी म्हणून महिपतीने शहरातून खास मसालेदार कबाब आणले होते. केव्हा एकदा घरी जातो अन् धोंडीला ही आनंदवार्ता सांगतो, असे महिपतीला होऊन गेले होते.

पण धोंडी आज अजिबात मूडमध्ये नव्हता. तो संतापाने धुसमुसत होता. त्याच्या त्वेषाचा, क्रोधाचा उद्रेक त्याच्या साखळीला हिसडे देण्यातून बाहेर पडत होता. त्याचा तो लिंगपिसाट संताप महिपतीच्या लक्षात आलाच नाही. तो आनंदाच्या भरात मोठ्या प्रेमळपणे धोंडीला गोंजारू लागला आणि त्या क्षणीच बेभान, उन्मत्त, पिसाळलेला धोंडी महिपतीच्या मनगटाला कडकडून चावला.

महिपतीचा फुललेला आनंदाचा पिसारा क्षणार्धात गळून पडला. तो संतापाने बेभान, अनावर झाला. क्रोधाच्या वेड्यावाकड्या लाटा प्रचंड आवेगात शरीरभर उसळू लागल्या. विलक्षण प्रक्षुब्ध होऊन तो किंचाळला,

'तू फार माजलायस धोंड्या—माज चढलाय भडव्या तुला—बाहेरचं जग मला वैरी झालं, म्हणून तुला जवळ केला मी. म्हटलं, हा मुका प्राणी तरी इमानानं, निष्ठेनं शेवटपर्यंत जवळ राहील, आयुष्यभर साथसंगत करील. अंतःकरणातलं सगळं प्रेम ओतलं तुझ्या उरावर मी— माझं नाव दिलं तुला, माझं ज्ञान दिलं-पोटच्या पोरासारखा तुझा प्रतीपाळ केला मी, आणि त्याचे पांग तू असे फेडलेस ? या वैरी जगाचा घटिंगणपणा उतरलाय तुझ्यात--घटिंगण झालायस तू ! आज माझ्या मनगटाला चावलास, उद्या मलाच आख्खा फाडून खाशील—थांब भडव्या, आता तुझा कायमचाच बंदोबस्त करतो—'

आणि प्रक्षुब्ध झालेला महिपती तसाच त्या सणकेच्या भरात, कुत्र्याला, घरात कोंडून, शहरात गेला. त्याने गुंगीचं औषध आणि एक रामपुरी सुरा बाजारातून विकत घेतला. रात्री आपल्याला आवडलेल्या मसालेदार कबाबात गुंगीचे औषध मिसळलेय ह्याचा धोंडीला जराही संशय आला नाही. तो भरपेट जेवला आणि त्या सुस्तीत गुंगीचा अम्मल चढल्यावर निवांत झोपी गेला.

मग मध्यरात्रीच्या काळोखात, सर्वत्र पसरलेल्या नीरव शांततेत महिपती बिछान्यातून हलकेच उठला. उशाशी ठेवलेला सुरा त्याने उचलला. त्याचे धारदार उजळ पाते भोवतालच्या अंधारात अमानुषपणे लकाकत होते. निवांत घोरत पडलेल्या धोंडीजवळ तो गेला आणि हातातला सुरा कुत्र्याच्या गळ्यावर टेकवत त्याने सफाईने कुत्र्याचा गळा उभा चिरून काढला. क्षणार्धात तिथे रक्ताचे थारोळे पसरले आणि आचके देत देत कुत्र्याने प्राण सोडले. रक्ताच्या थारोळ्यात मरून पडलेल्या त्या कुत्र्याचे डोळे मात्र अजूनही सताड उघडेच होते आणि आर्त, पाणीदार लकाकत होते. त्या डोळ्यांतले केविलवाणे भाव पाहून महिपतीला भडभडून आले आणि कुत्र्याच्या कलेवराला छातीशी कवटाळत तो ओक्साबोक्सी रडू लागला. ■

## साभार स्वीकार : लेख–संग्रह

**मानवतेचे भवितव्य** : बी. एम्. लोणकर, सौ. विमलाबाई लोणकर, पर्वती गाव, पुणे, १९८५, रु. ३० △ **राजकारणी संत समर्थ रामदास** : डॉ. रा. शं. वाळिंबे, नीहार प्रकाशन, पुणे, १९८५, रु. ६० △ **ग्रामीण शिक्षक : कथा नि व्यथा** : शशिकांत महाडेश्वर, रणजित प्रकाशन, कोल्हापूर, १९८५, रु. १५ △ **सम्बन्ध** : अनेक लेखक–संपादक, हिंदी ग्रंथालय, टिळक स्मारक मंदिर, सांगली, १९८५, रु. १२ △ **अक्षरहास्य** : चिं. वि. जोशी, विद्युल्लता वाघ–संपादक, कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे ३०, १९८५, रु. ३५ △ **मनरंग** : सौ. पद्मा मोरजे, पद्मगंगा प्रकाशन, अहमदनगर, १९८४, रु. १०.

# आकाश पेलताना

## रेखा वैजल

आभाळ अगदी भरून आलेलं. कोणत्याही क्षणी कोसळेल असं. मधेच वारा येतो. पण त्या घनदाट ढगांमध्ये हरवून जातो. मीरा खिडकीतून पाहात राहाते, पण त्या पाहाण्यात तिची नजर नसते, दृष्टी हरवून ती कुठल्याशा विचारात हरवलेली असते....

"ताई," राधेच्या हाकेनं मीरा भानावर येते.

"ताई, अंगावर शाल घे ना! अशी उघड्यावर नको उभी राहूस." ती नुसतं एवढं म्हणून राह'त नाही तर शाल आणून मीराच्या अंगावर टाकू पाहाते.

"काही नको. एवढयातेवढ्यानं काय होणार आहे मला." मीरा तुटकपणे म्हणत शाल झटकून टाकते. शाल खाली पडते.

राधा काही न बोलता शाल उचलते आणि घडी करून ठेवते. ते पाहून आपण का चिडलो याचा विचार मीरा करू लागते. आपण राधावर चिडलो की स्वतःवर. उघडं वारंही सहन करू न शकणाऱ्या या शरीरावर? या काही दिवसात आपलं चिडचिडणं वाढलंय हे तिचं तिलाच जाणवतं. आपल्याच मनाचा शोध घेऊ पाहाता ती शरमते. सदानंद आणि राधाबद्दल हे असे विचार आपल्या मनात आहेत? आपल्यातल्या न्यूनतेमुळे तर आपण तिचा राग करीत नाही ना!

"राधा, दे ती शाल."

राधा काही न बोलता शाल तिच्या कृश देहावर पांघरते.

"I am sorry Radha, पण हे दुखणं..."

"ताई, तुझ्या दुखण्यापेक्षा मनाचच दुखणं अधिक आहे ग! ते कमी कर...बघ कशी लवकर बरी होशील ते!"

"मी...? आणि बरी! आणि समज झाले तरी काय मिळणार आहे?"

"तुला काय हवंय ताई?" राधाचा स्वर तीव्र होतो.

"तुला माहिती आहे मला काय हवय ते!"

"तुला मूल हवंय ना? समजा, नाही झालं ते तरी..."

"ते होणारच नाहीये."

"ठीक आहे. नाही होणार. पण कधी तरी सदानंदना तरी विचार त्यांना काय हवंय ते! त्यांना मुलापेक्षा तूच हवी असली तर..."

"त्यांना मीच हवी आहे ग...."

"मग तरी..."

"त्यांच्या चांगुलपणा फायदा मी किती दिवस..."

"कमाल आहे ताई! फायदा, तोटा हा विचार परक्यांच्या बाबतीत करायचा. सदानंद तुझे आहेत... अगदी तुझे. तरी तू...आणि समज, सदानंद तुला मूल देऊ शकले नसते तर...?"

"ह्या 'जर तर'च्या प्रश्नांवर आयुष्य उभारलेलं नसतं."

"पण ह्या 'जर तर' वरूनच थोडासा रस्ता शोधता येतो ना!"

मीराला या वर पुढे बोलावसं वाटत नाही. ती त्या गडद राखाडी रंगात बुचकाळून काढल्यासारख्या दिसणाऱ्या वस्तुमात्राकडे पाहात राहाते.

पाहाता पाहाता पाऊस कोसळायला लागतो.

"राधा, पूर्वी आपण किती भिजायचो नाही पावसात!"

"अजूनही भिजशील."

"हंऽऽ...राधा, मला कधी कधी आईचा राग येतो. आईनं आपली नावं ही का ठेवलीत? मीरा आणि राधा...दोघी दुःखी. जे हवं ते न मिळालेल्या. आयुष्यभर तळमळणाऱ्या. नावासारखं नशीब घेऊन येतं बघ माणूस. माझं हे दुखणं....आणि तू....ही अशी."

मीरा राधाच्या मोकळ्या गळ्याकडे आणि कुंकू नसलेल्या कपाळाकडे पाहात म्हणते.

राधाला हसू येतं. ताईची समज कोणीकडे चाल

लीय? स्वतःला झालेल्या दुखण्यासाठी ती आता स्वतःच्या नावाला दोषी ठरवतेय.

"हसलीस?"

"मग काय करू? तुझं एक एक बोलणं ऐकून हसू येतंय. लहान मुलासारखंच काही तरी...!"

"राधा मूल न झालेल्या माणसाचं मूलपण भागत नाही. मग ते तसंच वागतं मुलासारखं."

"ताई, परिस्थिती आहे तशी स्वीकारली तर त्रास कमी होतो."

"मी तरी दुसरं काय करतेय?"

"खंतावतेस, चिडचिडतेस. तुला सदानंद आहेत. मी आहे...... पण मला..."

"राधा ऽ!"

"ताई, समजूत नको काढूस. जे होणार होतं ते घडलं. ह्यातून आता मार्ग शोधायचाय."

समोर राधा आहे की कुणी प्रौढ, समजदार व्यक्ती?

तेवढ्यात स्कूटरचा आवाज कानावर येतो.

"सदानंद आलेत वाटतं...!"

"हं"

सदानंद निथळत आत येतो. राधा ते पाहाते. घाईनं जाऊन टॉवेल घेऊन येते. सदानंदला देते. हातातली बॅग काढून घेते.

मीरा हे सर्व पाहाते. 'जे सगळं मी करायला हवं ते राधा करतेय!' तिची खोकल्याची उबळ उसळते.

"How are you Meera?" तो केस टॉवेलनं कोरडे करीत विचारतो.

याला कसं उत्तर द्यायचं? तिखट की सौम्य?

"माझ्यात काय फरक होणार आहे?" तिच्या क्षीण आणाजात खोचकपणा येतो. सदानंद काही न बोलता डोकं पुसत राहातो.

राधा चहा करून आणते. आल्याचा वास दरवळत मीरापर्यंत येतो.

"आलं घातलंस?"

"हो, भिजून आलेत ना! तुला हवाय चहा ताई?"

"केला असशील माझ्यासाठी तर दे–" राधा त्या तिखट शब्दांकडे दुर्लक्ष करून पटकन आत जाते. सदानंद मीराजवळ येतो. तिच्या केसांवरून हात फिरवतो.

'चहा प्यायचाय? घे ना." तो कप तिच्यापुढे करतो. त्याच्या हळुवार मृदू स्वरामुळे ती गहिवरते.

आपण असे का वागतो? तोडून का बोलतो? तिचे डोळे भरून येतात.

"मीरा रडायचं नाही."

"क्षमा करा सदानंद...मी फार दुखावते तुम्हाला."

"मीरा, दुखण्यामुळे होतं असं. आम्हाला त्याचं काही वाटत नाही."

त्याचा 'आम्हाला' हा शब्द तिच्या जिव्हारी लागतो. 'आम्हाला' म्हणजे सदानंद आणि राधा हे दोघं नकळत जवळ येताहेत. त्यातून मी वेगळी पडतेय. तिच्या डोळ्यातलं पाणी आटतं. क्षणांचा पश्चात्ताप ही संपतो.

"ताई घे." राधा चहा आणून देते.

"राधा, भूक लागलीय. लवकर काही तरी कर."

"गवारीच्या शेंगा दिसल्या काल बाजारात. आणल्यात मी."

"अरे वा..."

सदानंदची आवडनिवड राधा कशी लक्षात ठेवतेय. मीराला पुनः खोचक बोलावं वाटतं पण ती गप्प बसते. राधा आहे म्हणून घर आहे. सूज्ञ विचार करते.

"मीरा, औषधं घेतली?"

"हो."

"दिवसभर काय केलं? काल लायब्ररीतून पुस्तकं आणली. राधा...हिला वाचून दाखवली की नाही?"

"माझं नाही वाचनात मन रमत. आणि राधा नीट वाचतही नाही. सारखी अडखळते." पुनः तोच दुष्ट स्वर.

राधा आत निघून जाते.

सदानंद पेपर वाचतो. मोठ्यानं. ती ऐकत राहाते.

तेवढ्यात शेजारची मुग्धा येते. गोबरीशी....केसांवर सोनेरी झाक आलेली.

"काका, बागेतली फुलं घेऊ?"

"हो....घे ना. पण त्या आधी एक पापा." सदानंद तिला वर उचलतो. ती आपले इवलेसे हात त्याच्या गळ्यात घालते. गाल पुढे करते.

मीरा डोळे घट्ट मिटते. मनातून ते दृश्य पाहत राहावं वाटतं.

"अरे हो ऽ आज आम्ही काय आणलंय मुग्धा राणीसाठी!... राधा, माझी बॅग आण बरं... त्यात चॉकलेटस् आहेत. दे तिला."





राधा चॉकलेट आणून देते.

"थँक यू आँटी...."

मुग्धा पळून जाऊ लागते.

'ह्या सगळ्यात आपली दखलही कुणी घेतली नाही' मीराला असह्य होतं.

"मुग्धा ऽऽ" ती ओरडून तिला बोलावते.

"काय आँटी...?"

"संध्याकाळ झालीय आता. फुलं नाही तोडायची."

"पण काका..."

"मी....मी सांगतेय ना तुला!" मीराचा चिडखोर स्वर. सदानंद आणि राधा एकमेकांकडे बघतात. सदानंद सुस्कारा सोडतो.

"मुग्धा बेटा, मी विसरलो हं, संध्याकाळी फुलं तोडू नयेत. सकाळी घे हं फुलं."

मुग्धा हिरमुसली होत जाते.

"का त्या पोरीवर रागावलीस उगाच?"

"हो हो उगाच. मला मूल होत नाही म्हणून मी तिचा रागराग करते असंच म्हणायचंय ना तुम्हाला?"

"राधा...मी असं कधी म्हटलंय?"

"मी दुष्ट आहे. त्या गोड मुलीवरही प्रेम नाही करू शकत. कारण...कारण मी वांझ आहे. Useless. तुमचा संसार पुढे न्यायला असमर्थ. एक T. B. पेशंट....का नेलंत हो त्या दिवशी तुम्ही मला फिरायला? डॉक्टरांनी चालायला सांगितलं म्हणे. नसते गेले तर तो ॲक्सिडेंट नसता झाला. ॲबॉर्शन नसतं झालं. गर्भाशय काढून टाकावं नसतं लागलं....हा वांझपणा नसता आला."

"मीरा...का नाही ते म्हणून घेतेस स्वतःला? जे घडलं त्यात अपराध कुणाचा? It was just an accident. आयुष्यात असंच घडणार होतं–ते घडलं. Why don't you accept it? मूल होण्या न होण्यानं काय फरक पडणार आहे? मला तू हवी आहेस मीरा. कितीदा सांगितलंय मी हे. मला नकोय मूल."

"हे नुसतं तोंडापुरतं. तुमच्या मनात काय आहे हे का मला कळत नाही? तुम्हाला मुलं आवडतात. किती खेळता तुम्ही मुग्धाशी..."

"आवडणारी प्रत्येक वस्तू...व्यक्ती आपल्याला हवीच असते का मीरा? आवड अखेर आवडीच्याच

ठिकाणी राहते...हवं तर...उद्यापासून मी मुग्धाशी खेळणार नाही..."

मीरा व्याकुळते.

"नाही सदानंद. असं करू नका. मला तिचा राग नाही येत हो. मलाही तिला जवळ घ्यावं वाटतं. कल्पनेत मी तिच्या सोनेरी केसांवरून हात फिरवते. तिला जवळ घेते. छातीत दाटून येतं. वाटतं हे सुख आपण का नाही अनुभवलं? लुसलुशीत हातांची मिठी आपल्याच नशिबात का नव्हती? ती असहाय्यता मग रागात बदलते. मी चिडचिडते."

"आणि तब्येत आणखीन खराब करून घेतेसं असंच नां? काल डॉक्टर काय म्हणालेत...! या तुझ्या विचार करण्यामुळेच तब्येत recover होत नाहीये, औषधांना रिस्पॉंस मिळत नाहीये. समजावून सांगून मीही थकलो आता मीरा. जशी आहेस तशी तू मला हवी आहेस." सदानंदनं मीराला जवळ घेतलं.

राधाच्या डोळ्यातही पाणी जमलं. ती उठून आत गेली.

त्या आवेगामुळेच थकल्यानं मीराचा डोळा लागला. अचानक ती दचकून जागी झाली. खोलीत सदानंद आणि राधा नव्हते.

मीरा हळूच उठली. पाय न वाजवता दाराशी आली. तिथेच थबकली. राधा सदानंदला जेवायला वाढत होती. गप्प होऊन.

"आज गप्प का आहेस राधा?"

"मला भीती वाटते सदानंद."

"कसली?"

"ताईचं हे असं वागणं. सारखी चिडते, कधी माझ्यावर. कधी तुमच्यावर. आपल्याबद्दल तिच्या मनात काय आहे हेच कळत नाही. मी तुमचं करते याचाही तिला राग येतो."

"हे सगळं दुखण्यामुळे राधा. जे तिला करावसं वाटतं ते ती करू शकत नाही याची खंत."

"तुम्ही तिला एवढं समजावून सांगता तरी..."

"राधा, तुझी ताई एक साधीसुधी स्त्री आहे. एक गृहिणी. तिला संसार हवा, नवरा हवा, मूल हवं. तिच्या बरोबर दोन वर्षं मी एवढ्या आनंदात काढलीत राधा, ती केवढं प्रेम या संसारावर करते हे तेव्हा पाहिलय मी."

"पण तरी सदानंद, तिच्या मनात याहून काही वेगळं आहे. जे नसावं ते. मी...मी काही दिवस घरा जाऊ का?"

"तुला नको कसं म्हणू राधा? पण इथे तुझी गरज आहे, या घराला, ताईला, आणि मलाही. तू या घराची झाली आहे."

मीरानं पाहिलं. सदानंदने राधाचे हात हातात घेतले होते. पण त्यात कोठेही अधीरता नव्हती. केवळ एक शांत स्पर्श.

"घरालाही माझी गरज आहे. पण सदानंद, कधी तरी ही गरज संपेल. त्या वेळी मी स्वतःला कशी शोधू? मला माझं अस्तित्व शोधायचंय, मी इथे का राहाते? ताईला आवडत नसतानाही..."

मीरा ऐकता ऐकता ओशाळली.

राधा पुढे बोलत राहिली.

"एकटेपण-नुसतं एकटेपण, कुणी काळजी करणारं नाही. मला काय आवडतं, नावडतं याचा विचार करणार नाही. खरं तर सगळं आपलं आपल्यालाच सहज करायचं असतं. तरी भावनिक सोबत का हवी वाटते?"

"राधा, तू एकटी, तसाच मीही एकटा आहे. हे मीराचं दुखणं, कित्येकदा धीर सुटतो. पण मीराशी बोलू शकत नाही. तिलाच मी धीर द्यायचा. तिची ढासळती तब्येत. राधा,...कालच डॉक्टर म्हणालेत..."

"काय?"

"मीरा दुसऱ्या स्टेजमध्ये गेलीय."

"काय?" राधाच्या उद्‌गारात दुःख भरलेलं होतं.

"होय राधा, सर्व प्रयत्न करूनही ती बरी होत नाही. आपलं माणूस पाण्यात बुडतांना पहाताना काठावरचा माणूस किती असहाय्य, एकाकी असतो ते मी अनुभवतोय. यात तुझा फार मोठा आधार आहे राधा. हे सगळं तुझ्याच जवळ बोलायचं. मनातले कढ तुझ्याचजवळ रिते करायचे. आणि पुनः मीराजवळ जायचं. तिला धीर द्यायला."

मीरा परतली. आकाशाच्या जवळ जाऊन परतावं असं तिला झालं. ही दोघं...आपल्या अवतीभवती वावरणारी पण तरी आपण यांना समजू कसं शकलो नाही? दोघं एकटी एकाकी. एकमेकांचा आधार शोधताहेत. आणि मी हे कसले घाव घालू पाहातेय? राधाचं दुःखही आज कळतंय. मी माझ्या दुःखात एवढी कशी गुरफटले? या दोघांचं हे नातं...सर्व मर्यादा

आणि बंधनं पाळूनही दोघं एकमेकांना आपलीशी वाटत राहाणं, दोघांच्या आयुष्यात गोवलेला एक समान धागा दुःखाचा. आपण ह्यात आपलं स्थान शोधायचा अट्टाहास का करायचा ?

मीरा स्वतःपासून दूर झाली. आपल्या दुखण्यापासून दूर झाली. T B च्या सेकंड स्टेजला आपण गेलोत हे विसरली. आपल्यासाठी झटणारे हे दोघं... त्यांच्यासाठी आपण काय करू शकतो ? या आकाशासारख्या मनांना कवेत घ्यायला आभाळाचे हात कोठून आणायचे ? डोळ्यांपुढची अभ्रं दूर होऊन पुढचं सारं स्पष्ट व्हावं तसं मीराचं झालं.

ती नकळत खिडकीशी आली. खिडकी खालीच मोगरा उमलला होता. कणाकणानं मुक्त सुगंधाची उधळण करणारा तो मोगरा तिच्या मनात घर करून राहिला.

" ताई कधी उठलीस ? " मीरेनं राधाकडे पाहिलं. स्वच्छ नितळ डोळे असलेली राधा. नुसती बहीण की, त्या पलिकडे काही ?

" आत्ताच उठले राधा. मोगऱ्याचा वास आला. आणि राहावलं नाही." पण डोळ्यातला आवेग थांबला नाही.

" काय झालं ताई ?"

" काही नाही."

" सांग ना ताई का रडतेस ? "

" राधा, पाऊस पडून गेला. आभाळ स्वच्छ झालंय. तसंच माझं झालं असेल. हे पाणी वाहातंय ना डोळ्यातून. मन स्वच्छ होतंय. मला माफ कर राधा..."

" ताई, हे काय बोलतेस ? "

" माझ्याच वागण्याचा मी विचार केला राधा. कळालं माझं काय चुकलं ते."

" ताई, पुर आता... बघ तुला दम लागतोय."

मीरा नेहमीसारखीच पलंगावर पडली होती. आपलं दुखणं कमी होत नाही हे तिला जाणवत होतं सानिटोरियममध्ये राहायला तिचा नकार होता. एवढ. प्रशस्त बंगला– मोकळी हवा. याहून अधिक तिथे काय मिळणार होतं ? तिथे राधा नव्हती... सदानंद नव्हता आयुष्यात जे काही हवं ते या दोघांच्या रूपानं मिळालं .... (पण तरी.... सदानंदचं घर भरणार कधी ?) हेच कृतार्थ क्षण मरणाचे असावेत. हळूहळू खंतावत मरण्यापेक्षा का नाही मरणाला उत्कटतेनं भिडायचं ?

" सदानंद, बसा ना जवळ... "

" बोल मीरा.... "

" तुमच्या प्रेमाचा अर्थ सांगाल ? "

" तो मी तुला कसा सांगू ? तू माझ्यावर जे प्रेम केलंस त्यावरून मी प्रेम करायला शिकलो."

" तुम्ही असेच जवळ असावेसे वाटता."

सदानंदनं तिला जवळ घेतलं.

" नका.... एवढे माझ्याजवळ येऊ नका... "

" असू दे... " सदानंदचा आवाज बदलला. क्षणांचं वादळ सामावलेला त्याचा हात तिच्या कृश अंगावरून फिरला.... पण लगेच तो सावरला...

" मी आंघोळ करून येतो मीरा... "

मीरा सुन्न झाली. हे आवेग यानं कुठवर असेच मारून टाकायचे ? माझा हा जगण्याचा अट्टहास का ? हे जर्जर शरीर कुठवर सांभाळायचं ? त्यापेक्षा औषधं बंद करून...

" ताई, औषध घेतेस ना ? "

" राधा, मी आत्ताच घेतलं.... " आपण एवढं बेमालूमपणे बोलू शकतो ?

" राधा, इकडे ये...."

" हूं ? "

" आज तुझा प्रोग्रॅम काय ? "

" माझा कसला प्रोग्रॅम ताई ? "

ही उणीपुरी पंचवीस वर्षांची राधा....हिला हिचे प्रोग्रॅम्स नाहीत...?

" राधा, तुला कधी...."

" बोल ना ताई..."

" तुला पुनः नव्यानं जीवन सुरू करावसं नाही वाटत ? "

" ताई, जीवन सुरू करणारे आणि संपवणारे आपण कोण ? ओठावरचं हसूही माझं पुसलं नव्हतं आणि अश्रूंचे लोटच्या लोट माझ्या अंगावर लोटले. ह्या दुःखाच्या जबरदस्त धडकेतून अजून सावरले असं वाटतच नाही. मग वाटतं या लाटेवरच हतबल होऊन पडावं. ज्या किनाऱ्यावर तिला न्यायचंय तिकडे ती नेईल. नाहीतर.... ह्या दुःखातच अस्तित्व संपेल."

" नाही, राधा. असं होणार नाही. तुला किनारा मिळेल. हे उदास विचार डोक्यातून काढून टाक. आपल्या आजूबाजूला पाहा. तुझ्यासारखीच माणसं

तुला दिसतील."

राधा पाहात राहिली. नेहमी चिडचिड करणारी मीरा.... आणि ही... ताईला झालंय काय?

"राधा, तू इकडे अशी कोमेजतेस... हे तिकडे उदास. आज तुम्ही पिक्चरला जा बघू."

"नको ताई..."

"नको काय...ऊठ तयार हो... चार वाजत आलेत. मी सांगते सदानंदना..."

अखेर सदानंद आणि राधा पिक्चरला निघाली.

"राधा, छान दिसतेस, बाहेर मोगरा फुलतोय. दोन फुलं घाल डोक्यात... आणि लॅच की घेतली ना बरोबर? कदाचित मी झोपले असेन... आणि राधा आजपासून सदानंदचा बिछाना बाहेरच घे..."

"पण ताई, बाहेर मी..."

"राधा, माझं हे असं लागट दुखणं... उगाच कशाला सदानंद विषाची परीक्षा? दुखणंही वाढणारं."

"मग ताई, मी झोपीन तुझ्या..."

"तू तरी काय शेणामेणाची घडली आहेस? ह्या खोलीत मी एकटी झोपणार..."

रात्री कधी तरी मीराला जाग आली. कानोसा घेतला. सदानंद आणि राधा जेवत होते.

मीरा जागीच होती. विचारांचं काहूर मनात होतं. हातातून काहीतरी सुटून जात होतं. तरीही ओंजळ भरल्यासारखी वाटत होती. आता येणाऱ्या मृत्यूचं भय नव्हतं. आपली माणसं दुरावणार ही खंत नव्हती. ह्या पलिकडे मन गेलं होतं.

औषधांची वेळ झाली.

मीरेनं फ्लॅपमधून हव्या त्या गोळ्या काढल्या— गादीखाली ठेवून दिल्या.

"मीराऽ" सदानंदची हाक. ती ऐकूनही मीरा डोळे मिटून पडलेली.

"झोपू द्या तिला सदानंद. झोप फार कमी झालीय तिची."

"औषधं?..."

"ही काय घेतलेली दिसताहेत." रिकामी फ्लॅप दाखवत राधा म्हणते.

पावलं बाहेरच्या खोलीत गेलेली.

"राधा माझा बिछाना बाहेर का घेतला..."

"ताईच म्हणाली तसं..."

"पण का?"

"तुम्हाला काही त्रास होऊ नये म्हणून."

"तू तिला काही सांगितलंस दुखण्याबद्दल?"

"कशी सांगेन? पण दुखणं वाढतंय की कमी होतंय हे सगळ्यात आधी न तपासता रोग्यालाच कळतं नाही का?"

"खरंय...."

दिवा बंद केल्याचा आवाज.

"झोप नाही येत राधा. नेहमी तिच्या जवळ झोपतो तिला आज एकटं वाटत असेल. राधा कालपासून... तुझ्या लक्षात आलंय... She is changing a lot."

"हो, आपल्याला पिक्चरला जा म्हणणं, आज तुमची झोपायची व्यवस्था... सदानंद मला हीच भीती वाटतेय. तिच्या मनात आहे तरी काय? यातून ती काय सांगू पाहातेय?"

"तिला काय वाटत असेल राधा?...जवळ येणारा मृत्यू..." सदानंदचा आवाज भरून आला.

राधा सदानंद जवळ आली.

नुसता एक बोलका स्पर्श. धीर धरा म्हणून विनवणारा मी तुमच्या सोबत आहे हे सांगणारा.

"Good night....सदानंद"

"Good night..."

श्वासांची मंद लय.

मीरा हळूच उठली. बाहेर आली. नाईट लॅम्पच्या मंद प्रकाशात दीवाणावर झोपलेली राधा... आणि सोफ्यावर झोपलेला सदानंद स्पष्ट दिसत होते. मीरानं एक निःश्वास सोडला.

रात्रीतून सारखं उठून चाळा लागल्यागत मीरा बाहेर डोकावून पाहात होती....

"ताई, अग ऊठ ना! किती वेळ झोपतेस?" मीरा राधेच्या आवाजानं उठली....

"नऊ वाजलेत ताई...."

"बाई ग.... किती उशीर झाला... रात्री झोपच नाही...."

"ताई, आम्ही आलो त्यावेळी...."

"त्यावेळी...म्हणजे...नंतर जागी झाले मी..."

मीरेचं सावरून घेणं राधाला समजलं.

"ताई खरं सांग. तुला काय वाटतंय.... माझी शपथ... सांग."

" राधा, काय सांगू.... तुम्ही दोघं एवढे मोठे आहात.... तुमच्या बरोबरीला येऊ पाहातेय गं. जेवढी जवळ येऊ पाहाते तेवढे तुम्ही आणखीनच अथांग आहात हे लक्षात येतं."

राधाच्या सर्व काही लक्षात आलं.

" ताई, समज काही वरं वाईट आम्ही वागलो असतो तर... "

" राधा, खरंच सांगते, तीच भीती होती गं. दहादा उठून तेच पाहिलं. पण शांतपणे झोपलेले तुम्ही दोघं."

" ताई, माणसासारखी माणसं आम्ही... तुला असं वाटतंय का की या दुखण्याशी तू एकटी झगडतेस?"

" राधा, कळालंय आता सर्व. हे सगळं सोडून आता जायचंय मला. आज तुला सांगतेय.... तुला मी.... किनारा दाखवून दिलाय. फक्त एवढंच...– मी असेपर्यंत... सदानंद माझेच... "

" ताई काय बोलतेस हे ? " मीराचा कापणारा हात हाती घेत राधा म्हणाली. " अगं, असं काहीही नाही... "

" माहिती आहे. पण माझी इच्छा आहे ही, तुझ्या साठी हाच किनारा आहे राधा. आयुष्यातल्या लाटांनीच तुला हा निर्णय दिला आहे. तुम्ही एवढे जवळ आला आहात की तुम्हाला दूर होणं अवघड होईल. आयुष्यानं दिलेला हा निवाडा मलाही मान्य आहे. माझं एवढं मागणं.... "

" पुरे ताई... बोलू नकोस... अगदी नको."

राधानं मीराचे हात हातात धरले होते. ते हातच खूप काही सांगून जात होते.

" मीरा अजूनही विचार कर. एवढा प्रवास तुला झेपेल ? "

" आता आपली तयारी झालीय."

" बांधलेला होल्डाल एका मिनिटात सोडता येतो." मीरानं तीर्थाच्या दर्शनाला जायचा हट्ट धरला होता. डॉक्टरनंही कंटाळून तिला न्यायचा सल्ला दिला होता. मीराची वाढती अवस्था पाहून सदानंदचं मन कच खात होतं, रस्त्यात काही झालं तर....

" हे बघा, काही झालच माझं.बरवाईट कुठे तर.... तिथेच पवित्र क्षेत्री... "

" पवित्र क्षेत्र– "

" तुमचा नाही विश्वास. पण माझ्या विश्वासा-साठी.... "

" ठीक आहे."

पहिल्याच मुक्कामात राधाचं सदानंदच्या नावे पत्र हजर होतं. पत्र वाचलं आणि सदानंद हादरला.

" अहो काय झालं ? "

" काय झालं विचारतेस ? मूर्ख.... "

मीरेला हसू आलं.

" शिव्या काय देताय ? "

" मग काय पूजा करू बाई तुझी ? राधाला गादी आवरताना तू न घेतलेली औषध मिळाली. का केलंस हे असं ? "

सदानंदचा दुखावलेला स्वर ऐकून मीरा कष्टी झाली.

" मला सुटका हवीय सदानंद. तुम्हाला माहिती नाही सदानंद...कणा कणानं येणारा मृत्यू केवढा असह्य असतो. त्यापेक्षा तो ओढूनच घेतलेला बरा."

" मीरा, माझा विचार तरी काही... "

" माझ्या परीनं मी त्यात तुमचाही विचार केला..."

" फार हुषार समजतेस स्वतःला... "

" रागावू नका...दर्शनाला जायचंय ना ? "

" माझं ऐकशील मीरा ? " सदानंदचा आवाज भरून आलेला...

" नाही सदानंद..., आता काही नका ऐकवू... खरंच नको...फार पुढे गेलेय मी....फार पुढे... "

मावळत्या... पाण्यात उतरू पाहाणाऱ्या लालबुंद सूर्याकडे मीरा पाहात राहिली.

" दर्शनाला जायचंय नां ? "

" तेच तर करतेय. हे तेज– जीव उत्पन्न करणारं आणि नष्ट झाल्यावर स्वतःत सामावून घेणारं. माणसाच्या जन्म मरणाचं प्रतीक– हे तेज–आज माझ्याच जन्म मृत्यूला मी वंदन करतेय. मला जन्म देऊन हे सुंदर विश्व, सुंदर भावना अनुभवू दिल्या म्हणून—प्रेमाचं सुंदर वरदान तुमच्या आणि राधाच्या स्वरूपात दिलं म्हणून– आणि मृत्यूला वंदन ते या दुःखातून, वेदनेतून मला अलगद उचलून नेणार म्हणून. या तेजातच साऱ्या विश्वाचं रहस्य...अर्थ सामावलाय. आज तोच जाणवतोय. ही समुद्राची अखंड गाज... हा कशाचा उद्घोष ? किती पवित्र आहे हे सारं."

ही मीरा ? नेहमी सामान्य वाटणारी मीरा ? प्रेमाला

सर्वस्व मानणारी, चिडचिड करणारी, मूल होणार नाही म्हणून विषण्ण होणारी ! ही कोठे येऊन पोहोचली ? हा एवढा मनाचा प्रवास हिनं केला तरी कधी ?

सदानंद न बोलता मीराला पाहात होता.

भरतीचे तुषार, समुद्राचं वारं...तिच्या छातीचा दुबळा पिंजरा ते सहन करू शकत नव्हता.

खोकल्याची जीवघेणी उबळ उसळली...

" मीरा " सदानंद तिला सावरत होता. पाठीवरून हात फिरवत होता. मीराचं डोकं त्यानं मांडीवर घेतलं.

काट्यातूनही इवलसं फूल डोकवावं तसं त्या वेदनांच्या रेषांतूनही मीराच्या ओठावर, डोळ्यात स्मित उतरलं होतं.

"घावरू नका सदानंद, मी सिद्ध आहे. मला मरणाची भीती नाही."

" मीरा ! " सदानंदनं तिचा हात हातात घेतला. आणि त्यावर आपले ओठ टेकवले.

मीरानं डोळे मिटले.

" हे तेज जेवढं सत्य तेवढंच तुमचं प्रेमही सत्य. जगण्याचा आधार तुमचं प्रेम होतं, सहन करण्याचा आधार तुमचं प्रेम झालं...आणि आता मरण्याचा आधार तुमचं प्रेम झालंय."

शब्द जड होऊन बाहेर येत होते. उबळीवर उबळी येत होत्या.

" काय झालं बेटा ? "

मीरानं प्रयासानं डोळे उघडले. अगदी साधासुधा पोषाख असलेली एक व्यक्ती समोर उभी होती. पण चेहऱ्यावरचं तेज आणि पावित्र्य लपत नव्हतं.

ती व्यक्ती खाली वाकली. तिनं मीराचा हात हातात घेतला. डोळे मिटून मीराच्या नाडीचा अंदाज घेतला.

" हिला आश्रमात घेऊन चला."

"आपण ? "

" मला सगळे बाबा म्हणतात. इथेच माझा आश्रम आहे. पण हिला आधी घेऊन चला. मागाहून सगळी उत्तरं मिळतील."

दोघांनी मीराला आधार देत उठवलं...आश्रमात आणलं.

" हे काय ? आश्रम म्हणालात..."

" देवादिकांचे फोटो नाहीत असंच ना ? हा आश्रम माणसातल्या परमेश्वरासाठी आहे. किती तरी दुःखी, पीडित इथे आहेत." कसलासा काढा बाटलीतून काढत बाबांनी म्हटलं.

" आ कर बेटा."

" नाही बाबा...मी औषधं घेणार नाही." बाबा हसले.

" लहान मुलासारखा हट्ट करतेस ?

" नाही बाबा...मला आता हे शरीर तगवायचं नाही. मला जाऊ द्या आता. संथ शेवटचा प्रवास सुरू झालाय."

" तुला ज्याच्याकडे जायचंय तो या रस्त्यानं तिथे भेटेल याची खात्री आहे तुला ? "

" हो. काही दिवसात मृत्यू... "

" तो मृत्यू नाही. आत्महत्या. पापाचं एक गाठोडं तुझ्या हाती देणारा... "

" पण मला नाही आता जगायचं. ते पाप चालेल मला.

" आधी हा काढा घे. नंतर आपण बोलू. माझ्या समाधानासाठी घे."

त्यांच्या आवाजात मार्दवयुक्त आग्रह होता. ते शांत पवित्र डोळे.

मीरानं नकळत हात पुढे केले.

" शाब्बास. मरणाजवळ जायचा रस्ता इतका सोपा नाही बेटा. मरण सहन करायचीही शक्ती शरीरात हवी. नाहीतर फार त्रास देत शरीराचा एक एक बंध तुटत राहातो..... तुम्ही कोठे उतरला... ? "

" हॉटेलमधे.... "

" मला वाटतं सध्या तुम्ही हॉटेलात राहाणं योग्य नाही. परतीचा प्रवासही हिला झेपणार नाही. आश्रमात रहा."

सदानंद किंकर्तव्यमूढ झाला होता. बाबांच्या शब्दांनी त्याला धीर मिळाला.

" मी सामान घेऊन येतो.... "

" घेऊन या. तोवर मी आहे हिच्या जवळ."

" मीरा, मी जाऊन येतो हं. तू थांबशील ना ! " मीरानं बाबांकडे पाहिलं. रात्रीच्या अंधाराला निरांजनाची साथ लाभावी असं तिला वाटलं. ती पाहात राहिली.

सदानंद बाहेर गेला.

" मीरा ना नाव तुझं ? "

" हो "

" औषधं का नाही घेत ? "

# नवी सुपर्ण प्रकाशने



* **बोला अमृत बोला** ( आठवणी ) : निवेदन–मा. कृष्णराव शब्दांकन–सुधाकर अनवलीकर
* **गप्पांगण** ( विनोदी लेख ) : द. मा. मिरासदार
* **अण्णा अँण्ड अंडी** ( स्मार्ट, विनोदी कादंबरी ) : मंगेश पदकी
* **महाभोजन** ( राजकीय कादंबरी ) : श्रीमती मन्नू भंडारी अनु : डॉ. पद्‌माकर जोशी
* **चुळचुळ मुंगी पळीपळी कंटाळा** ( संज्ञाप्रवाह कादंबरी ) : नरेश
* **गुणाकार** ( कथासंग्रह ) : गंगाधर गाडगीळ
* **गुन्हेगाराच्या मागावर** ( पोलीस तपासकथा ) : प. रा. चांदे
* **सारे आकाश** ( कादंबरी ) : राजेंद्र यादव अनु : डॉ. पद्‌माकर जोशी
* **यव् आणि त्यव्** ( विनोदी कथा ) : विजय कापडी
* **मराठी कथा : रूप आणि परिसर** ( समीक्षा ) : म. द. हातकणंगलेकर
* **उलट-तपासणी** ( कादंबरी ) : रमण देशपांडे
* **मराठी साहित्यातील स्पंदने** ( समीक्षा ) : गो. म. कुलकर्णी



# सुपर्ण प्रकाशन

१५५२, चिमणबाग
सदाशिव पेठ, पुणे–४११ ०३०.

" मला हे सगळं संपवायचंय बाबा."

" का ? "

" मी काय देऊ शकते त्यांना ? "

" त्यामुळे त्याचं प्रेम कमी झालंय असं वाटतं तुला?"

" पण माझा स्वार्थ..."

" आत्महत्त्या करणं स्वार्थ नाही मीरा? हे शरीर आपल्या बरोबर केवढया शक्ती घेऊन येतं याची कल्पना आहे तुला ? दुर्दैवानं आपण ते जाणून घेत नाही. आपण आपल्याच सुखदुःखाच्या गाठी मारत परमेश्वरानं दिलेलं ते शक्तींचं भांडार बंद करत राहातो. कधी या गाठी उघडाव्या-आत डोकावून पाहावं. मग कळतं आपण काय काय करू शकतो ते."

" पण मी अशी दुर्बल, रोगी."

" रोग शरीराचा आहे.रोगग्रस्त होणं आणि रोगमुक्त होणं याची शरिराला सवय आहे. पण रोगाची लागण तुझ्या मनाला झालीय मीरा... इकडे ये..."

बाबांनी मीराला हात देत उठवलं.

" चालवेल ? "

"हो, काढयानं तरतरी वाटतेय." मीरा आणि बाबा अंगणात आले. बाबांनी मीराच्या अंगावर आपली शाल टाकली.

" चल...."

मीराच्या डोळ्यात पाणी दाटलं. या माणसाजवळ हे प्रेम, ही आपुलकी कोठून आलीय? ह्यांनी पहिलाच शब्द बोलला तोच केवढया मायेनं !

" हे बघ...हे सगळे रोगी.... रोगाशी झगडणारे. शरीर थकलंय त्यांचं पण मन थकलेलं नाही. महारोग्यां-सारखेही रोग काहींना आहेत. पण तेही या वाटेवर थकले नाहीत."

मीरा ते विश्व पाहात होती. आपापली अधू, अशक्त शरीरं सांभाळत त्या विश्वाच्या हालचाली चालूच होत्या.

" कितीतरी स्त्रिया रोगामुळे घराच्या भिंतींनी घरा-बाहेर ढकललेल्या इथे आहेत...."

" काय ? "

" मीरा, दुर्दैव कोणतं तेही ओळखायला शीक. जे नाही त्यासाठी तू जीवन उधळायला निघालीस. पण तुझ्याजवळ खूप काही आहे. त्याच्यासाठी तू काय केलंस ? कित्येक स्त्रियांजवळ तर तुझ्याजवळ जे आहे ते ही नाही."

" तरी त्या जगतात ? "

" जगण्याची इच्छा असणं ही सहजप्रवृत्ती आहे. माणूस जन्मल्याक्षणी जगण्यासाठी आवश्यक असलेल्या भुकेसाठी टॅहा सुरू करतो. ही इच्छा अतिशय नैसर्गिक आहे."

" मग एका स्त्रीसाठी आई होणं ही इच्छादेखील नैसर्गिकच नाही का ? "

" स्त्रीला आई व्हावं लागत नाही. ती जगन्माता आहे. केवळ पोटचं मूल असणं ह्यातच आईपण असतं असं तुला वाटतं का ? ' आई ' ही एक वृत्ती असते. ही वृत्ती असलेली स्त्री तिला पोटचं मूल नसलं तरी आईच असते. संगोपन, काळजी घेणं, ममता हे गुण विधात्यानं स्त्रीमध्ये घालून फारच मोठी शक्ती स्त्रीमध्ये दिली आहे."

" तरी मी हे विसरू शकत नाही की मी त्यांना मूल देऊ शकत नाही."

" देऊ शकणं... केवढा अहंकार आहे बघ या दोन शब्दात. जे घडणारं ते घडत असतं. पण ते सर्व कर्तुम अकर्तुम आपण आपल्यावर लादून घेतो. मी हे केलं, हे दिलं... आणि मग कधी जे हवं ते घडलं नाही की माणूस स्वतःला अपराधी समजायला लागतो. ' अहं ' दुखावतो. इतका की जशी तू... मृत्यूला जवळ करू पहातेस. किती लहानसहान गोष्टींवर हे अहंभाव आधारले आहेत."

" बाबा, मूल ही गोष्ट लहान नाही..."

" पण तुला ती जेवढी मोठी वाटते तेवढी मोठीही नाही. व्यक्तिगत कोषात ती मोठी असेलही. पण एकदा हे व्यक्तिगत कोषाचं आवरण तू बाजूला टाकून दे. त्या बाहेर ये. मग तुला कळेल मीरा, एक मूल या अफाट जगात येणं ही किती साधीसुधी बाब आहे."

" मला मूल नाही म्हणून असं म्हणता ! "

" तुला मूल असतं तरी हेच म्हटलं असतं. मूल होण्यानं तुला तुझं विश्व परिपूर्ण वाटलं असतं. पण माणसाच्या व्यक्तिमत्त्वाचा सतत विकास होत असतो. तो विकास माणसाला कधी-तरी परिघाबाहेर काढतो. आयुष्य एका परीघ नसलेल्या जगात प्रवेश करतं. तिथे आप्त, स्वकीय, परके सर्व सारखेच असतात. प्रत्येकाच्या आयुष्यात ही अवस्था कधी ना कधी येतेच. आणि दुःख तर माणसाला फार चटकन सावध करतं. दुःखात वाहून न जाता त्यातून सावरलं तर दुःख संकुचित कवच फार लवकर फोडतं. म्हणूनच दुःखावर प्रेम करणारी माणसं







आहेत. पण नुसतं प्रेम करणं महत्त्वाचं नाही तर ते दुःख समजून घेणं महत्त्वाचं आहे. आणि त्या दुःखाला ओलांडून जाणं महत्त्वाचं आहे. म्हणूनच कुंतीनं दुःखाचं वरदान कृष्णाला मागितलं....मीरा...तूही तुझं दुःख ओलांड...आणि तुझ्यातल्या शक्तींचं परीक्षण कर."

मीरा शहारली...

"तुला त्रास होतोय बेटा? आपण आत जाऊ...

"नाही बाबा त्रास नाही होत...बाबा...मी बरी होईन?"

"बेटा, तू मनात आणलं तर नक्कीच..."

त्यांनी मीराच्या डोक्यावर हात ठेवला. त्यांचे ओलसर झालेले डोळे आनंदानं चमकत होते.

"बाबा, तुम्ही मला बरं कराल?"

"हे देखील विचारायला हवं? वेडाबाई, सगळं आयुर्वेद तुझ्यापुढे उभं करतो बघ."

आणि बाबांनी खरोखरच आयुर्वेद मीरापुढे उभा केला. मीरा बरी होत होती. धाप कमी लागत होती. ढास कमी उठत होती. हा परिणाम आयुर्वेदाचा की नव्या दृष्टीचा...मीरा विचार करत होती. विचार करता करता तिचा निश्चय होत होता.

"सदानंद, तुम्ही पुढे जा. तुमच्या सुट्ट्या संपल्यात. मला बाबांच्या औषधानी फरक पडतोय. मी नंतर आले तर चालेल?"

"मीरा, तुला ज्यानं बरं वाटेल ते कर. पण स्वतःला सांभाळशील..."

"हो... सदानंद..." मीरा आवेगानं सदानंदच्या मिठीत शिरत म्हणाली.

हे आवेग का निर्माण होत होते?

चार पाच दिवसांचा प्रवास करून सदानंद घरी पोहोचला.

"राधा, एकटाच आलो. मीरा तिथे बाबाची ट्रीटमेंट..."

"माहित्येय."

"काय?"

"आधी चहा घ्या...आंघोळ करा."

"काय झालं राधा....?"

"सदानंद, ताईचं पत्र आलं."

"कधी?"

"आजच..."

"काय लिहिलंय?"

"खूप काही. पत्र लहान आहे पण... फार मोठं आहे." राधाचा आवाज जडावला. डोळ्यात पाणी आलं.

"पत्र दे...."

राधानं पत्र दिलं.

"प्रिय सदानंद आणि राधा—"

एका नवीन जीवनात प्रवेश केल्यावर पत्र लिहितेय. मी जे पाऊल टाकतेय ते योग्य की अयोग्य हा संभ्रम मनात आहे. पण बाबांनी मला दिलेला आत्मविश्वास सांगतोय की मी जे काही करतेय ते योग्य आहे. सर्वोच्याच दृष्टीने. आणि म्हणून मी हा निर्णय घेतला. हा निर्णय मी घेतला असं तरी कसं म्हणू? हा निर्णय माझ्याच आयुष्यानं मला दिलेला आहे. एवढा सुंदर निर्णय मला आयुष्यानं द्यावा हे माझं भाग्य.

सदानंद मी तुमच्या आयुष्यातून दूर व्हायचं ठरवलंय. प्रत्येक गोष्ट मी आजवर तुम्हाला सांगून केलेली, पण आज मात्र हा निर्णय तुम्हाला न सांगता घेतलाय.

ज्या क्षणी मी औषधं बंद करायचा निर्णय घेतला तेव्हाच मी मृत्यू स्वीकारला. पण बाबांनी माझा नवा जन्म घडवला. नवीन जाणीवांनीच एक नवीन मीरा घडवली.

आज माझ्या मनाच्या प्रवासाकडे बघतेय. मुंगी उडाली आकाशीचा प्रत्यय येतोय. जमिनीत किड्यानं घर करून राहावं तसं मी माझ्या संसाराच्या, दुःखाच्या... सुखाच्या जाणीवा मनावर ओढून राहिले. प्रथम आपल्या अस्तित्वावरही अथांग आकाश आहे ह्याची जाणीव झाली तुमच्यामुळे, राधामुळे. आपापलं एकटेपण सांभाळत, मर्यादा सांभाळत तुम्ही जवळ आला होता. माझ्या सर्व शंका कुशंका जळून जाव्या अशी तुमची जवळीक. तुमच्या सावल्यांच्या आधाराने हा प्रवास सुरू झाला. तेव्हाच मनाला जाणवलं तुमच्यातला अडसर दूर करायचा. स्वतःच्या पावलांवर विश्वास नव्हता म्हणून समोर उत्तर होतं केवळ मृत्यू. मनाची उलाढाल झाली. आपलं सर्वस्व दुसऱ्याच्या हाती...हे दुसरं तरी कोण? राधा...माझी बहीण. प्रसंगी सखी....आई...मी तुमच्यापर्यंत पोहोचायचा प्रयत्न

करीत होते. या तीन वर्षात आपल्यात कोणतं नातं होतं? पतीपत्नींचे संबंध तर संपलेच होते. पती, पिता, मित्र या सर्वापलिकडचं ते नातं होतं. त्या सर्वापलिकडे तुम्ही जपलंत मला. फुलाचा सुगंध कोठून येतो हे पाकळीनपाकळी तोडून शोधावं लागत नाही. तो सुगंध नुसता अनुभवायचा. तशाच तुमच्या माझ्यावद्दलच्या... तुम्हा एकमेकांवद्दलच्या भावना !

माझं दुबळेपण मला खेचत होतं. हे दुबळेपण कसलं होतं? आज विचार करते. हे दुबळेपण माझ्यातल्या 'मी'चं होतं. 'माझा संसार', 'माझा पती', 'माझी स्वप्नं', 'माझं मूल' हे सर्व त्या 'मी'शी निगडित होतं. माझा वेडेपणा की मी फुलांच्या सावल्या अंगावर ओढून चालले होते फुलं कोमेजतात. फार लवकर कोमेजतात. नुसत्या वाऱ्याच्या झुळकीनंही. सावली नेहमी आभाळाची जवळ करावी. माणूस कितीही उंच झालं तरी त्या सावलीतच मावेल अशी. आकाशाचा कवडसा तुम्ही मला दाखवून दिलात. पूर्ण आकाश बाबांनी दाखवलं. आज ते आकाश मला आव्हान देतय. मेघांचे अश्रू सांभाळणारं आकाश मला म्हणतंय. 'आता तू आकाश हो. इतरांचे अश्रू वाहून दाखव.'

आव्हान पेलेल की नाही माहिती नाही. पण आव्हान स्वीकारावसं वाटतंय.

मृत्यूची वाट भित्रेपणाची नव्हती. ज्या व्यक्तीनं मृत्यूची पावलं ऐकली आहेत त्याला अनेक बंधनं तोडावी लागतात. आपलं अस्तित्वच संपणार ही भावनाच किती मन मारून टाकते याचा अनुभव घेतल्यावर हा मार्ग भित्रेपणाचा आहे असं मी म्हणणार नाही. पण तो मार्ग शहाणपणाचाही नव्हता. माझ्यातलं बळच मी जाणलं नव्हतं. लोकांचे अश्रू पुसायला केवढं बळ लागतं हे मला बाबांकडे पाहून कळालं. त्यासाठी आधी आपले अश्रू विसरावे लागतात. फार अवघड आहे ते.

माझी स्वप्नं, इच्छा, संसार सारं काही मी राधाच्या हाती देते आहे. ओटी भरताना चार दाणे मागे उरवतात तसं हे सर्व तिच्या ओटीत घालताना माझ्या दुःखाचे कढ मी उरवले आहेत. तेवढा ओलावा माझं मन कोरडं न व्हायला आवश्यक आहे.

लहानपणी खेळताना नेहमी पहिला डाव देवाला द्यायचो. आपला हा पहिला डाव असाच झाला.

अचानक अशा तऱ्हेनं तुम्ही एकमेकांचे होणार. कदाचित गोंधळाल. पण क्षणाचा गोंधळ संपल्यावर तुमच्या लक्षात येईल—तुम्ही दोघं किती एकमेकांचे झाला आहात ! एका साध्यासुध्या मनाचा हा प्रवास आहे. मृत्यूच्या जाणिवेनं हा घडला म्हणू की जमिनीवर उभ्या माणसाची नजर नेहमीच आकाशाकडे लागलेली असते त्या नजरेचा हा प्रवास म्हणू ?

रागावलात ? स्नेह आणि प्रेम असलेल्या माणसावर रागवायचा हक्क आहे तुम्हाला.

—तुमची मीरा.

पत्र वाचता वाचता सदानंदनं डोळे घट्ट मिटले. पण न जुमानता पाणी डोळ्यावाहेर आलं. लहानशा थेंबानं रंगांचं इंद्रधनू पुढे ठेवावं तसं झालं.

त्यानं डोळे उघडले. नजर खिडकीबाहेर गेली. बाहेर आकाशाची निळाई पसरलेली. पण नेहमी दूरस्थ, परकं वाटणारं आकाश त्याला आज खूप आपलसं वाटलं. जवळ आहे असं वाटलं.

■

# अध्याय

## रामचंद्र गवाजी पठारे

मी असा टेबलवर तंगड्या ताणून खुर्चीत रेललोय. कुल्या तर चक्क टेबलवरच मांड ठोकून बसलेला. ढापणातून मिचमिच्या डोळ्यांनी तो जोक आठवून आठवून सांगतोय; आणि मी सुद्धा तेवढ्याच भक्तीभावानं ऐकण्याचा प्रयत्न करतोय. तसा कुल्या म्हणजे एकूणच रद्दीप्रकार. उदा० आपण जर त्याला विचारलं की, "आर यू रेडी?"— तर त्यानं म्हणावं, "नो! आय एम् रेडा!" किंवा, "कुल्या तू निघालास?" तर तो म्हणणार, "महाराज! निघून आज साडेसव्वीस वर्षं होतायत."

तर काय की मी कुल्याचे जोक्स न ऐकल्यासारखे ऐकत सहन करतोय. तेवढ्यात एसप्या उगवतोय दारात. धापा टाकत माझ्याकडं येतो आहे.

"घात झाला !! घात झाला !!!"

"अं? लेका कुठलं ऐतिहासिक नाटक पाह्यलंस?"

"फतवा!"

"कसला रे बाबा हा फतवा-वितवा?"

"अधिक्षक अभियंत्यांनी सर्क्युलर काढलंय की दुष्काळाच्या भीषण आपत्तीला तोंड देण्याचा शासनाचा निर्धार आहे..."

"बरं मग?"

"त्या दृष्टीने आपण बऱ्याच रोजगार हमी योजना हाती घेत आहोत. त्या अधिक कार्यक्षमतेने राबविल्या जाव्यात म्हणून तमाम ज्युनिअर इंजिनिअर्सनी आपले हेडकार्टर कामाच्या केन्द्रस्थानी मोडेल अशा ठिकाणी निवडून त्वरित हजर व्हावे."

क्षणभर सगळीकडंच भयाण शांतता.

कुल्यानं चिमणीएवढं तोंड केलं. एसप्या खुर्चीत जाऊन आदळला. हेडक्लार्क वावळेंनी नाकाचा शेंडा सवयीप्रमाणे ओठांना भिडवला. टायपिस्ट मिस् देवनंसुद्धा बोटं आखडून घेतली.

एसप्यानं तोंड उघडलं, "सगळा बोऱ्या वाजणार राव! मी इकडे-बायको तिकडे बँकेत. दोघे दोन ध्रुवावर."

कुल्या म्हणाला, "आत्ताशी कुठं माझं लफडं रंगात आलं होतं. आता सगळीच गोची होणार."

चिकोडीकर म्हणाले, "ही सगळी नाटकं आहेत नाटकं त्या भडव्यांची!" हेडक्लार्क वावळे म्हणाले, "शहरांपेक्षा खेडी नक्कीच परवडतात. भलतं स्वस्त असतंय हो. अगदी ताज्या भाज्या— दूध, इथला हजार अन् तिथला चारशे सारखाच."

टायपिस्ट मिस् देव म्हणाली, "तिथं सिनेमा-बिनेमा नाही म्हटलं आता. तिथली करमणुकीची साधनं वेगळीच असणार? च्! च्! च्! कशी मजा होईल आता काही लोकांची!"

यावर स्टोअरकीपर पानसरे भाडकन् ओकल्यासारखा हसला. मी कसंनुसं तोंड करत ऑफिसबाहेर येऊन उभा राहिलो. समोरच्या झाडावरली चिवचिवती पाखरं आज उपाशीच आहेत असं उगीचच वाटलं.

मास्तर उर्फ साहेबांशी हेडक्वार्टरचा काथ्याकूट सुरू झाला. चिकोडीकर आज बरेच भडकलेले. सारखे म्हणत होते, "सिव्हिल इंजिनिअर एक बदनाम जात आहे... बंजाऱ्यासारखीच एक जात आहे... मुलांना भंगी करीन पण सिव्हिल इंजिनिअर करणार नाही!" इति.

माझा सातवडचा मस्टर कारकून बडवे सारखा माझ्या अवतीभोवती घुटमळतच होता, म्हणत होता, "रावसाहेब, हेडकार्टर सातवडलाच ठेवा! खोलीबिली स्वच्छ करून ठेवतो. भाडं नाही."

मी नुसताच हो-हो करत होतो.

दुपारनंतर सर्व ज्युनिअर इंजिनिअर्सनी सामुदायिक दांडी मारली. काहीही न बोलता कुल्या ॲरिस्टोक्रॅटचा खंबा घेऊन आला. एसप्यानं वेफर्स आणि फरसाणचे पुडे आणले. शितोळेनं त्याच्या-खोली मालकिणीशी लाडीगोडी लावून खूपसे आईस-क्युब्ज आणले. धिंगाणा

घालत ढोसणं सुरू झालं. मी एवढीशीच बीअर घेईन म्हणालो होतो. पण पाहता पाहता आख्खी एक बीअर झाली. कसं तरी व्हायला लागलं. कुल्या तर एकदा ओकून येऊन पुन्हा प्यायला बसला.

साल्यानं माझ्या बीअरमध्ये नकळत व्हिस्की मिसळली होती की काय? अपरात्रीपावेतो सगळे उताणे पाताणे लोळत ढोसत राहिले होते.

सातवड गाव गावापेक्षा गावाबाहेरच वस्त्यांनी असं पसरलेलं. गावकुस मोडून पडलाय. ढासळते बुरुज भुईसपाट झालेयत—होतायत. हिरवा रंग उडून गेलेला गाव दुखणकऱ्याच्या चेहऱ्यानं जगतोय. पाऊसच परागंदा झालेला. उन तेवढं कोसळतंय. नांगरून पडलेल्या ढेकळांना पोळतंय. जितरावांना पोळतंय. माणसांची मनं करपून निघालीत. जनावरांच्या सांगाड्यांवर कावळे, गिधाडं आणि कोल्हा कुत्र्यांची धाड पडतेय. रोगराईनं मसणवस्त्याशी हातमिळवणी केलेली. जगायला निघालीत माणसं पायांना वाट फुटेल त्या दिशेनं. घोट घोट पाण्यासाठी होणारी तंगडेतोड स्वच्छ दिसतेय.

सातवडच्या एकूण दर्शनानं मी आतून किंचित करपला गेलोय. जवळपासच्या गावांला दवंडी देण्याची मी तातडीनं व्यवस्था करतो.

माझ्या खोलीच्या दारात पाण्यानं भरला टँकर उभा राहिला.

हंडे तपेल्या घेतलेल्या जिवांनी त्याला गराडलं.

—पैल्याछुट आमच्या आळीला घ्या!

—का? आमच्या आळीनं घोडं मारलं का गाढव?

—मंग आमचीबी आळी काय बटकीच्या पोटची नाय.

—अरे हा हा बावाहो! दमादमानी घ्या जरा. समदे शाणे हैत. टँकर तर योकच हाए. नका लै तान्ह्या पोरांवानी करू.

—समद्यांला म्ळिणार हे! दोन कोसांची तंगडेतोड बरी व्हती का?

—वरं ब्वॉ; तुम्ही व्हा मोठ्या बापाचे ऽऽ...

मग कुठलीतरी एक आळी मोठ्या बापाची झाली. कुठली तरी एक आळी छोट्या बापाची झाली.

गुळाच्या ढेपेला झोंबणाऱ्या गांधीलमाशांसारखी टँकरभोवती गर्दी झालीय. हंडे—तपेल्या—कळशा खणखणताहेत. प्रचंड कलकलाट. आरडा ओरडा. शिवीगाळ.

—एऽऽ मुरद्या माही बांगडी फुटली ऽऽ

—ए ऽऽ दम! माव्हा हात गुतलाय.

—अगा आयो आयो ऽऽऽ...

—तुह्या बापाचा नाय टँकर!

—मंग तुह्या बापाचा हे का?

—माव्हा पाय चेंगरला ए ऽऽ नुह्यायला तुहे ऽऽ

—ए, ऽऽ खासाडभऱ्या ऽऽ...

खोलीच्या पडवीतून हा सगळा सोहळा पाहताना मी थेट आतून असा कुठेतरी तुटून निघालो. न्हाणीत बादली अंगवर ओतताना हात नकळतच आखडला.

सकाळपासून मी कोंबड्यांच्या शोधात आहे.

उठल्या उठल्या मोटारसायकलला लाथ घातली. गावभर चकरा मारल्या. मस्टर कारकून बडवे मागे होताच. साला बडवे म्हणजे नुसताच नावाचा बामण. सकाळी सकाळी तो पाण्याऐवजी पावशेर दारुनं तोंड धुतो. आम्ही बऱ्याचशा वस्त्या धुंडाळल्या. हरिजनवस्त्यासुद्धा उलथ्या पालथ्या केल्या. कोंबड्यांचा कुठे पत्ता नव्हता. कुठलासा रोगाचा झपाटा आला होता न् साऱ्या कोंबड्या धुवून गेला होता. एकदोन ठिकाणी बडवेनं निष्कारण बाचाबाची केलेली. अगोदरच प्यायलेला. कोंबड्या राहिल्या बाजूलाच हे नसतं झेंगट गळ्यात आलं.

पेताड बडव्याला झ्यापून पुन्हा कोंबड्यांच्या नादी लागलो.

पुष्कळसं भटकलो. वैतागलो सगळ्या अधिकाऱ्यांच्या आई-माईचा उद्धार केला. हताश होऊन खोलीकडे चाललो तर समोर एक कोंबडा आणि दोन मरतुकड्या कोंबड्या दिसल्या. पिसं झडलेल्या. निवान्त चरत होत्या. मी आपोआपच ॲक्सीलरेटर कमी केला. बडवे म्हणाला, भास तर नाही ना? तेवढ्यात कोंबड्यानंही बांग देवून कोकून दाखवलं.

बडवे उतरला. अर्धा तास तो कोंबड्यांशी खेळला. त्यात दोनदा चांगलाच आपटला. वीतभर पायजमा फाटून झाल्यावर विजयी सेनापतीसारखा बडवे खोलीत आला.

आता कापाकापी. मुलाण्याचा गावात पत्ता नव्हता. दुष्काळाला वैतागून तो शहराकडे सटकलेला. बडवे

खानदानी दारुड्यासारखा माझा खांदा थोपटत म्हणाला, " डोन्टवरी रावसाहेब. आज्याबात काळजी करू नका. हे लै किरकोळ असतेय. फक्त चारभिंतीचा आडोसा असला तर हे काम आपून बिनबोभाट मारतो ! बामण असले म्हणून काय झालं ? "

सालं काय योग पहा ! कुठं हत्यारसुद्धा वऱ्यापैकी मिळेना. वडवेनं कुऱ्हाड पैदा केली. आणि सकाळी साडेदहाच्या सुमारास त्यानं एका मरतुकड्या कोंबडीची मान तोडली. चिळकांड्या उडाल्या रक्ताच्या. पुढं काही पहाणं मला शक्य झालं नाही. मी डोळे मिटून खोलीकडे वळलो. अंदाजानेच दरवाजा ढकलून मोकळा झालो.

धुरळा उडवीत जीपांची टोळधाड आली.

एकूण दोन पाझर तलाव, एक धडक योजनेतला रस्ता आणि तीन सामुदायिक विहीरी होत्या. सगळ्यांचं लाईन आऊट फक्की-बिक्की मारून जय्यत तयार असं.

आम्ही सरकारी सेवक अदबीनं उभे राहिलो. शिस्तीत. आमदारसाहेब उतरले. उतरल्यावरोबर एक ढारकन् ढेकर दिला त्यांनी. आमचे कार्यकारी अभियंता त्यांना सामोरे गेले. आमदारसाहेबांसोबत पुष्कळच गोतावळा. जि. प. अध्यक्ष, सभापती, तहशीलदार, बिडीओ वगैरे आणि पुष्कळशी ताटाखालची पांढरी मांजरं. सगळे आमदारांच्या पायातून शिरावं की बगलेतून शिरावं; अशा आविर्भावात वावरणारे.

शेपूट हलवत वडवे पुढे गेला. टिकावाची यथासांग पूजा होताना तो कुठलेसे मंत्र पुटपुटत होता. आज त्यानं दारुऐवजी पाण्यानंच तोंड धुतलं असावं. मला मरतुकड्या कोंबडीची मान कुऱ्हाडीनं तोडणारा वडवे दिसला.कसंसच झालं. फाडकन् आवाज झाला. नारळ फुटला. टाळ्यांचा कडकडाट. त्यांनी पाच टिकाव टाकले. काहीबाही भाषण केलं. त्यात रोजगार हमीतला भ्रष्टाचार हे निवडणुकीतलं पालुपद आलं. आमचे कार्यकारी अभियंता खाकरले. आमदारसाहेबांनी त्यांचे दोन शब्द वळणावळणानं संपवले. एकेक बिस्कीट उष्टं करून ते पुढल्या कार्यक्रमासाठी निघाले. टाळ्या वाजतच राहिल्या.

बोकांडी टिकाव–फावडे–घमेली घेतलेले मरतुकडे जीव कामाला लागले. हाडांच्या सांगाड्यावर लुगडे-धोतराच्या चिंध्या डकवल्यासारखे वाटले ते. धुरळा उडवत जपांची टोळधाड निघून गेली.

माझी खोली खरं म्हणजे मोठा वाडाच होता तो. कुणा श्रीमंत आणि हौशी ब्राह्मणानं बांधलेला. त्या प्रशस्त वास्तूत वावरताना एक सुखद अनुभूती यायची. वाड्यालगतचा भलाथोरला पिंपळ सळसळायचा. त्याची आणि माझी खूपच लवकर मैत्री झाली. वडवेच्या सांगण्याप्रमाणे पुढे त्या ब्राह्मणानं घोड्यांवर आणि बायकांवर पैसा उधळला. शेवटी हा वाडा विकावा लागला. कुलाब्याला माव्हऱ्यावर दाबून पैसा मिळविलेल्या कुणा हरिजन इसमानं तो विकत घेतला होता. वडवेनं खाली मान घालून सांगितल्याप्रमाणे तो हरिजन माझ्याच जातीतला होता.

रात्री खूप उशीरापर्यंत जयूचं पत्र चवीनं पितो आहे. एकेक वाक्य, एकेक शब्द, पुन्हा पुन्हा. पत्रात तिचे मुद्दे दोन. एक–" ज्या गॅलॅक्सित आपण राहतो तिची लांबी एक लाख पंचवीसहजार प्रकाशवर्षे आहे. रुंदी पंचवीसहजार तर जाडी पाचसातहजार प्रकाशवर्षे आहे. ॲन्ड देअर आर सो मेनी गॅलॅक्सीज इन दी युनिव्हर्स. तर आपण म्हणजे बॅक्टेरीयाचे किरकोळ पुंजके. मग रागलोभ; पापपुण्य किंवा जात-धर्म यांना कितपत अर्थ आहे ? " दोन– " परवा एका शेतात एक लाकडी नांगर चालताना पाहिला. कुणी पुरुष तो हाकत होता आणि स्त्रीच्या मानेवर ते जू होतं. बैलाऐवजी एक स्त्री तो ओढत होती. मला भडभडून आलं. अजूनही ते चित्र मी विसरू शकत नाही. असं का होतं ? "

एकेक वाक्य. एकेक शब्द. मी जयूचं पत्र चवीनं पितो आहे.

दरवाजावर टकटक झाली. वाढत गेली. पाहतो तो वडवे. पिऊन तर्र झालेला.

" रावसाहेब मी दारू पिलो. मी तुमची झोपमोड केली."

" अरे ठीक आहे. बिघडलं कुठं ? "

" नाय. नाय. मी गाढवाचा मूत प्यालो. मी मूर्ख शॅतमूर्ख ऽऽ ! "

" बरं बरं. का आलास एवढ्या रात्री ? "

" तुमची मॉफी मॉगायला ऽऽ "

" माझी ? का ? कशासाठी ? "

" ते काय नाय. मॉफ केलं म्हॅणा."

" अरे पण कशासाठी ? "

" ॲगोदर मॉफ म्हणाऽऽ "

" बरं बरं. माफ केले. बोल आता."

वडवेनं मांडी घालून बैठक मारली. रुबाबात ताठ बसला.

" रावसॉव; तुम्ही माझ्या गॉवात येवून तीन दिवस झॉले. पण मी तुम्हाला माझ्या घरी नेलं नॉय. का ?– कॉरण माझे आईबॉप जुन्या मताचे. तुम्ही हरिजन. ऑपून काय पाळत नाय. बाप पाळतो. तेवढं मलॉ समजून घ्या."

" ठीक आहे. अरे, मी कधी काय म्हणालो ? "

" मला दोन रात्र झोप नॉय रावसॉव...मला मॉफ..."

" वडवे, फार किरकोळ आहे ही गोष्ट. आता शांतपणे जाऊन झोप घरी."

" मी जॉतो. मी काय जॉस्त बोललो तर मलॉ जोडा हाणा. पण मला मॉफ..."

वडवे कडमडत खोलीबाहेर गेला. रस्त्याची रुंदी मोजत चालू लागला. मी जयूचं पत्र हातात घेतलं. शब्दांशी समरस होता येईना. दोन शब्दांच्या रिकाम्या जागेत वडवेचं 'मॉफ' करा असं ऐकू यायला लागलं. मी कंदिलाची वात कमी करून टाकली.

खोलीच्या पडवीत कंदील मिणमिणतोय. पडवी गच्च भरून गेलीय माणसांनी. पाऊसपुराण बोलता बोलता सुरू झालं.

कुणीतरी देवाला फूल लावलं होतं. देवानं उजवी दिली पण पाऊस उगवलाच नाही. कुणाच्या तरी अंगात देव आला. म्हणाला, " आठवड्याच्या आत-भाएर पानीपानी व्हनार, मंग म्हाही चांगली गादी भरा." किती एक आठवडे लोटले पाणी लोटलंच नाही जनावरं लोटत राहिली, कसाइखान्याकडे. माणसं लोटत राहिली. जगायला निघालेली. जगायच्या दिशेनं.

कुणीतरी निरोप आणला, " सिद्धेश्वरवाडीचा साधुबोवा लै कडक तपाला बसल्याला हाए त्याला म्हैना झालाय. एवळ्या चारदोन दिवसात पाऊस व्हनार म्हंजी व्हनारच "–तो निरोपही पुष्कळच शिळा झाला.

कुणी देवाला अभिषेकाचा नवस बोललं. कुणी भरजरी पोषाखाचा. कुणी शेपाचशे साधु जेवू घालीन म्हणालं. कुणी देऊळ बांधून देण्याची बोली केली गावदेवीला.

काही ठोसार पोरंपोरी जमले. कुणा म्हातारीचं ऐकून त्यांनी शेणाच्या गोल उंड्यात तुळशीचं रोप खोवलं. त्याला 'धोंडी' म्हणतात. ही धोंडी असलेली वाटी पालथी टाकूनही धोंडी उभी राहिली तर पाऊस हमखास पडतो म्हणतात. 'धोंडीबाई धोंडी' म्हणत हा खेळ पाचपाच घरी मिरवला गेला. म्हातारी म्हणाली होती की हा खेळ चालू असतानाच जोरदार पाऊस कोसळतो. पण पाऊस कोसळलाच नाही. उन तेवढं कोसळत राहीलं. मग ताटात जमलेल्या पैशाच्या कुणी उदबत्त्या आणून देवाला लावल्या. काही आभाळावर रुसलेल्या पोरांनी तर त्या पैशांनी सरळ शेवरेवडी घेऊन खाल्ली.

केव्हातरी जाणती मंडळी पिंपळाच्या पारावर जमली. विठोबा रुक्माईच्या देवळातून त्यांनी टाळ-मृदुंग माग-वले. गव्हाच्या कणकेचा गोळा पखवाजाला चोपडला गेला. सर्वांना बुक्का लावीत ज्ञानबा-तुकारामचा गजर झाला. पोरांनी भगव्या पताका-काठ्या उंचावल्या. पाऊस मागायला मंडळी गावशिवेकडे निघाली.

गावशिवेवर पाच नाम झाले, दहा झाले, पंचवीस, पन्नास... टाळ वाजवून हात दुखले. अभंग म्हणून तोंड भंगलं. पाय आता ऐकेनात. गडात पडता मंडळी गावा-कडे निघाली–पडल्या चेहऱ्यांनी, कोरड्या कपड्यांनी.

कंदिलाची काच किंचित काळी काळी होतेय. मी मन लावून पाऊस-पुराण ऐकतो आहे.

" रावसाहेब, एक गोठ तेवढी ऱ्हायली बघा ! "

" कसली ? "

" खोल्या म्हादेव जर पाण्यामंदी कोंडला तं बदबदा पाऊस गळंन."

" बराबर ! बराबर ! मी बी तेच म्हन्तो."

" मह्या अख्ख्या जिंदगानीत दोनदा खोल्या म्हादेव कोंडला तं दोन्ही टैमाला मायंदाळ पाणी झालं व्हतं."

" ते झालं लगा खरं, पर पानी नाय पेयाला न्..."

" पानी ?... आन् टँकरनं काय व्हतंय ? "

" आंगं आस्शी, हे लै झकास."

" मग रावसाहेब काय इचार हाए तुमचा ? "

मी होकार देऊन टाकला.

ठरल्यावरहुकूम भरला टँकर आला.

फैक द्या ढकलून देवळात !

छा ! छा ! ही काय रीत झाली ? देवाला काय हाए का नाय ?

बराबर हे. देवाचं काम लै नाजूक. बामणाचंबी काय





अनुक्रमणिका

शास्त्र असतंय.

तेच म्हणतो मी फैक टाकून टीपाडं नाय भरायची पाण्यानी.

मायला बडव्यांचा विशा कुठं कडमडला? ऱ्यायसका ऐन शिकारीच्या टैमाला कुत्र मुतायला गेल्यावानी...

गोमुखात लाकडी खिट्टी रोवली गेली.

गाभाऱ्यात बडवे ओलेत्यानं उभा. कळशा ओतून महादेव कोंडतोय. पुटपुटतोय काहीबाही. गावाचा फुललेला चेहरा पाहून मला बरं वाटतंय.

"अरे दिसला दिसला"—कुणीसं आभाळाकडं बोट केलं. सगळ्यांनी आभाळात नजरा खुपसल्या. एक पांढुरका ढग होता. इवलासाच. गोणपाटभर कापसाइतका. दिवसभर तो एकटाच राहिला. कळत नकळत तोही परागंदा झाला. गावाचा चेहरा कडूशार झाला.

दुसऱ्या दिवशी कुणाला तरी महादेवाची कीव आली. त्यानं खोल गाभाऱ्याच्या बाहेरच्या गोमुखाची लाकडी खिट्टी काढली. बाहेर पाणी ओसंडू लागलं.महादेव पाण्यात गुदमरून गेला असावा. पूर्ण दिवस पाण्यात म्हणजे काय चेष्टा आहे?

बाकी एक मात्र झालं. पाण्याच्या वासानं दोन तीन तहानलेली मोकाट कुत्री, चारदोन गाढवं आणि बरीचशी डुकरं देवळाभोवताली गोळा झाली. मजेनं पाण्यात डुंबायला लागली. किती तरी दिवसात एवढं मुबलक पाणी ते पहिल्यांदाच हुंगत होते.

आज पगाराचा दिवस. कालच मेजरमेंटस् घेवून एम. बी. मध्ये रेकॉर्ड केलेलं. मस्टर क्लोज केलेला. इनर वाढवून बडवेनं पुष्कळसा फाळ लावलेला. तिऱ्हाईताला कुणाच्या बापाला कळणार नाही अशा काही खुब्या हातचा राखलेल्या असतात. ब्रह्मदेवाचा बाप आला तरी त्याला मस्टरमधला घोळ सापडणं मुस्कील असेल.

तर आमचे मास्तर उर्फ साहेब आले. बडवेनं हिशेब करून आकडेमोड दाखवली. कातडी बॅगेतून बंडल आणि सुटे नाणे बाहेर आले. साहेबांनी मस्टरवर फर्राटेदार कोंबडे मारले. पत्र्याच्या शेडमध्ये एकेका गँगमनला बोलावून सगळ्यांचे अंगठे—सह्या स. नि. आ. वगैरे चालू झालं. तरण्यापोरींचे अंगठे टेकवताना बडवे भलताच उत्साहात यायचा. तास दीड तासात एकूण प्रकार आटोपला. लोक पैसे उचलून पलीकडे थाट अडवून बसलेल्या भेळवाल्याला, गारीगारवाल्याला; बोंबीलवालीला अन् दारुवाल्याला देत हुजत घालत बसले.

चहा पिता पिता साहेब म्हणाले, "आपण या भागातली काही सात-आठ पाईप कल्व्हर्टची कामं करणार आहोत. सिमेन्ट असेलच. जपून वागा. स्थानिक पातळीवर संबंध चांगले ठेवा. उपयोगी येतात."

बडवेनं साहेबांचा हजाराचा वाटा कातडी बॅगेत सरकवला. लाळ घोटत साहेबांच्या पुढे पुढे करू लागला. साहेब म्हणाले, "बडवे म्हणजे लाख माणूस. एवढा प्रॉम्प्ट आणि परफेक्ट एम. के. मिळायलाही भाग्य लागतं म्हटलं. हॅ हॅ हॅ!!" मीही तेवढ्यापुरतं हो हो केलं.

जाण्यापूर्वी साहेबांनी मला बाजूला घेतलं. "सगळं जपून करा. व्यवस्थित. हाच चान्स आहे. दुष्काळ म्हणजे वाहत्या गंगेसारखी पर्वणी. हात धुवून घ्या. अख्खे आयुष्यभर पुरेल असं खोरं चालवा. तुम्ही तसे हळवे. कविमनाचे. ते एक्स्प्लॉयटेशनसारखे शब्द चुकूनसुद्धा मनात येवू देऊ नका. संसाराला कितीही असलं तरी पुरत नाही. माझा अनुभव आहे. मात्र जपून. व्यवस्थित शिस्तीत. बडवेला गोंजारून घ्या. आपल्या एक्झिक्युटीव्ह साहेबांचा, खूप लांबचा का असेना, पण नातेवाईक आहे तो. काय?"—साहेबांनी चष्मा अडकवत चार शब्द पुरे केले. मी बहुधा मान हलवत राहिलो असेन.

मला खोलीवर सोडून साहेबांची जीप निघून गेली. बडवे शेपूट हलवत माझ्या अवतीभोवती घोटाळू लागला.

नुकतंच अंधारतंय. खोलीच्या दाराजवळ काहीतरी हलल्यासारखं झालं.

"कोण आहे?"—मी आवाज दिला.

"मी—मी आहे.?"

"मी कोण?"

"मी-मी धुर्जी हाए सायब. मांगाचा. व्हंड्या मांगाचा ल्योक."

"अरे आत ये मग. बाहेरन का डोकावत राहिलास?" धुर्जी अदबीनं आत आला. कोपऱ्यात उभा राहिला. फाटका पायजमा. टोपी.

"अरे बस की..."

"नाय, नाय, नगं. बरा हाए की."

"बोल, काय म्हणतोस?"

"काय नाय उलसं सांगाइचं हाए"

" अरे सांग की मग !"

सांगावं की नाही अशा आविर्भावात सदऱ्याच्या फाटक्या धडप्याला तळवा दाबून तो नुसताच ओठ दाबून राहिला.

" कुणी आजारी आहे ?"

" नाय."

" पैसे-बियसे ?"

" अं हं ऽऽ"

" मग काय ?"

" मही जिब रेटत नाय सायब."

" हे बघ तू बोलून टाक बघू."

" कार्कून बडवेसाहेब म्हन्त्यात का म्हादेव कोंडला खरं पन हे धेड साहेब तिथं हुतं न्हायल्यानं इटाळला देव न् म्हादेवानं पाऊस नही पाल्डा. समद्यांला सांगत सुटलाय त्यो ऽऽ"

थोबाडावर कुणी थाडथाड थपडा ओढल्यासारखं झालं. कान जळजळले तापले. नकळत मुठी वळल्या. भयंकर अस्वस्थ जाळ भडकला. आतून उन्मळून पडल्यासारखं वाटलं.

बडवेनं म्हणावं की मी अस्पृश्य म्हणून महादेवानं पाऊस पाडला नाही? कोंवडी तोडताना भडव्याचं बामणपण कुठे गेलं होतं? बडवेची मान पिरगाळून टाकावी असं वाटलं. मी काचेचा ग्लास भिरकावला. टेबलवरल्या फाईल्स भिरकावल्या. भिंतीवरली सारी कॅलेंडर्स ओरबाडून फाडली—आंबेडकरांसकट. बेभान होऊन दणादणा बुक्क्या घातल्या टेबलावर.

धुर्जी कधी निघून गेला, कळलंसुद्धा नाही. किती एक वेळ अंधारातच कोसळून पडलेला असा भिजत राहिलो. नंतर जो जो कुणी खोलीकडे आला त्याला मी दारू आणायला पिटाळत होतो. सारखी ढोसत होतो पण मस्तकातली पेटती वळवळ तिळमात्र थांबत नव्हती.

एवढंच आठवतंय की अपरात्री पावेतो मी दारूच्या बाटल्यांशी झोंबी खेळत बसलो होतो.

पत्र्याच्या शेडमध्ये मोटारसायकल उभी केली. गॉगल काढून कामावर एक ओझरती नजर टाकली. काम नेहमीप्रमाणे चालू आहे. एका खड्डयाजवळ धुर्जी टिकावानं खणताना दिसला. खुणेनं बोलावलं तसा लगबगीनं पुढे आला.

" धुर्जी काय चाललंय ?"

" काय नै सायब. काम हं हं."

" कामावर महार-मांग-चांभार किती आहेत ?"

" आस्तील चाळीशेक गडीन् पंचवीशेक बाया, पोरीटोरी धरून"

" बरं. कुठं काम करताहेत ते ?"

" ते काय मह्याशेजारी खड्डयावर बाकीच्यापसून वायलं हैत."

" बरं बरं जा तू तुझ्या कामावर."

मी पत्र्याच्या शेडमध्ये शिरलो. बडवेला बोलावून घेतला. नवा मस्टर समोर ठेवला.

" बडवे ऽऽ"

" काय रावसाहेब ?"

" पूर्वीचे सगळे गॅंगमन बदला."

" ठीक आहे रावसाहेब."

" प्रत्येक गॅंगवर एक बी. सी. माणूस गॅंगमन दिसला पाहिजे मला. आणि बी. सी. लोकांची गॅंग सेपरेट नकोय मला. सगळ्यांना बाकीच्यात मिसळून टाका. आजपासून. आज दुपारपासून."

बडवेचा चेहरा कडूशार.

" रावसाहेब, लोकं नको म्हणतात. ऐकणार नाहीत."

" त्यांचा बाप ऐकेल. ऐकत नाहीत त्यांना घरी लावा." माझा आवाज नकळत कठोर होत चालला.

" पण, रावसाहेब..."

" मला पणबीण माहित नाही. सांगितल्याप्रमाणे झालं पाहिजे. तुम्ही सरकारचे प्रतिनिधी आहात. कायदे जाणताय. एक गाव एक पाणवठा किंवा मसणवटा राबवू द्यायला सरकार मूर्ख नाहीए. मला जास्त बोलायला लावू नका. तावडतोब अंमलबजावणी झाली पाहिजे. जा आता."

आवंढा गिळत केविलवाण्या चेहेऱ्यानं बडवे गेला. मी पत्र्याच्या शेडमध्ये इकडून तिकडे उगीचच फेऱ्या मारत राहिलो. जातपातीचा खवीस मानगुटीवर बसलाय असं वाटलं. त्या खवीसानं मला स्वस्थ बसू दिलं नाही. हळूहळू मी पिण्याचं पाणी पुरविण्याच्या कामी हरिजन स्त्रिया लावल्या. सुकडी वाटपाचं काम धुर्जीला देवून टाकले. त्याच्या धाकट्या भावाला— कोलशाला— सामुदायिक विहीरीच्या कामावर मुकादम ठेवलं. इभ्रुसारखी बऱ्यापैकी शिकलेली पोरं टेप-बीप किंवा लेव्हलचा स्टाफ धरण्यासाठी हाताशी ठेवली. बॉचमन

म्हणून काही वयस्क हरिजनांची नेमणूक केली- दोन-तीन वयस्कर स्त्रिया हरिजनांपैकी निवडून त्यांना पोरं सांभाळायला ठेवलं. कच्च्च्या ताव्यात फर्स्ट एडचं बॉक्स देवून टाकलं.

फारशी बोंबाबोंब अशी झालीच नाही. दुष्काळानं करपलेले गरीब फाटके जीव काय आरडाओरड करणार? सरपंच तेवढे एकदा खोलीत उगवले. सोबत पोलीसपाटील, ग्रामसेवक, तलाठीबिलाठी.. म्हणाले, तुम्ही हे काय चालवलंय बुवा? मी त्यांना सरकारी खाक्यावर एक भाषण हाणलं. किरकोळ किस्से आणि योजना ऐकवल्या. त्या तशा त्यांना अधिक परिचित. तर काय की मंडळी चूप. मग एकदा सगळ्यांना तालुक्याला नेवून भरपूर खावू-पिऊ (विशेषतः पिऊ) घातलं. सरपंचांच्या वाळत चाललेल्या ऊसाची मला कणव आली. दररोज टँकर त्यांच्या विहीरीत सोडायची व्यवस्था केली मात्र. सर्व काही सुरळीत चालू लागलं. शिस्तीत. व्यवस्थित. माझ्या इशाऱ्याप्रमाणे.

जयूचं पत्र आलं.

असशील तसा निघून ये म्हणून. कुठलंसं चांगलं नाटक होतं. तिला नाटकांचा भारी नाद. दळवी—तेंडूलकरांवर मरते ती. तर मी बॅग आवरून तयार झालो. निघणार इतक्यात एक मेसेज हाती आला—

"मिस रुबा, दी डॉटर ऑफ अवर ऑनरेबल कलेक्टर इज व्हिजीटींग यूवर साईट आउट ऑफ इंटरेस्ट. प्लीज सी दॅट एव्हरीथींग विल बी ओ. के. एक्झीक्युटिव्ह इंजिनीअर."

झक मारल्यासारखा चेहरा झाला. स्वतःवरच चरफडलो. कलेक्टरच्या कार्टीच्या नावानं थोडीफार लाखोली.शेवटी बिस्कीटचे पुडेबिडे जमवले. थोडीफार फळं आणि वऱ्यापैकी छत्री घेवून साईटवर दाखल झालो.

फारशी वाट पहावी लागली नाही. लॅव्हेंडर शेडची एक अँबेसेडर आचके खात आली. पंजाबी ड्रेसमधली एक तरुणी उतरली. एकटीच. गोरीपान, सडसडीत बांधा. धारदार नाक. बॉबकट वाऱ्यानं भुरभुरतोय.

"मै रुबा. रुबा जयस्वाल."— मिस रुबानं स्वतःच ओळख करून दिली. मी कामाची ओळख करून दिली. स्वरूप फायदे. मुख्य म्हणजे या साईटवर स्पृश्यास्पृश्य असा नसलेला भेदभाव.

"हाऊ इंटरेस्टिंग! येतो पहली साईट ऐसी रहेगी."

"जी हां! सभीलोग एकसाथही खाना खाते है। पानी पिलानेवाली ओरते भी बॅकवर्ड क्लासकी है; यहांतक की इच ॲन्ड एव्हरी गॅंगके जो लिडर आय मीन गॅंगमन रहते है वो सभी बॅकवर्ड क्लासके है!"

"रिअली इंटररेस्टींग! बॉम्बेमें मेरे कई दोस्त जर्नेलीस्ट है. अगर आप चाहे तो मैं सब बाते उन्हें बता दूंगी!"

"क्यूं नही मिस, जरूर जरूर."

"इट वील बी अल्सो बेटर टु हॅव सम फोटोग्राफ्स."

"अफकोर्स!"

मिस रुबानं एक खूपच वयस्क स्त्री निवडली. पिकल्या केसांची. चेहऱ्यावर सुरकुत्यांचं स्वच्छ जाळं. जे जे. मध्ये शिकणाऱ्या रुबाची नजर नक्कीच तयार होती. तिनं पुष्कळ स्नॅप्स मारले. म्हातारीचे. काम करणाऱ्या मॉबचे. मातीत खेळत माती खाणाऱ्या मुलांचे. काही आयडीयाज मी सुचवल्या. उदा. मी बडवेला पलीकडे पडलेला जनावराचा हाडाचा सांगाडा आणायला सांगितला. शेपूट हलवत तो पळाला. सांगाडा ओढत घेऊन आला. एका मोठ्या दगडाशेजारी तो रोवला. म्हातारीच्या डोक्यावर भरलं घमेलं देवून तिला उभं

## वर्गणीबाबत विनंती

ज्या वार्षिक साधारण सभासदांनी जून १९८५ अखेरची वर्गणी रु. २०|- अद्यापी भरलेली नाही त्यांना व्यक्तिगत स्मरणपत्र पाठविले आहेच. त्यांनी ही वर्गणीची रक्कम कृपया आपापल्या शाखेकडे किंवा परिषदेकडे सत्वर पाठवावी.

तसेच चालू १९८५–८६ या वर्षाचीही वर्गणी सत्वर पाठवावी.

जे सभासद हप्त्याने आजीव सभासद होत आहेत त्यांनीही आपली उर्वरित रक्कम लवकर पूर्ण करावी ही विनंती.

कार्यवाह

**महाराष्ट्र साहित्य परिषद**

केलं. किंवा झुडपाला बांधलेली तान्ह्याची झोळी आणि दूरवर काम करणारी माणसं. दोन्ही आयडीयांवर मिस रुबा भलतीच खुश झाली.

एका उंच जागी बसून रुबानं काही स्केचेस तयार केले. बडवे अदबीनं छत्री धरून उभा राहिला. तिचं पेन्सील-वर्क नक्कीच चांगलं होतं. मला घरी इनव्हाईट करून मिस रुबा गेली. जयूला भेटता आलं नाही याची हुरहुर होतीच पण रुबामुळं दिवस काही वाईट गेला नाही.

सुकडीची गाडी घेवून धुर्जी आला.

" काय धुर्जी ! "

" काय नही सायब."

" कसं काय चाललंय ? "

" ठेपशीर हाय सायब."

" काही तकलीफ, बडव्याकडून वगैरे ? "

" नाय. पैल्यावानी नाय."

" पहिल्यावानी ? पहिलं काय व्हायचं ? "

" सायब त्या बडव्यांनी आपली एकसुदीक पोर नासवायची ठुलीनाय."

" आसं ? "

" तर ! आपून गरीब मान्सं. मस राग येतो पन् काय करता ? "

" अजून चाललंय असं ? "

" उलीउली. पोरी कामाव घेतानी लै चाकुन घेतो भडवा. पोरींची मापं बघतो."

" बरं बरं. बाकी व्यवस्थित चाललंय ना ? "

" व्हय सायब. लै ठेपशीर हाए तुमी आल्यापून."

धुर्जी सुकडीच्या पोत्यांच्या नादी लागला.

" नमस्कार रावसाहेब "— बडवे उगवला.

" आटोपला हजेरीचा उद्योग ? "

" अगदी."

" राव बडवे आपली खोली खूप खराब झालीय "

" करून घेवू साहेब त्यात काय ? पाहिजे ती बाई पाठवून देऊ ! "

" कशा कशा आहेत बायका ? "

" पाह्यजे तशा रावसाहेब. पाहिजे त्या रंगाच्या, वयाच्या, जातीच्या, कपड्याच्या."

" एक पाठवा चांगलीशी."

" लगेच. सॉलीड पाठवतो. जहागीरदाराची आहे. हल्ली पार डाऊन झालेत गरीबीनं. पण आहे खास. तबीयत खूष रावसाहेब."

" कुठे काही बोंब वगैरे ? "

" छे ! छे !...आणि बायका म्हणजे काय तर जेवायचं एखादं भांडं. वापरलं तर थोडसं खरकटं होणार. धुतलं की पुन्हा वापरायला आहेच हॅ हॅ हॅ ! "

मोटारसायकलला लाथ घालून खोलीकडे सटकलो.

काही वेळाने एक तरणी मुलगी आली. चापूनचोपून नेसलेली. दिसायला खरोखरीच चांगली. तिनं भरारा सारं आवरलं. जमीन सारवून आणि जिथल्या तिथे सामान लावून उभी राहिली अबोल.

" नाव काय तुझं — " काहीतरी विचारायचं म्हणून मी.

" अलका."—तिनं पदर सावरला. नजर पायाच्या अंगठ्यावर— मी तिच्या अंगभर नजर पोचारली. तिचे डोळे म्हणजे जयूच. मी चमकलो. बराच वेळ मला बोलायला काही सुचलंच नाही. शेवटी तीच माझ्याकडे पाहून गोड हसली. म्हणाली, 'बडवेसाहेबांनी सांगितलं होतं तुम्हाला खुष कर म्हणून' तिची नजर पुन्हा खाली. क्षणभर उत्तेजित झालो. जयूच्या आठवणीनं पुन्हा विरघळून गेलो. सालं कातडीलाच आपण भुललो.ती आज जेवली असेल की अर्धपोटी असेल ? कण्या खाल्ल्या असतील की मिलो ? सुकडी ? हुलगे ? आपण नक्की कुणावर सूड उगवायला पाहतोय ? कशासाठी ? ... स्वतःच्याच वागण्याची शरम वाटली. पशूपणाची किळस आली.

" ठीक आहे. जा आता."—मी कसंबसं पुटपुटत कॉटवर लवंडलो. आतून बाहेरून ढवळून निघालो होतो.

कितीएक दिवसात जयूला लिहायचं म्हणत होतो आणि जमत नव्हतं. पेन उचलला. प्रिय... प्रिय जयू... डिअर जयू... प्यारी जयू... जयू डिअर... शेवटी 'जयू' असं एवढंच लिहीलं.

—जयू;

हल्ली रात्र मला चढते. मधासारखी. खूप बदललोय मी, बदलतोय. स्वतःचीच भीती वाटतेय की आपण भारतीय अरब तर बनत नाही ना ? 'दलित' शब्दाचा व्यापक असा अर्थ............... ..........

पुढे पेनच चालेना. अलकानं खो घातला. बडवे म्हणाला, 'बायका म्हणजे जेवायचं भांडं. वापरलं की खरकटं होणार. धुतलं की पुन्हा वापरायला आहेच !' अलकानं खाली मान घातली...अलका मुसमुसू लागली.



अनुक्रमणिका

...अलकाचे डोळे की जयूचे ? ... अलका कोसळली. कंदील आपोआप कमी होत गेला. चहूकडे अंधारच अंधार माजला.

मिस रुबानं सहज म्हटलं होतं खरं. पण खरोखरीच पेप्रात छापवून आणलं. रविवारच्या पुरवणीत. मी आयडीया सुचवलेल्या त्या दोन फोटोग्राफ्ससकट. पुष्कळच कवटुक-बिवटुक छापून आलं. त्यावर जयूचं पत्र आलं. कौतुकाचं. मुंबईकडच्या दलित नेत्यांची काही पत्रं. काही दलित लेखकांची तर काही दलित मित्रांची. जिल्ह्याला दलितनाट्यसंमेलन भरवलं जाणार होतं त्याचंही निमंत्रण मिळालं औरंगाबादकडला कथाबिथा लिहिणारा सासणे नावाचा मित्र आला. म्हणाला, 'तुझं कौतुक वाचलं न् आलो.' मग आम्ही साईटवरती तंगड्या तुटेस्तोवर भटकलो.

पलीकडे मजुरांची लहान लहान पोरं मातीत खेळत होती; आपटत होती. हसत होती. हसता हसता रडत होती. मध्येच एखादं विमान यायचं. "है आलं आलं- गेलं गेलं-" रड्ढ विसरून पोरं आरडायची. कुणी भूक-भूक करत रडायचे. विमान पाहून म्हणायचे, "थांब रे ! आम्हाला खावू देऊन जा रे... आम्हाला पण घेऊन जा रे ऽऽ"

सासणे म्हणाला, "अरे ही तर कथा आहे कथा."

काही चिमुरड्या पोरी शाळा शिकायच्या वयात डोक्यावर घमेलं घेऊन उपसताहेत. खाऊन खेळायच्या वयात हजेरीसाठी लुगड्याचा बोंगा सावरत खड्डे खणताहेत.

सासणे म्हणाला, "अरे कथा आहे कथा."

दुपारच्या सुटीत बोंबीलवाली आणि भेळवाली बाई एकमेकींवर शिव्या ओकताहेत. अश्लील शिव्या. किरकोळ गिऱ्हाईकावरून वाढलेलं भांडण. मग अमक्या तमक्या-खाली निजल्याचे आरोप-प्रत्यारोप. भांडण हातघाईवर येतं. बोंबीलवाली भेळवालीच्या झिपऱ्या ओढते. भेळ-वाली तिची चोळी फाडतेय. बोंबीलवाली भेळवालीचं लुगडं फेडतेय. तमाम गर्दी. भांडण जोशात.

सासणे म्हणाला, "अरे कथा आहे कथा."

गंमत म्हणून अ. भा. दलित नाट्यसंमेलनाच्या

आवारात हिंडलो. सोबत जयू. ब्राह्मणाची अशी ती बहुधा एकटीच. सगळे टकटका बघताहेत. जी. टेक्सासनं बाजूला घेऊन विचारलं, "बामणाची आहे ना! लढ लढ. मजा कर." काहीच बोललो नाही त्याच्याशी. सगळ्यांच्या बोलण्याचा आणि नाटकाचाही सूर बाकीच्यांची अवहेलना करण्यात होता. त्यात सारा उद्रेक आणि जाळच. माझ्या मानगुटीवर बसलेल्या खवीसाची असंख्य रूपं मी समोर पाहत होतो. भयंकर अस्वस्थ झालो. एकदोन ठिकाणी 'दलित' शब्दाच्या व्यापक अर्थाविषयी बोलण्याचा प्रयत्न केला. त्यांचे कडवट चेहरे आणि बधीर कान पाहिले मात्र पुन्हा म्हणून धाडस केलं नाही. लागलीच काढता पाय घेतला आवारातून. जयू म्हणाली, 'हे तुमचं दिशाहीन गलबत कुठे भरकटणार आहे? कुठल्या किनाऱ्याला लागणार आहे कुणास ठाऊक?' माझे ओठ शिवलेले होते.

एम. के. बडवेनं मध्यंतरी बरेच वाईट उद्योग केले. पगाराचे अंगठे घेण्याबरोबर त्यानं आणखी एका कोऱ्या कागदावर अंगठे घेतले. माझ्याविरुद्ध निवेदनांचा पाऊस पाडला सरकार दरबारी. रुवाच्या वृत्तपत्र कृपेमुळे आपोआप निवेदनं फाईल झाली.

एके दिवशी त्यानं कहरच केला. दारु पिवून माझ्यासमोर तो भाडभाड शिव्या ओकत राहिला. अश्लील. मी ही वैतागलो. चेवानं दुसऱ्यादिवशी धुर्जीचा भाऊ कोलशा त्याच्यावर सोडला. सगळं कसं पूर्वनियोजित ठेवलं कोलशानं आय-भैन-जात उद्धरली. बडवे हबकलाच. तोही किळसवाण्या शिव्यांची बरसात कोलशावर करू लागला. त्यात जातीवाचक अपशब्द अमाप.

मी ठेवणीतले अस्त्र बाहेर काढले. कोलशाला गुन्हा नोंदवायला सांगितला.जातीवाचक अपशब्द वापरल्याचा. बडवे सस्पेंड व्हायला बिलकूल वेळ लागला नाही.

दरम्यानं बडवेबद्दल बरीच खोल माहिती मिळाली. उदा० त्याचा बाप बुळा. हा पहिल्या बायकोचा. कुणा मुसलमानाचा हात धरून ती गेली. हा त्या मुसलमानाच्याच रक्ताचा. त्याच्या बुळ्या बापानं दुसरी बायको केली. हा त्या सावत्र आईशी निजतो असाही एक प्रवाद होता. तसं असेल् किंवा नसेलही. पण त्याला कुणी मंगल कार्यासाठी बोलावत नव्हतं इतका तो गुणी होता.

लाख प्रयत्न करूनही न जमल्यानं बडवे माझे पाय धरायला आला मी दगडी पुतळा बनून राहिलो होतो.

साधारण दुपार.

नुकतंच जेवण आटोपून पत्र्याच्या शेडमध्ये खुर्चीत रेललोय निवान्त. किंचित डुलकी येतो आहे बसल्या-बसल्या. फाडकन आवाज झाला. शेडचा पत्रा वाजला. बहुदा एखादा दगड. पुन्हा आवाज. दगडांचा वर्षाव धाड्-धाड्. हादरलोच. बाहेर आरडा ओरडा अयाईग ऽऽ...पळा पळा...वाचवा...मेलो मेलो... धर धर... हाण च्यामायला... म्हारडे... मांगटे... चांभारडे ठोका ठोका... आ ऽऽऽ...

क्षणभर काही सुचेनाच.

धुर्जी धावत आला. म्हणाला, "सायब पाटकुनी पळाले....गाववाले आपल्या हरिजन लोकास्नी सडकीवल्यात. दगड-दांड्यांनी. पळा लवकर. उठा उठा." धुर्जीच्या चेहऱ्यावर रक्ताचा ओघळ.

खरंच उठलो. मोटारसायकला लाथ घातली. साली लवकर चालूही होईना. कशीबशी घुमवली. धुंऽऽग करत तीनचार दगड आले. पाठीत एक बाककन बसला. एक डोक्याला. गरम थेंब ओघळले. मागं वळून पाहिलं नाही. दगडधोंडे-नाले-खोंगळा पाहिल्या नाहीत. जमेल त्या रस्त्याने मोटारसायकल दामटत गेलो.

खोलीत गेल्यावर सुरक्षित वाटलं. पण फक्त अर्धाच तास. जमाव आरडाओरडा करत आला. मी प्रतिकार करूच शकलो नाही. कुठल्यातरी आघातालाच बेशुद्ध पडलो.

हॉस्पिटलच्या शुभ्र वातावरणात आडवा पडलोय. बँडेजनं जखडला गेलोय. अंग ठणकतंय. औषधाचा अंमल आहेच.

बातमी बरीच गाजली असावी. कितीएक दलित नेते उगवले. जनावर मेल्यावर कावळे-गिधाडे जमतात तसे.

कुणी म्हणाले, उपोषणाला बसू आम्ही!

कुणी म्हणाले, आम्ही मोर्चा काढणार आहोत.

कुणी विधानसभेत आवाज उठवितो म्हणाले.

अंगावरती केवळ शब्द आदळत होते. गळून खाली पडत होते. कुणाशी काहीही बोलण्याची इच्छा होत नाहीए. एखादा अध्याय संपवताना डोकावणारा पुढचा अध्याय पुसटसा चमकतोय. अधून-मधून.

सर्वदूर अशा निर्जन बेटावर तरंगतोय मी-एकाकी.

■

# चक्रव्यूह

## मिलिंद बोकील

प्रतिमा नेहमीप्रमाणे एक वाजता आली. कलेक्टरचे सकाळचे काम तोपर्यंत संपत आले होते. कचेरीतल्या माणसांची ह्या वेळेला जेवणाची सुट्टी होई. आणि त्याची इतर लोकांना भेटण्याची वेळ दोन पासून सुरू होत असे. हा मधला वेळ त्याला नेमका मोकळा मिळे. त्यामुळे प्रतिमानं वेळ काढून यायचं असलं की दुपारी एक वाजता यायचं हे जणू ठरल्यासारखंच होतं.

ती ऑफिसमध्ये आली तेव्हा कलेक्टर शेवटची फाईल पहात होता. "एक दोन मिनिटं हं!" तो मान वर न करता म्हणाला. प्रतिमा खुर्चीच्या हातावर कोपर टेकवून त्याच्याकडे पहात बसली. काही वेळाने त्याने फाईल मिटवली आणि शिपाई बोलावून कागदपत्रे पाठवून दिली. मग आरामशीर खुर्चीत रेलत तो म्हणाला.

"का कोण जाणे. पण तू आज येशील असं वाटलं होतं."

"का? असं का वाटावं?"

"माहीत नाही. कदाचित बऱ्याच दिवसात तू आली नाहीस म्हणूनही असेल."

"बरेच दिवस कुठले? पंधरा दिवसापूर्वी तर आले होते."

"मग? पंधरा दिवस हा काय लहान काळ झाला?" तो तिच्याकडे रोखून पहात म्हणाला. प्रतिमानं त्याच्या नजरेत नजर गुंतवली. तिचे ओठ मनापासून हसले.

"तुम्ही कामात असता." ती नजर न काढता म्हणाली. "सबंध जिल्ह्याचे साहेब तुम्ही. सारखं येऊन तुम्हाला त्रास कशासाठी द्यायचा."

"ठीक आहे. नका येत जाऊ. तुमची मर्जी."

"गंमत पुरे, मी खरं तर आज कामाकरता आले आहे."

"कामाशिवाय तू कधी येतेस?" कलेक्टर तिला मध्ये अडवत म्हणाला.... "नेहमी काही ना काही काम असतंच. ठीक आहे बोल."

"तुम्हाला मी मागच्या वेळेला एकदा बोलले होते." प्रतिमा आपल्या पर्समधून काही कागदपत्रे काढत म्हणाली, "सोनेवाडीला हरिजनांची ही लिफ्ट स्कीम आहे. सरकारने भूमिहीन हरिजनांना ही जमीन दिली आहे. त्यावर त्या लोकांनी बँकेकडून कर्ज घेऊन पाणी पुरवायची योजना केली आहे. ह्या जमिनी शेजारून तुमचा लेफ्ट बँक कॅनाल जातो. त्यावरून हंगामी पाणी उचलण्याची पाटबंधारे खात्यानं परवानगी दिली आहे. गेल्या वर्षी स्कीम सुरू झाली. एक पीक काढून झाले आहे. हा त्याचा नकाशा."

तिनं नकाशा त्याच्या समोर ठेवला आणि मग टेबलावर ओणवी होऊन ती त्याला ठिकाणं दाखवू लागली.

"ह्या जमिनीच्या कडेला, उत्तरेकडे शिरोळ्यांचे सायन्स कॉलेज आहे. सोनेवाडी म्हणल्यावर खरे तर काही वेगळं सांगायला नकोच. सगळं शिरोळ्यांचंच राज्य आहे. ह्या कॉलेजला लागून शिरोळ्यांच्या सोनेवाडी एज्युकेशन सोसायटीला आपलं नवं इंजिनियरिंग कॉलेज काढायचं आहे. आणि त्या साठी त्यांना ही हरिजनांची जमीन हवी आहे-"

"हूं!" कलेक्टर त्या नकाशाकडे पहात म्हणाला, "मग पुढे?"

"ही जमीन कॉलेजकरता मिळावी यासाठी शिरोळे सगळे प्रयत्न करीत आहेत. पूर्वीपासूनच ते चालू आहेत पण सध्या अगदी जोरात. आमचे हे हरिजन लोक ही जमीन द्यायला तयार नाहीत. शिरोळ्यांच्या सोसायटीने तेवढ्यासाठी सरकारकडे अर्ज केला आहे. त्यांचं म्हणणं असं की हरिजनांना दुसरीकडची जमीन द्यावी. आणि सरकारने ही जमीन नव्या कॉलेजसाठी द्यावी."

कलेक्टर टेबलावरच्या नकाशाकडे बारकाईने पहात

राहिला. त्या बरोबरचे कागदपत्र त्याने चाळून पाहिले. त्यात लोकांची निवेदनें आणि सह्या होत्या. त्याच्या ऑफिसला पाठवलेल्या पत्रांच्या प्रती होत्या. काही वेळाने तो प्रतिमाला म्हणाला–

" मला ह्याची प्रत पाठवल्याचं म्हटलंय. मी तर कधी पाहिलेली नाही."

" त्याला पुष्कळ दिवस झाले. तुमच्या डेप्युटी कलेक्टरला विचारा, त्याला माहीत असेल."

" तुझा या सगळ्याशी कसा काय संबंध ? "

" सोनेवाडी हे आमच्या कार्यक्षेत्रातलंच गाव आहे. इतके दिवस तिथं काही प्रश्न नव्हता म्हणून आम्ही ते घेतलं नव्हतं. काही दिवसांपूर्वी हे लोक माझ्याकडे आले." प्रतिमा म्हणाली.

ती अजूनही ओणवी उभी होती. त्याचं डोकं खाली होतं पण तिच्या शरीराची निकटता त्याला जाणवत होती. नेहमीसारखाच तिने बिन बाह्यांचा ब्लाऊज घातला होता. आणि तिचे नितळ खांदे त्याच्यापसून काही इंचावर होते. नेहमीसारखाच तिच्या केसांचा एक स्त्रैण, धुमसणारा सुगंध येत होता. कलेक्टरनं आपली छाती त्या सुगंधानं भरून घेतली. पुन्हा मागे रेलत तो म्हणाला–

" म्हणून तू त्यांचं वकीलपत्र घेतलंस काय ? "

" न घेऊन काय करू ? नाहीतर अन्याय होईल त्यांच्यावर. तुमची सरकारी यंत्रणा काही करणार नाही. हेच लोक नव्हे तर याच्या आधीच्या पिढ्याही मोल मजुरी करत जगल्या. आता कधी नव्हे ती यांना तुकडा तुकडा जमीन मिळाली आहे. ती ही गेली तर त्यांनी करायचं काय ? "

तो पहात राहिला. प्रतिमाच्या डोळ्यातील मघाची मिस्किल चमक जाऊन कार्यकर्तीची तीव्रता दिसू लागली. तिचा स्वरही थोडासा चढला. ती आवेगाने बोलू लागली. त्याने एकवार पुन्हा ते कागदपत्र चाळले. मग ते बाजूच्या फाईलमध्ये ठेवत तो म्हणाला,

" ठीक आहे. हे राहू दे माझ्याकडे. मी पहातो काय करायचं ते."

" बरं झालं. आता काही काळजी नाही. " प्रतिमा हलकासा सुस्कारा सोडत म्हणाली. " तुम्हाला सगळी माहिती झाली. नाही तर तुमचा सरकारी हुकूम काय आला असता कुणास ठाऊक ? "

" छे असं कसं होईल ? सरकार काय त्यांचं शत्रू आहे का ? "

" एरवीचं नाही मी म्हणत. ही संस्था शिरोळ्यांची आहे." प्रतिमा म्हणाली.

तिच्या बोलण्यातली काळजी कलेक्टरला त्या वेळी नीटशी समजू शकली नाही. त्याचा अर्थ नंतर काही दिवसांनी त्याच्या लक्षात आला. प्रतिमा आणखी काही वेळ बसली. त्यांच्या इतर बऱ्याच विषयांवर गप्पा झाल्या. ती अजूनही बसली असती पण तेवढ्यात त्याला जिल्हा परिषदेचा सी. ओ. भेटायला येत असल्याबद्दलचा फोन आला. त्याच्या बोलण्यावरून काम तातडीचं असावे असे दिसत होते. कलेक्टरला ते टाळता आले नाही. पुन्हा निवांत येते असं सांगून प्रतिमा उठून गेली.

दिवसभर तो कामात बुडून गेला. दिवस टंचाईचे होते आणि जिल्ह्याच्या निम्म्या भागात पिण्याच्या पाण्याची ओरड होती. ठिकठिकाणी रोजगाराची कामे काढायची होती. निरनिराळे अधिकारी सारखे भेटायला येत होते. गुंतागुंतीच्या किचकट फायलींचा ढीग जमत होता. पण त्याला त्याचा कंटाळा आला नाही. प्रतिमा सबंध दिवसावर प्रसन्न ताजेपणा शिंपडून गेली होती.

प्रतिमा एका स्वयंसेवी संस्थेचं काम करी. तिचं ऑफिस जरी शहरात होतं तरी कामाचं क्षेत्र दूर ग्रामीण भागात होतं. तिची ओळख नक्की कधी झाली ते त्याला आठवत नव्हते. पण निदान वर्षापूर्वी तरी.तेही कुठल्याशा कार्यक्रमाच्या निमित्ताने.एका खेडेगावात तिच्या संस्थेतर्फे स्त्रियांना शिवणाची यंत्रे वाटण्याचा कार्यक्रम होता. कलेक्टरला त्या कार्यक्रमाचे अध्यक्ष म्हणून बोलवायला ती आली होती. त्याला असल्या कार्यक्रमांना जायला फारसा उत्साह नसे. प्रतिमाच्या ऐवजी दुसरं कोणी आलं असतं तर काहीतरी कारण सांगून त्याने नकारच दिला असता. पण प्रतिमाला त्याला नाही म्हणता आलं नाही. ती त्याला पहिल्यांदाच जरी भेटत होती तरी तिचं बोलावणं इतकं आकर्षक होतं की आपल्या नकळत आपण कधी हो म्हणून बसलो ते त्याला कळलंही नाही.

त्या कार्यक्रमाच्या अगोदर त्याला प्रतिमाच्या संस्थेची अजिबात माहिती नव्हती. पण ज्या प्रकारे तो सगळा कार्यक्रम पार पडला त्यामुळे प्रतिमाच्या व्यक्तिमत्वाची एक वेगळीच मोहिनी त्याच्यावर पडली. कार्यक्रम अतिशय उत्तम झाला. कुठेही गडबड गोंधळ नव्हता.

प्रतिमा सहजतेने सगळ्या गोष्टी हाताळत होती. केवळ त्याच गावचे नव्हे तर आजूबाजूच्या गावांचेही लोक आले होते. लहानमोठ्या पुढाऱ्यापासून सर्वसामान्य माणसापर्यंत प्रत्येकाला ती सांभाळत होती. खेडेगावातल्या स्त्रियांना शिवणयंत्रे वाटण्याची कल्पना तिचीच. कलेक्टरला ती आवडली. आपल्या भाषणात त्याने त्या कल्पनेची मनापासून स्तुती केली. अशा प्रकारचे उपक्रम सगळीकडे झाले पाहिजेत असं तो म्हणाला. इथून पुढे संस्थेच्या कामात काहीं अडचणी आल्या तर आपण स्वतः त्यांचं निवारण करू असं त्यानं जाहीररीत्या सांगितलं.

तसं म्हणण्यामध्ये संस्थेचं काम होण्यापेक्षा प्रतिमाच्या भेटी वारंवार व्हाव्यात असा त्याचा सुप्त हेतू होता आणि त्याच्या अंदाजाप्रमाणे तो पुराही झाला. प्रतिमा मग काही ना काही काम घेऊन येऊ लागली. पुष्कळदा ते इतके क्षुल्लक असे की, तालुक्याच्या ठिकाणीही पुरे होऊ शकले असते. पण कलेक्टरने तसे कधी दर्शविले नाही. उलट कुठल्या ना कुठल्या निमित्ताने ती नेहमी कशी येईल हे तो पाहू लागला. त्यांच्या नकळत स्नेहाने पंख पसरले.

प्रतिमा सुरवातीला एकटी येत नसे. कधी कधी तिचा नवराही तिच्या सोबत येई. तो शहरातल्या एका कॉलेजमध्ये प्रोफेसर होता. त्याला असल्या कामाची आवड होती. ही संस्था जवळजवळ त्यानेच सुरू केली होती. तो लुकडा, टक्कल पडत चाललेला माणूस कलेक्टरला फारसा कधी आवडला नाही. प्रतिमाने त्याच्याशी लग्न का केले असाच प्रश्न त्याला पडे. तिची भेट झाल्यावर दुसऱ्याच दिवशी त्याने तिचा पोलिस रिपोर्ट मागवून घेतला होता. ती सामाजिक कार्यकर्ती असल्यानं आणि तिची राजकीय मते तीव्र स्वरुपाची असल्याने तो बराच सविस्तर होता. ती मूळची मुंबईची होती. तिचं सगळं शिक्षण तिथंच झालं होतं. लग्न झाल्यावर ती या जिल्ह्यात आली होती. पण ह्या कामाची उपजत आवड आणि प्रेम असल्यासारखे तिने स्वतःला त्यात झोकून दिले होते. तिचा नवरा पुरेसा वेळ देऊ शकत नसे आणि प्रतिमाला दुसरा कोणता व्यवसाय नव्हता. तिच्याच उत्साहानं आणि धडपडीनं संस्थेचे काम फुलू लागले होते.

कलेक्टरचा दिवस उशीरा संपला. पण मग दुसरे काही न करता तो लवकर जेवायला आला. जेवताना अचानक सोनिया म्हणाली; "आज प्रतिमा आली होती वाटतं ?"

कलेक्टर क्षणभर चमकला. "हो ! का ?"

"काही नाही, सहज."

"तू अगदी दिवसभर पाळत ठेवून होतीस वाटतं?"

"छे ! पाळत कशाला ठेवायला हवी. दुपारी बघितल्यासारखं वाटलं म्हणून विचारलं."

ती खोटं बोलत आहे हं कलेक्टरला कळत होतं. त्याचं ऑफिस आणि घर शेजारी शेजारी होते. घरातून ऑफिसला जायला छोट्या पुलासारखा रस्ता होता. बेडरूममधून किंवा बैठकीच्या खोलीतून ऑफिसपुढचा सगळा परिसर स्वच्छ दिसत असे. पार मुख्य फाटकातून आत येणारा माणूस आणि माणूस पाहता येई. दिवसभर करण्यासारखे काही नसल्याने सोनियाचा बहुतेक वेळ त्या खिडक्यांपाशी बसून येणारी जाणारी माणसे न्याहाळण्यातच जाई.

"तुमच्या भेटीच्या वेळा तर दोन ते चार अशा असतात नं ?" तिने पुढे विचारलं.

"हो ! मग ?"

"प्रतिमाला त्या वेळात यायला काय होतं ? आधी येऊन कशाला कामात डिस्टर्ब करते ती ?"

"त्या भेटीच्या वेळा असल्या तरी इतर वेळी काही भेटूच नये असा नियम नाही." तो तीव्र सुरात म्हणाला. "मी मोकळा असेन तर कुठल्याही वेळी भेटू शकतात माणसं."

"एवढं सारखं सारखं काय काम असतं कोण जाणे ?"

"मी इथला कलेक्टर आहे," तो खुर्ची मागे सारत उठता उठता म्हणाला. "माझ्याकडे येणाऱ्या प्रत्येक माणसाचं काम काय असतं हे तुला कळलंच पाहिजे का ? हल्ली तू माझ्या ऑफिसच्या कामात अनावश्यक लक्ष फार घालायला लागली आहेस."

प्रतिमाची आणि सोनियाची ओळख होती. किंबहुना त्यानेच ती करून दिली होती. प्रतिमा आणि तिचा नवरा त्यांच्या कार्यक्रमाला गेलं की कलेक्टरचं फार अगत्यानं स्वागत करीत. त्या दोघांना कधीतरी घरी बोलवावं असं त्याला बरेच दिवस वाटत होतं. एकदा ती दोघं दुपारची ऑफिसात आली असतांना त्याने मग त्यांना घरी चहाला नेले. सोनियाची त्या दोघांशी ओळख करून दिली. सोनियाही त्यांच्याशी व्यवस्थित वागली. प्रतिमाला परत येण्याचं तिनं तोंड भरून आमंत्रण दिलं.

प्रतिमानं दिलेले कागदपत्र, त्याने जमीन संपादनाच्या डेप्युटी कलेक्टरकडे त्याच दिवशी देऊन टाकले. आणि इतर कामाच्या दडपणात तो ते किंचितसे विसरूनही गेला. नंतरचे काही दिवस त्याला सलगपणे दौरा होता. मध्यंतरी कमिशनर साहेबांची भेट झाली. युनिसेफचे एक परदेशी शिष्टमंडळ येऊन गेले. जिल्हा नियोजन मंडळाची एक सभा. ती सभा आटोपून तो परत ऑफिसमध्ये येऊन बसला आणि काही वेळाने आप्पासाहेब शिरोळे त्याच्याकडे आले. ते स्वतःही नियोजन मंडळाचे सभासद होते. आल्या आल्या काही वेळ त्यांची सभेबद्दलच चर्चा झाली. दुष्काळी परिस्थितीबद्दल बोलणे झाले.

"तुम्ही आपल्या जिल्ह्यासाठी केंद्राकडून काही मदत मिळाली तर पहा ना" कलेक्टर त्यांना म्हणाला.

"आम्ही खूप प्रयत्न करतो हो." शिरोळे खुर्चीत आपले अंग पसरत म्हणाले, "पण ब्यूरोक्रॅटस आहेत ना तिथे. झारीतले शुक्राचार्य. ते कुठे योजना पुढे जाऊ देतात."

कलेक्टरला त्यांचे बोलणे अजिबात आवडले नाही. पण शिरोळ्यांना असे बोलण्याची सवयच होती. ते जाहीररीत्या तर नोकरशाहीवर टीका करीतच पण खाजगीत समोरासमोर अधिकाऱ्यांना बोलायला कमी करत नसत. ते स्वतः अतिशय अभ्यासू होते आणि शेतकरी कुटुंबातले असून राजकारणात बरीच वर्षे असल्याने त्यांना बारीसारीक बाबींची चांगली माहिती होती. कधी ते एखाद्या अधिकाऱ्याला पेचात धरतील याचा नेम नसे. कलेक्टरशी कधी त्यांचा झगडा झाला नव्हता पण फारसे पटलेही नव्हते.त्याला हा माणूस कधीच आवडला नाही. परंतु संबंध सारखा येई. मनात इच्छा नसूनही त्यांच्याशी अदबीनं वागावं लागे. राजकीय वर्तुळात खासदार शिरोळ्यांच्या नावाला फार मोठे वजन होते. देशातला काही धूर्त राजकारण्यात त्यांची गणना होई. राज्याचा मुख्यमंत्री बनवण्यात त्यांचा हात असेच. परंतु पंतप्रधानांशीही त्यांचे संबंध जवळचे आहेत हे सर्वश्रुत होते. जिल्ह्यातली सगळी सहकारी





अनुक्रमणिका

चळवळ त्यांच्या छत्राखाली होती. त्यांच्या भागात त्यांचे अलिखित साम्राज्य होते. साखर कारखाना, डिस्टिलरी, सूत गिरणी, हॉस्पिटल, शाळा, कॉलेज. नंतर इंजिनियरिंग आणि मेडिकल कॉलेज, गाड्या, मोटारी, पेट्रोल पंप्स.

स्वत: शिरोळे अतिशय साधेपणाने रहात. ते वेळ पडली तर उलटसुलट बोलत. पण त्यांच्या चेहेऱ्यावर सुसंस्कृतपणा आणि नम्रपणाचा एक थर कायम असे. आताही ते शांत स्वरात म्हणाले;

"कलेक्टर साहेब, आमच्या भागात काही दुष्काळची कामे काढा ना. बोअर वेल्स वगैरे ह्या काहीतरी."

कलेक्टरला त्यांच्या बोलण्याचे आश्चर्य वाटले. तो सगळा बागायती भाग होता. तिथे टंचाई नव्हती.

"हो. काढू की." तो गुळमुळीतपणे म्हणाला.

"नुसतं आश्वासन नको. नक्की काहीतरी सांगा."

"शिरोळेसाहेब, पण तुमच्या भागापेक्षा ह्या खालच्या भागात टंचाई फार आहे. मूळचाच तो दुष्काळी भाग. त्यात गेल्यावर्षी पाऊस नाही. तिथे जरा जास्त लक्ष दिले पाहिजे."

"ते ठीक आहे हो. पण रोजगार हमींची कामे पाहिजेत की. ह्या दिवसात लोकांना रोजगार नसतो."

"नाही, साहेब...माफ करा." कलेक्टर आपले बोलणे रेटत म्हणाला, "पण आमचा अनुभव असा आहे की तुमच्या भागात सरकारी कामावर आम्हाला मजूरच मिळत नाहीत. तहसीलदारांचे रिपोर्टस येतात सारखे, मजुरांचं शॉर्टेज आहे म्हणून. त्याला काय करणार ?"

कलेक्टरचा मुद्दा खरा होता. शिरोळयांना बोलता आले नाही. ते मग विषय बदलत म्हणाले; "बरं. बघा काय ते. मी जरा वेगळ्या कामाकरता आलो होतो. सोनेवाडीला आम्ही इंजिनियरिंग कॉलेज काढतो आहोत. त्या साठी जमीन पाहिजे आहे. सरकार दरबारी अर्ज वगैरे केले आहेत. ते काम अजून पेंडिंग आहे. ते लवकर व्हायला पाहिजे. पुढच्या वर्षापासून, तिथे बिल्डिंग बांधून कॉलेज सुरू करायचं आहे आम्हाला."

कलेक्टर सुरवातीला अनवधानाने 'हो, करतो' असे म्हणून गेला. मण सोनेवाडी आणि कॉलेजसाठी जमीन म्हणल्यावर त्याच्या डोक्यात कुठेतरी खुणेची घंटा वाजली.

"कोणती जमीन हवी आहे?" त्याने सावधपणे विचारले.

"सध्याच्या कॉलेजला लागून आहे तीच. सरकारीच जमीन आहे."

"ती आम्ही कोणाला दिली नाही नं? म्हणजे हरिजनांना वगैरे?"

"काही दिलेली आहे त्यातली. पण दिलेली असली म्हणून काय झालं? आम्ही काय फुकट थोडीच मागतो आहोत. त्याची योग्य किंमत देणारच की आम्ही. त्या बदली त्यांना दुसऱ्या ठिकाणी तेवढीच जमीन घेता येईल. आमचा कारखाना इतर लागेल तेवढी मदत करेल."

"ठीक आहे माझ्याकडे कागदपत्र पाठवून द्या. पाहतो मी."

"पाहू नका, कराच." ते हात जोडत, त्याला नमस्कार करून उठत म्हणाले, "ग्रामीण भागातल्या मुलांसाठीच इंजिनियरींग कॉलेज काढतो आहोत. सर्वांच्या सहकार्यानं आम्ही ते पुढच्या वर्षी सुरू करणार आहोत. लहानसहान गोष्टींचा अडथळा येऊ नये एवढीच इच्छा."

कलेक्टरला त्यांच्या मानभावीपणाचा राग आला. पण तो दाखवण्याची सोय नव्हती. तोंडावर हसू आणत त्याने त्यांना निरोप दिला. शिरोळयांनी स्वत: आपल्याला ह्या प्रकरणात लक्ष घालायला सांगितलं याचे त्याला नवल वाटले. त्यांना ह्या प्रकरणात विशेष आणि तातडीचा रस असावा. एरवी असली कामे त्यांची माणसे येऊन करत असत. प्रतिमा येऊन सांगून गेली होती तेच हे प्रकरण बहुधा होते. त्याने डेप्युटी कलेक्टरकडून ती सर्व कागदपत्रे मागवून घेतली.

प्रतिमाने कागदपत्रे स्पष्ट बनवली होती. जमीन मिळालेल्या माणसांची नावे, त्यांचे उत्पन्न, मागास जातीचा दाखला, जमिनीचा नकाशा इत्यादी. आपल्यावर अन्याय होतो आहे असं त्या लोकाचं एक लेखी निवेदन. त्याने शिरोळयांचीही पत्रे पाहिली. त्यांची बाजू ही स्पष्ट होती. ग्रामीण भागात सार्वजनिक संस्थेला कॉलेज काढण्यासाठी प्रोत्साहन देण्याचे सरकारचे धोरण होते. जुन्या कॉलेज शेजारची ही जागा त्यासाठी सोईची आणि आवश्यक होती. जी जमीन पूर्वी दिलेली होती ती ते विकत घेणार होते. उरलेली सरकारने कॉलेजला ग्रँट करावी अशी त्यांची मागणी होती. शिरोळयांच्या

पत्रांच्या प्रती चीफ सेक्रेटरी आणि विभागीय कमिशनर यांच्याकडे पाठवल्या होत्या.

प्रश्न गुंतागुंतीचा होता. त्यावर लगेच काय निर्णय घ्यावा ते कलेक्टरला कळलं नाही. काही तांत्रिक शेरे मारून त्याने ते प्रकरण खालच्या प्रांत ऑफिसरकडे पाठवून द्यायला सांगितलं. त्याचा रिपोर्ट आल्यानंतर मग जरूर पडली तर काही निर्णय घ्यावा असं त्याने ठरवलं. कामाच्या इतर घाईगर्दीत मग तो नेहमीप्रमाणे गुंतून गेला.

परंतु काही दिवसांनी सोनेवाडीच्या हरिजनांचा एक लहानसा गट त्याला भेटायला आला. प्रतिमा सोबत होती. इतर काही बोलण्याअगोदर प्रतिमाने त्याला स्थानिक वर्तमानपत्राचे एक कात्रण दाखवले. ती जाहीर नोटीस होती. शिरोळे एज्युकेशन सोसायटीने त्या सगळ्या लोकांना दिलेली. तेवढ्या नोटीशीभोवती लाल शाईने खुणा केल्या होत्या. तो खुणा केलेला भाग त्याला दाखवत प्रतिमा म्हणाली,

"ही नोटिस परवाच्या पेपरमध्ये आली आहे. त्यात असं म्हटलंय की ह्या लोकांनी आपल्या जमिनीबाबत कुणाशीही व्यवहार करू नये. एज्युकेशन सोसायटी ही जमीन मिळण्याबाबत उच्च पातळीवर प्रयत्न करत आहे. तो पर्यन्त, त्यांच्याशिवाय इतर कोणीही त्या जमिनीवर कर्ज वा गहाण वा खरेदी व्यवहार करू नये."

कलेक्टरने नोटिस वाचली. कायदेशीर घडामोडी सुरू झाल्याचे ते चिन्ह होते. त्याचं वाचून झाल्यावर प्रतिमा पुढे म्हणाली,

"ही आता यांची नवीन खेळी सुरू झाली आहे. एका बाजूला त्यांचे लोक रोज गावात येऊन जमीन विकत द्या असे म्हणत आहेत. दुसऱ्या बाजूला ह्या कायदेशीर धमक्या. तुमच्याकडे त्यांनी अर्ज केलेच असतील. हळूहळू गावातही त्यांचे दडपण वाढायला लागले आहे."

"तुम्ही सगळे त्या जमिनीवरच रहाता का?" कलेक्टरने त्यांच्यापैकी एकाला विचारले.

"होय, साहेब. आम्ही शेतीवरच रहातो."

"ही जमीन मिळण्याअगोदर तुम्ही काय करत होता?"

"काही नाही साहेब. हेच हातावरचं पोट. मोलमजुरीशिवाय दुसरं काय करणार?"

"गेल्यावर्षी पीक काढलंय का तुम्ही?"

"होय, सायेब. जवारी घेतली होती. तलाठ्याकडे नोंद बी झाली आहे." पागोटे घातलेला माणूस हात जोडत म्हणाला.

कलेक्टर काही वेळ कागद पहात विचार करू लागला. काय सांगावे त्याला समजत नव्हते.

"ह्या बाबत निर्णय घ्यायला थोडासा वेळ लागेल." तो सर्वांना उद्देशून म्हणाला. "आम्ही याची चौकशी करू. मी खालच्या लोकांना तसे आदेश दिले आहेत. त्या नंतर जे काय ठरेल ते तुम्हाला कळवण्यात येईल."

"आम्ही गरीब माणसं आहोत सायेब. आमच्यावर दया करा." एक जण परत हात जोडत म्हणाला, "ही जमीन गेली तर भुकं मरू आम्ही."

कलेक्टरला त्याला पढवून आणल्यासारखे वाटले. त्याने हातानेच त्याला थांबवण्याचा इशारा केला.

"ठीक आहे. मला माहित आहे ते." तो निरोप देण्याच्या स्वरात म्हणाला, "तुमच्या म्हणण्याची योग्य ती दखल आम्ही घेतली आहे. त्याबद्दल काळजी करू नका."

ती माणसे गेल्यावर त्याने डेप्युटी कलेक्टरला बोलावले. त्याला समोर बसायची खूण करत तो म्हणाला,

"ह्या प्रकरणाचं काय झालं?"

"खाली पाठवलं आहे साहेब ते."

"तुमचं काय मत आहे?"

"लगेच सांगता येणं कठिण आहे साहे," तो चाचरत म्हणाला, "हा थोडासा नाजूक आणि गुंतागुंतीचा प्रश्न आहे."

"प्रांताकडून रिपोर्ट आला का?"

"नाही साहेब, अजून आला नाही, पण...."

"काय? पण काय?"

"आपले प्रांत ऑफिसर जाधव, आप्पासाहेब शिरोळ्यांचे जावई आहेत."

"व्हॉट?" कलेक्टर आश्चर्याने उद्गारला.

"होय साहेब, चार वर्षापूर्वी शिरोळ्यांच्या दोन नंबरच्या मुलीचं जाधव साहेबांशी लग्न झालं. त्यावेळी ते उस्मानाबाद जिल्ह्यात होते. नंतर आप्पासाहेब शिरोळ्यांनीच त्यांची इकडे बदली केली."

ही माहिती कलेक्टरला अनपेक्षित आणि धक्कादायक होती. प्रांत ऑफिसर शिरोळ्यांचाच जावई! त्याच्या मनात आता शंकेची पाल चुकचुकली. हे प्रकरण त्याला वाटले तेवढे सोपे जाणार नव्हते. त्याच्या प्राथमिक

समजुतीप्रमाणे ह्या प्रकरणात प्रतिमाची बाजू सरळ आणि सत्य होती. हरीजनांच्या जमिनी काढून कॉलेजला देण्याचे काही कारण नव्हते. कॉलेजला दुसरी जमीन देता आली असती. आणि ही गोष्ट सूर्यप्रकाशाइतकी स्वच्छ असल्याने तसाच रिपोर्ट खालून येईल अशी त्याची अपेक्षा होती. आणि मग त्यावर केवळ सही करून त्याला स्वतःची जबाबदारी कमी करता आली असती. आता प्रांत ऑफिसर तसा निर्णय देणे अजिबात शक्य नाही हे त्याला कळून चुकले.

प्रतिमा येऊन गेल्याबद्दल सोनिया पुन्हा जेवताना काही बोलेल अशी त्याची अपेक्षा होती. पण ती त्या बद्दल काही म्हणाली नाही. कदाचित प्रतिमा घाईच्या वेळेत येऊन गेल्याने तिला कळले नसावे. त्या ऐवजी तिने वेगळीच गोष्ट त्याला सांगितली.

"उद्या मला एक सोशल फंक्शन आहे." ती म्हणाली.

"कसलं?"

"रोटरी क्लब गुलाबांचं प्रदर्शन भरवणार आहे. त्याचे उद्घाटन माझ्या हस्ते आहे."

ते ऐकल्यावर कलेक्टर मनापासून खळखळून हसला.

"हसायला काय झालं? मला आवड आहे सामाजिक कार्याची."

"हो. आहे ना. चांगलं आहे ते! गुलाब प्रदर्शनाची उद्घाटनं करण्यापलीकडे तू दुसरं काय करणार? फार मोठं सामाजिक कार्य आहे ते. जरूर जा तू."

सोनियाची ती कल्पना ऐकून त्याचे मन नकळत सोनियाची आणि प्रतिमाची तुलना करू लागले. त्यांचे लग्न होऊन चार वर्षे झाली होती. त्यांना अद्याप मूलबाळ नव्हते. सोनिया रूपवान होती. मध्यम उंचीची, सडसडीत, पांढुरका फिकट रंग, पातळ लालसर ओठ. तिचेही वडील आय. ए. एस. अधिकारी होते. त्यांचं लग्न म्हणजे दोन मोठ्या घराण्यांचा संबंध होता. एकाच वातावरणात वाढल्याने कलेक्टरच्या आयुष्याशी जुळवून घ्यायला तिला त्रास पडला नव्हता. मोठ्या अधिकाऱ्याची बायको म्हणवून मिरवून घ्यायला तिला आवडे. बाहुलीसारखी नटून ती त्याच्याबरोबर निरनिराळ्या समारंभांना जाई. शिष्टाचार सांभाळे. त्याची आणि त्याच्या पदाची अदब ठेवी.

पण प्रतिमाच्या अंगच्या सोनसळी, फुलार उत्साहाचा लवलेशही तिच्यामध्ये नव्हता. सौंदर्याच्या रूढ कल्पनांप्रमाणे ती कदाचित सुंदर वाटली असती, पण प्रतिमाच्या सगळ्या व्यक्तिमत्त्वात एक बेभान आकर्षकता होती. ती उंच आणि रसरसून भरलेली होती. खेड्यापाड्यात उन्हात हिंडल्यामुळे तिची त्वचा रापली होती आणि मूळच्या गोऱ्या रंगावर एक तांबूस झाक आली होती. तिच्या सगळ्या शरीरातून उत्साहाचे एक गरम कारंजे सदैव उसळत राही. त्या वर्षावात तिच्या भोवतालची माणसे चिंब भिजून जात. आपल्या निरोगी, टवटवीत शरीराला हेलकावे देत ती जेव्हा बोलू लागे, तेव्हा कलेक्टर बांधल्यासारखा होई. तिचे डोळे आवेगाने लकाकत. ऊर्मीचे, आवेगाचे काचेरी झोत त्यातून बाहेर पडत. आणि निर्मळ प्रसन्नतेचे एक हवेहवेसे आवरण सभोवार पसरे.

प्रतिमाच्या मैत्रीत आपण कसे वहात गेलो ते कलेक्टरला कळले नव्हते. पण त्या प्रवाहात ते आता फार पुढे आले होते. आणि औपचारिकता, परकेपणा काहीच राहिला नव्हता. त्याला ऑफिसमध्ये काम फार असे. आणि मोकळा वेळ फार कमी मिळत असे, म्हणून मधून मधून होणाऱ्या लहानशा भेटींवरच त्यांना समाधान मानावे लागे. पण त्यांच्या तारा इतक्या सहजतेने जुळल्या होत्या की त्या लहानशा भेटींतूनच स्नेहाचे उबदार अस्तर त्यांनी विणले होते.

सोनेवाडीच्या जमिनीचे प्रकरण सपाट्याने गुंतागुंतीचे होत गेले. शिरोळ्यांना घाई होती. एज्युकेशन सोसायटीचे प्राचार्य आणि इतर माणसे दोन तीन वेळा कलेक्टरला भेटून गेली. जमीन जितक्या लवकर त्यांच्या हातात पडेल तितके त्यांना हवे होते, पुढच्या वर्षी बिल्डिंग बांधून कॉलेज सुरू करायचे होते. कलेक्टरने लवकर निर्णय द्यावा अशी त्यांची आग्रहाची विनंती होती.

त्यानंतर स्वतः शिरोळेही पुन्हा भेटीला आले. त्यांनी सोनेवाडीचा विषय उघडपणे काढला.

"कलेक्टर साहेब, आमचं काम करण्यात अडचण काय आहे?" ते नेहमीच्या शांत स्वरात म्हणाले

"ती जागा सरकारने हरिजनांना देण्यासाठी ठेवली आहे. त्यातली निम्मी तर देऊनही टाकली आहे. बाकीची देण्याबाबत कामकाज चालू आहे. तीच जागा कॉलेजला कशी द्यायची?"

"ते सगळं आम्हाला माहीत आहे, कलेक्टर साहेब.

आम्ही त्यांची जमीन विकत घेऊ. त्यांना केवढा तरी भाव मिळेल बाकीच्यांना आपण तिथून जवळचीच जागा देऊ. शिवाय ज्यांच्या जमिनी आम्ही घेऊ त्यांच्या घरटी एका माणसाला आम्ही कॉलेजात नाही तर कारखान्यात नोकरी देऊ. शेवटी ते आमच्याच भागातले लोक आहेत. त्यांचं अकल्याण करावं असं आम्हाला कसं वाटेल ? ''

" पण कॉलेजला तरी हीच जागा का हवी आहे ? '' कलेक्टर आपला मुद्दा न सोडता म्हणाला.

" ह्याचं कारण साधं आहे साहेब " शिरोळेही शांतपणे उत्तरले. " ह्या जागेशेजारीच आमचं सायन्स कॉलेज आहे. त्याची सगळी साधनसामुग्री, तुमचं ते इन्फ्रास्ट्रक्चर-तिथं आहे. पटांगण, पाण्याची टाकी, मुलांचं होस्टेल सामायिकपणे वापरता येईल. ही जागा रस्त्यावर एस. टी. स्टँडपासून जवळ आहे. मुलांना, त्यांच्या पालकांना येण्या-जाण्यासाठी सोईची आहे. कॉलेज कुठं तरी डोंगरात काढून कसं चालेल ? सगळ्यांचीच सोय होणार आहे म्हणून म्हणतो आम्ही.''

हे त्यांनी कलेक्टरला इतक्या शांतपणे समजावून सांगितलं की त्यात काही वावगं आहे असं वाटू नये. कलेक्टरला चटकन् काही म्हणता येईना. त्याच्या प्रत्येक प्रश्नाला जणू त्यांच्याकडे उत्तर होतं.

" ठीक आहे.'' तो कसाबसा म्हणाला, " मला वाटतं, मी प्रत्यक्षात एकदा पाहून यावं. त्याशिवाय काही ठरवता येणार नाही.''

" चालेल ना साहेब. जरूर या. आपल्या भेटीची वेळ कळवलीत तर मी स्वतः हजर राहीन त्या वेळी.'' ते अगदी नम्रपणाने म्हणाले.

" नको. मी स्वतःच कधी तरी पाहून येईन.'' तो म्हणाला.

" चालेल. तरी हरकत नाही. फक्त काहीतरी लवकर निर्णय घ्यावा अशी विनंती आहे.'' ते नेहमीप्रमाणे हात जोडून, उठत म्हणाले.

दुपारी प्रतिमाचा फोन आला.

" मेनी हॅपी रिटर्नस् ऑफ दी डे '' ती पलीकडून म्हणाली.

" कशाबद्दल ? ''

" विसरलात ? आठवा पाहू.''





अनुक्रमणिका








कलेक्टरने काही वेळ डोक्याला ताण दिला. पण त्याला काही लक्षात येईना. त्याचा स्वतःचा वाढदिवस त्या दिवशी नव्हता.

"नाही बुवा. सॉरी. काही लक्षात येत नाही."

"छे! काय पण आठवण आहे! आपली ओळख होऊन आज बरोबर वर्ष झाले. चवदा मे. आठवतंय का? या दिवशी आपली पहिली ओळख झाली होती."

"ओ हो!" तो एकदम म्हणाला, "मग असं लांबून काय? इकडे ये ना!"

"नको. आता दोन वाजायला आले. तुमच्याकडे व्हिजिटर्स यायला लागतील."

"व्हिजिटर्स कॅन वेट. मी वाट पहातो. कम् डायरेक्टली."

प्रतिमा आली. सस्मित. एक गेंदेदार पिवळ्या-धमक गुलाबाचे फूल घेऊन.

"आजच्या दिवसाकरता." ती त्याच्या डोळ्यात डोळे मिसळत म्हणाली.

त्याने गुलाब आपल्या पेन स्टँडमध्ये खोवून ठेवला. उभे राहून, काही क्षण तिचे हात हातात घेत तो म्हणाला,

"ग्रिटिंग्ज. इन द नेम ऑफ अवर फ्रेंडशिप"

प्रतिमानं हलकेच आपले हात सोडवून घेतले. हाताच्या तळव्यात हनुवटी टेकवून त्याच्याकडे पहात ती खुर्चीत बसली.

"माझ्या खरंच लक्षात नव्हतं." तो पुढे म्हणाला.

"हूं. तुम्ही काय जिल्ह्याचे राजे. कामाच्या गडबडीत कशाला लक्षात राहील!"

"वाटत नाही. खरंच, एक वर्ष झालं आपली ओळख होऊन? किती भर्रकन दिवस गेले. मला तर तू आत्ताच प्रथम भेटल्यासारखी वाटते आहेस."

प्रतिमा काहीच बोलली नाही. तिचे मधुर डोळे त्याला कुरवाळत राहिले. काही वेळ तोही तिच्याकडे डोळे भरून पहात राहिला.

"तू आलीस की फार बरं वाटतं." तो म्हणाला, "सगळा दिवस प्रसन्न होऊन जातो. नाहीतर सारख्या त्याच फाईली, तीच माणसे, तेच जमिनीचे खटले. अगदी कंटाळवाणं असतं सगळं. फार शीण होतो डोक्याला. तू रोज का येत नाहीस? ह्यापेक्षा दुप्पट काम करीत जाईन मी."

प्रतिमाचे ओठ कापल्या अंजिरासारखे विलग झाले. ती मंदपणे हसत म्हणाली; "छे! कदाचित काहीच काम होणार नाही."

"होय. कदाचित काहीच काम होणार नाही," तिने दिलेला गुलाब हलक्या हाताने हुंगत तो म्हणाला, "वट यूवर फ्रेंडशिप हॅज गिव्हन मी स्ट्रेंग्थ. नाहीतर एरवी ह्या शहरात, ह्या जिल्ह्यात दुसरं काय आहे? तू आहेस म्हणून इथं रहाण्यात अर्थ."

"पुरे. मी चलते. लोक यायला लागतील."

"थांब, ग! पाच मिनिटं तरी झाली का तुला येऊन? कुठली तरी, भलभलती माणसं माझा या पेक्षा जास्त वेळ घेतात, तू गेल्यावर पुन्हा तेच सुरू होईल. थांब, थोडा वेळ."

प्रतिमा थांबली. तिच्या अंगावर मोठमोठ्या केशरी फुलांची साडी होती. नेहमी सारखाच बिनबाह्यांचा ब्लाऊज. ती खुर्चीत बसली तेव्हा सबंध केबीनमध्ये फुलांचा एक भव्य ताटवा आणून ठेवल्यासारखं वाटू लागलं. पुन्हा त्यांनी जुन्या आठवणी काढल्या. त्यांच्या पहिल्या भेटीच्या. त्या नंतरच्या मैत्रीच्या. स्नेहाच्या.

"दिल्लीला येणार का परत?" त्याने नंतर विचारले,

तो प्रश्न ऐकताच प्रतिमाच्या चेहेऱ्यावरचे भाव झरझरा बदलले. क्षणार्धात तिचे गाल आणि कानाच्या पाळ्या लाल झाल्या. त्या आठवणींनी कलेक्टरच्या धमन्यांमधूनही गरम रक्त उसळ्या मारून दौडू लागले. प्रतिमानं त्याची नजर चुकवली. पदराशी चाळा करत ती खाली बघत बसून राहिली.

परंतु इंटरकॉम वाजला. त्यांना असे कोणी बसू देणार नव्हेते. उठताना प्रतिमा म्हणाली.

'ते सोनेवाडीचं लक्षात आहे ना? शिरोळ्याकडनं हालचाली सुरू झाल्यात. तहसीलदार आणि प्रांत काही खरं सांगतील असं मला वाटत नाही. आम्ही पूर्णपणे तुमच्यावरच अवलंबून आहोत."

"ह्या वेळीही त्या गोष्टी बोलल्या पाहिजेत का?"

"मला राहवत नाही," ती काहीशा व्याकूळ स्वरात म्हणाली, "ते लोक इतके असहाय्य आहेत. शिरोळ्यां-पुढे पार चिरडून जातील ते. माझ्यावरच सगळा भरवसा आहे त्यांचा. मी त्यांना विश्वास दिलाय, तुम्ही आहात तोवर असं काही होणार नाही म्हणून."

कलेक्टर अधिकच बेचैन झाला. त्याने पहिला व्हिजिटर आत बोलावला. मग दुसरा, नंतर तिसरा. पण दिवसभर त्याचे कामात लक्ष लागले नाही.

कमिशनरसाहेबांचा दौरा आला. त्यांनी मुख्यत्वे करून दुष्काळी परिस्थितीसाठी केलेली कामे पाहिली. दोन-तीन गावांच्या पाणी पुरवठा योजना स्वत: पाहिल्या. कलेक्टरने घेतलेल्या स्टेप्स त्यांना आवडल्या. बैठकीत त्यांनी तोंड भरून त्याची स्तुती केली. जेवतांना सहज विचारल्यासारखं ते म्हणाले,

"ते, आप्पासाहेब शिरोळ्यांचं काय काम आहे? कॉलेजला जमीन हवी आहे ना त्यांना?"

"होय, खरं."

"मग? कशात अडलंय? करून टाका ते?"

"सर, ते जी जमीन मागत आहेत ती आपण हरिजनांसाठी राखून ठेवली आहे. त्यातली निम्मी तर देऊनही टाकली आहे. त्या लोकांनी त्यावर कर्ज काढून पाणी पुरवठा योजनाही सुरू केली आहे."

"सो व्हॉट? ह्या काही अडचणी नव्हेत. त्यांना दुसरी जमीन देता येईल. शिरोळ्यांना मदत करायला सांगू."

"पण सर, त्या लोकांना...."

"आय नो, आय नो." ते कलेक्टरला अर्ध्यात थांबवीत म्हणाले, मला कळलंय तुम्हाला काय म्हणायचं आहे ते. पण शिरोळे काय माणूस आहे ते तुम्हाला माहित आहे ना? आपण त्यांच्या तोंडाला लागू शकत नाही. ह्या देशात खरं राज्य तेच करतात. आपण नुसते हुजरे आहोत त्यांचे."

"सर, पण ते सगळे गरीब लोक आहेत. त्यांच्यावर धडधडीत अन्याय होईल हो."

"न्याय अन्यायाची भाषा आपल्यासारख्या ऑफिसरांनी करायची नसते. तुम्ही तुमचे करीअर सांभाळा. हा देश असल्या कल्पनांवर चालत नाही. राज्यकर्त्यांची मर्जी नोकरांना सांभाळावी लागते. यू आर ए सिव्हिल सर्व्हंट. तुम्ही नाही म्हणालात म्हणून शिरोळ्यांना ती जमीन मिळण्याचं थांबणार आहे का? लॉ ग्राईंडस पुअर ॲन्ड रिच रूल द लॉ. माहित आहे ना तुम्हाला? करून टाका त्यांचं काम. मला परवा चीफ सेक्रेटरीचा फोन आला होता."

कमिशनर साहेब सांगत होते त्या कल्पना कलेक्टरला नवीन नव्हत्या. आपल्या प्रशासकीय कारकीर्दीत त्या खरं तर त्याच्या चांगल्या अंगवळणी पडल्या होत्या. राज्य करायचे झाले तर श्रीमंतांना खूष करत आणि गरीबांना दडपत रहावे लागते. एवढा धडा तोही शिकला होता, एरवी अशा केसमध्ये एवढा विचार त्याने केलाच नसता. शिरोळ्यांना कधीच जमीन देऊन टाकली असती पण इथे... पण इथे...

निर्णय घेता येणं अशक्य झालं तसं तो ते काम लांबणीवर टाकू लागला. नंतरचे काही दिवस तो ऑफिसमध्ये थांबलाच नाही. त्याने सलग दौरे आखले. एका तालुक्यातून दुसरीकडे, दुसरीकडून तिसऱ्याकडे. पण फार काळ असे करता आले नाही. शेवटच्या तहसील ऑफीसचं इन्स्पेक्शन करून तो परत निघाला. त्याने इतके दिवस दुसऱ्या कामात मन गुंतवले खरे, पण सोनेवाडीचा विषय डोक्यातून जाता जात नव्हता. आता परत हेडक्वार्टरला निघाल्यानंतर तो परत उफाळून वर आला. गाडीच्या सीटवर मान मागे टाकून तो अस्वस्थपणे बसून राहिला. गाडीत ड्रायव्हर शिवाय दुसरे कुणी नव्हते. सोबतही कुणाच्या गाड्या नव्हत्या. विचार गिरमिटासारखे डोके पोखरू लागले.

कुठल्यातरी फाट्यापाशी डायव्हरने गाडीचा वेग कमी केला. गियर बदलत तो म्हणाला, "साहेब, कुठल्या रस्त्याने जायचं? इथून दोन रस्ते फुटतात."

"अं? कुठला चांगला आहे? लवकर कशानं जाता येईल?"

"साहेब. एक रस्ता दर्यापूर, नांदगाव असा बाभुळगाववरून जातो. तो जवळचा आहे, पण मध्ये मध्ये खराब आहे. दुसरा सोनेवाडी, सरळगाव असा जातो- तो लांबचा आहे, पण बरा आहे."

"सोनेवाडी! साखर कारखान्याची!" कलेक्टरने चमकून विचारले.

"होय साहेब. तीच! तिथूनच जातो तो."

"ठीक आहे. तिकडून घे. सोनेवाडी कॉलेजपाशी उभी कर. मला तिथं जरा इन्स्पेक्शन करायचं आहे."

गाडी पुन्हा भरारत पळू लागली. कलेक्टर मागे पळत जाणारे बदलते चित्र पाहू लागला. मधून मधून दिसणारे उसाचे सलग पट्टे. पाण्याचे वाहते पाट. ऊस तोडणीला चाललेले मजुरांचे तांडे. मोटर सायकलींचा कर्कश आवाज. बीयर-बारच्या पाट्या. मळीचा उग्र वास. चिमण्यातून उडणारे धुराचे काळपट लोट.

काही वेळाने ड्रायव्हरने कॉलेजजवळ गाडी आणली. कलेक्टरने ती रस्त्याच्या कडेला उभी करायला

सांगितली. खाली उतरून तो सभोवार पाहू लागला. प्रतिमानं वर्णन केल्याप्रमाणेच सगळा परिसर होता. एका बाजूला सायन्स कॉलेजची इमारत. दुसऱ्या बाजूला लेफ्ट बँक कॅनाल. त्या दोहोंच्यामध्ये जमिनीचा पाच पंचवीस एकरांचा तुकडा पसरला होता. बरीच शेते नांगरून तयार होती. दोन तीन तुकड्यांमध्ये कुणी कुणी नांगर धरले होते. एका बाजूला, कोपऱ्यात शेतकऱ्यांच्या लहान लहान झोपड्या उभ्या होत्या. कलेक्टर तिकडे चालू लागला. मध्येच एकदा खाली वाकून त्याने शेतातली माती उचलून पाहिली. ती काळीभोर आणि मऊ होती.

तो झोपड्यांपाशी पोहोचला. सुरवातीला तिथे दोघेतिघेच जण होते. सात-आठ लहान मुलं खेळत होती. आपण कोण हे त्यानं सांगितलं नाही. पण ड्रायव्हर बोलून गेला. मग काही वेळातच भराभरा शेतातली माणसं त्याच्या भोवती गोळा झाली. कुणीतरी घरातली बाज आणून बाहेर टाकली. दुसऱ्यानं त्यावर घोंगडी पसरली. पण तो त्यावर बसला नाही. उभ्या उभ्याच सगळा आसमंत न्याहाळत तो म्हणाला,

"ही किती जमीन आहे. तुमच्या सगळयांची ?"

"साहेब, छत्तीस एकर आहे साहेब."

"आणि तुम्ही कुटुंबे किती ?"

"सगळे मिळून आम्ही सव्वीस जण आहोत,साहेब."

"सगळयात जास्त जमीन कुणाला आहे ?"

"ती ह्याला आहे, साहेब," उत्तर देणारा दुसऱ्या एकाला पुढे आणत म्हणाला, "तीन एकर."

"सगळयांची जमीन नावावर झाली आहे का ?"

"काहींची झाली आहे साहेब. काहींची राहिली आहे. तसा हुकूम निघाला आहे. पण अजून नोंद नाही झालेली."

"अस्सं ! तुम्ही कर्ज काढून कोणती योजना केली आहे ?"

"साहेब, त्या कॅनालवर मोटर बशीवली आहे. तिथून पाईपलाईन करून ही जमीन भिजवतो. हंगामी पाणी मिळतं साहेब."

"त्ये बी आता नाही मिळत," दुसरा एकजण मध्ये म्हणाला, "पुढारी पानी बंद करायला लागल्यात. तिकडं कॉलेजमधं पाण्याचा नळ रात्रंदीस मोकळा असतोय. आम्हाला दोन महिन्यातून एक डाव पाणी भेटतं."

"गेल्या वर्षी काय काय घेतलं होतं तुम्ही ?"

"जवारीच साहेब, दुसरं काय? काहींनी हिवाळ्यात भुईमुग घेतला."

"सगळ्यांनी का नाही भुईमुग घेतला ?"

"भांडवल पाहिजे ना साहेब. खताला नि पाण्याला आधी पैसा गुंतवावा लागतो. त्यो कुठून आनायचा ?"

"ह्या जमिनीऐवजी सरकारने तुम्हाला दुसरी जमीन दिली तर ? ह्या पेक्षा जास्त पाच-पाच एकर."

"नाही साहेब, ह्या संबंध पंचवीस गावच्या शिवारात आता मोकळी जमीन नाही. त्यो पलीकडचा डोंगर आहे. उघडा. त्योच फक्त बाकी आहे. तीच जमीन आम्हाला द्यायचं चाललं होतं. त्या डोंगरावर सगळा खडूक आहे साहेब, जवारीचा दाणा पेरायचा झाला तर तुमचं ते मशीन मारून खड्डा घ्यावा लागेल."

"पाच एकर काय साहेब, पन पन्नास एकर बी दिलीत तरी काही उपेग व्हायचा नाही," दुसरा म्हणाला.

"ह्या जमिनीचा कॉलेज तुम्हाला चांगला भाव देईल. तुम्हा साऱ्यांच्या मुलांना नोकऱ्या लावतील ते."

"नाही, साहेब. आमचा त्यांच्यांवर अजिबात इश्वास नाही." तो माणूस कळवळून म्हणाला, "ह्ये शेजारचं कालीज दिसतंय ना ती जमीन बी आमच्याच समाजाची आहे. तवा बी ये असंच म्हणाले. फक्त दोन दोन हजार रुपये दिले आणि फक्त तीन पोरांना कामाला लावलं. त्ये बी हेल्पर म्हणून. पूर्वी बी असंच तीन-चारदा झालंय. ही गावाबाहेरची समदी जमीन आमच्या कडनंच काढून घेतल्याली आहे."

कलेक्टर मूक झाला. ते लोक सांगत होते ती गोष्ट खरी असावी असंच सगळं दृश्य दिसत होतं. त्या लोकांचे चेहेरे, त्यांच्या अंगावरचे कपडे, त्यांची सुरकतलेली शरीरे, मोडकी घरं. त्यावर आणखी काही विचारायची गरज नव्हती. सभोवार समृद्धीचा धूर निघत होता आणि त्या मधोमध हे दारिद्र्याचे बेट कलेक्टरला खुणावीत उभे होते. तेवढ्यात कुणीतरी चहा आणला. तो घेत असताना त्याने परत विचारले,

"ही तुमची घरं मोडली कशाने ?"

"मोडल्याली नाहीत साहेब, ती तशीच आहेत. पाचराशिवाय वर दुसरं काही मिळत नाही."

"तुमच्यापैकी किती लोकांकडे दारिद्र्य रेषेची कार्डे आहेत ?" पहिल्यांदा त्या लोकांना काही कळलं नाही. मग एक तरतरीत मनुष्य म्हणाला, "फक्त आठ-दहा

जणांकडे आहेत साहेब."

"आमाला का न्हाई मिळाली ?" दुसऱ्या एकानं लगेच विचारले.

"ती कार्ड जे अगदी गरीब असतात त्यांनाच मिळतात." कलेक्टर म्हणाला. हे ऐकल्यावर ती माणसं आपापसात हसली.

"काय झालं ?" त्याने विचारले.

"न्हाई सायेब," मघाचा माणूस परत म्हणाला, "त्यो पलीकडचा उस दिसतोय का? त्या धन्याचा पंधरा-ईस एकर ऊस हाये. गावात धान्याचं दुकान हाये. दोन्ही पोरांना फटफऱ्या हायेत. त्याच्या जवळ तुमचं ह्ये गरीबीचं कार्ड हाये. मागच्या महीन्यात त्यानं त्या कार्डावर प्रकरण करून पाईपलाईन केली."

कलेक्टरला आपल्या मुस्कटात मारल्यासारखे वाटले. तो काहीच बोलला नाही.

"सायेबा, तुजं राज्य लई इपरीत हाये," एक म्हातारा थरथरत्या आवाजात म्हणाला. "तुज्या राज्यात गरीबी लागंल त्याला इकत मिळती. दोनशे रुपयं दिलं की गरामसेवक आणि बीडीओ सायेब तसलं कार्ड इकत देतात. आता आम्ही गरिबी इकत घ्यायला बी, त्ये पैसे कुटनं आणायचं ?"

कलेक्टरचं मत शरमेनं भरून आलं. त्यानं खिशातून लहान डायरी काढली आणि त्यात नोंद करून घेतली. तिथं आता फार वेळ उभं रहावेना. तो निघतो असं म्हणाला.

"साहेब, तुम्ही आमच्यासाठी कायतरी करा. हे खासदार साहेब आमच्या जमिनीवर डोळा ठेवून आहेत. तौ फार भारी मानसं आहेत. आम्ही त्यांना कुठवर पुरं पडणार ?"

"सायेब, आता कुटं आम्हाला दोन दिस बरे दिसूं लागल्यात. परत आमची जिमिन गेली तर माती खावी लागंल आम्हाला. कुनाचा आधार न्हाई. फकस्त ती परतिमाबाई येती. तिच्या शिवाय आमाला ऐन न्हाई."

"ते कितीही मोठे असले ना साहेब तरी आम्ही ठरवलंय." आधीचा तरतरीत माणूस कलेक्टरबरोबर चालत म्हणाला, "ही जमीन सोडायची नाही. आमचं रक्त सांडलं तरी हरकत नाही. प्रतिमाबाईनं आणि आम्ही ठरवलं आहे जे लागंल ते करायचं. पार पुण्या-मुंबईला जाऊ आम्ही. तुरुंगात जाऊ, पण त्यांना ही जमीन देणार नाही."

त्या सर्वांना नमस्कार करून कलेक्टर गाडीत येऊन बसला. गाडी पुन्हा शहराच्या दिशेने धावू लागली.

संध्याकाळी चहा घेता घेता सोनियानं अचानक विचारले.

"दिल्लीचा सेमिनार कसा काय झाला ?"

"सेमिनार ? कधीचा ?"

"तो ! गेल्या नोव्हेंबर महिन्यात नव्हता का गेला तुम्ही दिल्लीला ?"

'नोव्हेंबर ? ओह ! त्याला तर आता सहा महिने होऊन गेले. त्याचं आता काय ?"

"नाही, कसा झाला तो ?"

"चांगला झाला ? का ?"

"प्रतिमाला नेलं होतं म्हणून चांगला झाला असेल !"

कलेक्टरच्या मणक्यामधून एक थंड शिरशिरी उमटून गेली. हिला हे अचानक कसे कळलं ?'

"व्हॉट डू यू मीन वाय नेलं होतं ?" तो काहीशा रागाने म्हणाला. "तिला वेगळं निमंत्रण होतं म्हणून आली होती ती."

"तेच ते. ठरवूनच गेला असाल ना पण. एकत्र होतात की चांगले चार दिवस."

"तुला काय म्हणायचंय काय ?"

"मी काय म्हणणार ? मी एवढंच विचारलं, प्रतिमा सोबत होती म्हणून चांगलं वाटलं का ? तिकडे काय केलं कुणास ठाऊक. तरीच तुमची एवढी मैत्री जमली."

"शट अप !" कलेक्टर संतापाने ओरडला. त्याच्या अंगाची लाही लाही झाली. "व्हॉट नॉनसेन्स आर यू टॉकींग ?"

सोनिया गप्प बसली. छद्मीपणानं आपले ओठ मुडपत. कलेक्टरने रागावून तिचे तोंड बंद केलं. पण मनातून तो एकदम दचकून गेला. सोनियाला हे सगळं कसं कळलं ? तिला हे माहिती होईल अशी त्याची अपेक्षा नव्हती. ऑफिसच्या, कामाचा भाग म्हणून जातो असं त्यानं सांगितलं होतं. प्रतिमा आपल्या सोबत होती हे तिला कसं कळलं ?

काही वेळानं त्याला आठवलं. सेमिनारमध्ये भाग घेतलेल्या सर्वांच्या नाव-पत्त्याची यादी नंतर पाठवण्यात आली होती. ती आपल्याजवळ असावी म्हणून त्याने ऑफिसातून घरी आणली. ती सोनियाला मिळाली



अनुक्रमणिका

असावी. एकाच जिल्ह्यातले म्हणून त्याचं आणि प्रतिमाचं नाव शेजारी शेजारी छापलं होतं. तेवढी गोष्ट सोनियाला पुरेशी होती.

"तुम्ही सेमिनारच्या दिवसात काय फक्त चर्चाच करत बसला होतात?" काही वेळ गप्प राहून सोनियाने परत विचारले.

पुन्हा एकदा त्याचं डोकं भडकलं. सोनियाच्या श्या हलक्या बोलण्यापुढं काय करावं ते त्याला सुचेना. तिला टोचून बोलत रहाण्याची सवय होती. त्याला वाटलं, आपण रस्त्यावरचे एखादे हमाल असतो तर किती बरं झालं असतं. हा सुसंस्कृतपणाचा बुरखा फेकून ताड ताड तिच्या दोन तोंडात उडवून दिल्या असत्या. डोळ्यांनी भाजून काढत त्याने तिच्याकडे पाहिलं. पण नंतर त्याच्या संतापाची वाफ होऊन गेली. त्याला काही बोलता आलं नाही. हताश मनाने तो सोनियासमोरून उठून गेला. त्याने, किती ही संतापाचा आणि न्यायाचा आविर्भाव केला असला तरी सोनिया म्हणत होती ते सत्य आहे हे त्याला माहीत होते.

प्रतिमाशी मैत्री जशी वाढू लागली तशा ऑफिसातल्या त्या तुटपुंज्या भेटी त्यांना अपुऱ्या वाटू लागल्या. तिथे कामाचे, माणसांच्या वर्दळीचे सतत दडपण असे. रेव्हेन्यू कचेरीच्या गंभीर उदास वातावरणात मनमोकळे बोलता येत नसे. त्या तुकड्या तुकड्यांच्या अपुऱ्या भेटीतून सहवासाची अधिकच भूक भडकत गेली. बाहेर कुठे भेटण्याची सोय नव्हती. जिल्ह्याचे गाव फार मोठे नव्हते. आणि जिल्ह्यात सगळीकडे माणसे त्याला कलेक्टर म्हणून ओळखत. त्याची खुर्ची, त्याचा हुद्दा त्याला सोडता येत नव्हता. आणि हाताखालच्या नोकर वर्गात व वर्तमानपत्रात त्याला स्वतःबद्दलची कुजबुज नको होती.

मध्यंतरी त्याला दिल्लीच्या एका संस्थेचे पत्र आले. सरकारी योजनांच्या अंमलबजावणीवर चर्चा करण्यासाठी सरकारी अधिकारी आणि स्वयंसेवी संस्था यांचा एकत्र सेमिनार त्यांनी ठेवला होता. प्रतिमाला आधी त्याचे निमंत्रण नव्हते. परंतु कलेक्टरची आयोजकांशी ओळख होती. त्याने प्रतिमाला एक निमंत्रण येईल अशी व्यवस्था केली. नंतर प्रतिमाशी संपर्क करून ती दिल्लीला येते आहे याची खात्री करून घेतली.

सोनियाचा तर्क खोटा नव्हता. चर्चा करण्यासाठी ते दिल्लीला गेले नव्हते. सेमिनारसाठी औपचारिक, आवश्यक उपस्थिती त्यांनी लावली, पण मुख्यतः एकमेकांचा सहवास त्यांनी भरभरून लुटला. सेमिनार संपल्यावर त्याने एका उंची हॉटेलात खोली घेतली. दिल्लीत त्याला कलेक्टर म्हणून कोणी ओळखत नव्हते. ती ही सामाजिक कार्यकर्ती नव्हती. लोकांच्या नजरांचा काच नव्हता. बांध फुटलेल्या पाण्याच्या लोटासारखे त्यांनी स्वतःला एकमेकावर झोकून दिले.

त्या दोन-चार दिवसात परस्परांच्या मैत्रीची एक वेगळीच उंची त्यांनी गाठली. त्या दोघांची एकमेकांबद्दलची ओढ अतिशय उत्कट होती आणि प्रत्येकजण दुसऱ्याशी मिळून जाण्यास आसुसला होता. इतके दिवस ते एकमेकांना नुसते पहात होते, भेटत होते पण आता परस्परांची ओळख पटली. प्रतिमाचा सहवास एकाच वेळी विस्तवाच्या धगीसारखा उबदार आणि रानझऱ्याच्या पाण्यासारखा निर्मळ होता. तिच्या शरीराच्या आगीतून उत्साहाचे उसळते रसायन त्याच्या रक्तात मिसळले. तिच्या मनातून स्नेहाची मधुर शांतता.

त्या दोन चार दिवसात त्यांच्यामध्ये आत्मीयतेचे नवे बंध तयार झाले. अशी तृप्ती त्याला पूर्वी कधी मिळाली नव्हती. स्त्रीने देण्यासारखे जे जे होते ते प्रतिमाने निर्मळ मनाने त्याला देऊन टाकले. कृतज्ञतेने त्या ऋणात त्याने स्वतःला बांधून घेतले. दिल्लीच्या प्रशस्त आणि भव्य रस्त्यावरून, डेरेदार झाडांच्या छायेखालून, इतिहास मग्न अवशेषातून हातात हात गुंफून हिंडत असताना स्त्री-पुरुषांच्या प्रौढ आणि उदार मैत्रीचा नवीन प्रत्यय त्याला आला. देण्यासारखे काही राहिले नाही. घेण्यासारखे ही काही नाही. त्या नंतर ते शहरात आले. सगळ्या जिल्ह्याचे ओझे त्याने परत आपल्या खांद्यावर घेतले. प्रतिमा तिच्या कामात गुंतून गेली. भेटी तुटक आणि अपुऱ्या होऊ लागल्या. पण तृप्तीने मन इतके भरून गेले होते की असोशी राहिली नाही. आपल्यात आणि प्रतिमात काही भेद आहे, द्वैत आहे असे त्यानंतर त्याला कधी वाटले नाही.

सोनियाला यातले काहीच कळले नव्हते. पण आता तिच्या हातात ती यादीच पडली. आपल्या तर्काला तिने बेलगाम सोडून दिले. सुरवातीपासून प्रतिमाबद्दल एक आकस आणि दुरावा तिच्या मनात तयार झाला होता. वरकरणी ती व्यवस्थित वागली तरी प्रतिमा तिला कधीच आवडली नव्हती. आता तर तिचे मन संशयाने भरून गेले. कलेक्टर तिला समजावू शकले नाही. त्या दिवसा-

पासून त्या दोघांमध्ये परकेपणाची एक थंडगार दरी तयार झाली.

आणि म्हणून मग, काही दिवसांनी सोनियाने एक वेगळीच भुणभुण त्याच्यामागे सुरू केली. "तुम्ही मुंबईला बदली करून घ्या. मला इथे करमत नाही. ह्या खेडवळ शहरात काय आहे?" असं ती सारखी येता-जाता म्हणू लागली. तिने हा हट्ट का धरला आहे ते कलेक्टरला समजत होते. पण उघडपणे तो प्रतिवाद करू शकला नाही.

त्याला स्वतःला मुंबई नको होती. गर्दीने, घाणीने आणि गोंगाटाने भरलेले ते शहर त्याला कधीच आवडले नव्हते. तिथे त्याला काही वावही नव्हता. कुठल्यातरी एखाद्या मंडळाचा प्रशासक म्हणून जागा मिळाली असती. एखाद्या अरुंद, कोंदट खोलीत ऑफिस थाटून लक्षावधी माणसांच्या पसाऱ्यात किड्या-मुंगीसारखे स्वतःला हरवून जावे लागले असते. जिथे रस्त्यावरून गव्हर्नर गेला काय किंवा झाडूवाला, सगळे सारखेच. जिल्ह्यात तो राजा होता. आपल्या स्थानाची आणि सत्तेची जाणीव सुखावणारी होती. हा जिल्हाही त्याला अतिशय आवडला होता. हाताखालची माणसे विश्वासू आणि आज्ञाधारक होती. बागायतीपासून दुष्काळापर्यंतचे सगळे ग्रामीण जीवन पहायला मिळत होते. कामं करायला पुष्कळ संधी होत्या. शहराला विमानतळ होता. दळणवळणाची चांगली सोय होती. उत्तम पुस्तके मिळत होती. आयुष्य शांत आणि प्रसन्न होते. हे सगळे सोडून त्याला दुसरीकडे कुठेही जायचे नव्हते. मुंबईत तर अजिबात नाही.

त्याने सोनियाला समजावण्याचा पुष्कळ प्रयत्न केला. सर्व तऱ्हेने तिला सांगून पाहिलं. तांत्रिक कारणांमुळे मुंबईत बदली अशक्यच आहे असंही सांगितलं. पण सोनिया आता ऐकायच्या मनःस्थितीत नव्हती. त्याला ह्या जिल्ह्यातून बाहेर काढायचा तिने पणच केला होता.

स्वतःला बदली करून घेणे अशक्य आहे असे त्याने सांगितल्यावर तिने एके दिवशी एक वेगळीच गोष्ट त्याला सुचवली. तो ऑफिसमधून घरी येऊन टेकतो न टेकतो, तोच ती म्हणाली,

"आज मला शिरोळेबाई भेटल्या होत्या. आप्पासाहेब शिरोळ्यांच्या मिसेस. त्यांच्या कारखान्यातर्फे बालवाडीचे उद्घाटन होते. मी प्रमुख पाहुणी आणि त्या अध्यक्षा होत्या."

"मग? त्याचं काय?"

"त्या म्हणत होत्या, कलेक्टर साहेबांच्या बदलीचं काही काम असेल तर शिरोळेसाहेब सहज करतील. कुठलीही अडचण असली तरी. टंडन साहेबांची बदली त्यांनीच करून दिली. मुंबईला पाहिजे तर मुंबईलाही मिळेल. शिरोळ्यांना एकदा सांगितलं म्हणजे झालं."

"तुला काय म्हणायचंय?"

"तुम्ही सांगा की शिरोळ्यांना. करतील आपलं काम. खूप वजन आहे त्यांचं."

हा आघात कलेक्टरला न सोसणारा होता. सोनियाला तो ओरडून म्हणाला. "मूर्खपणा बंद कर तुझा. काय करायचं ते मला चांगलं कळतं. भलत्या गोष्टीत मला सल्ला देऊ नको. आपल्या घरातल्या गोष्टी जगभर कशाला सांगत हिंडतेस? लक्षात ठेव. पुन्हा मी असलं ऐकून घेणार नाही."

पण सोनियाचा स्वभाव त्याला माहित होता. तिला समजावणीच्या गोष्टी काय सांगणार? तो मनाशी म्हणाला. आधीच्या कलेक्टर टंडनची बदली शिरोळ्यांनी केली हे प्रशासकीय वर्तुळात सगळ्यांना माहित होते. त्याला त्यांनी अशाच कुठल्यातरी मंडळावर टाकले, पण ती बढती नसून डिमोशन होते. आणि त्याची किंमत शिरोळ्यांनी वसूल केली होती. सोनियाला यातले काही समजले नाही. तिची भुणभुण चालू राहिली. ह्या सगळ्या गुंत्याने कलेक्टरचे मन छिन्नविछिन्न होऊन गेले.

दुष्काळावर उपाययोजना करण्यासाठी मोठी मिटिंग भरली. जिल्ह्याचे खासदार म्हणून शिरोळे होतेच. त्यांच्याकडून आपल्याला उलटसुलट प्रश्न विचारले जातील हे जाणून कलेक्टर फार तयारी करून गेला. त्याला प्रश्न पुष्कळ विचारले गेले. पण अनपेक्षितपणे शिरोळ्यांकडून एकही आला नाही. किंबहुना संबंध मिटिंगभर त्यांनी कलेक्टरचीच बाजू घेतली. एक दोनदा त्यांनी उघडपणे कलेक्टरच्या उपाय योजनेची स्तुती केली आणि एकदा विरोधीपक्षाचा आमदार खोचकपणे प्रश्न विचारत असता परस्पर उत्तर देऊन त्यांनी त्याला गप्प केले.

मिटिंग संपल्यावर ते त्याच्या ऑफिसमध्ये येऊन भेटले.

" आमच्या सोनेवाडीच्या कामाचं काय करताय ?" खुर्चीवर बसत ते म्हणाले.

" हो. चालू आहे नं." कलेक्टर अवघडून म्हणाला, " त्यात अडचणी आहेत."

" अडचणी काढायच्या म्हटल्या तर पुष्कळ आहेत. नाही का ? एकदा काय करायचं म्हणल्या नंतर अडचणी येण्याचं काय कारण ? "

" नाही. ते खरं. पण त्या लोकांचीही बाजू आहेच ना."

" कसली बाजू ? " शिरोळे फटदिशी म्हणाले. " आम्ही त्यांची तक्रार निवारण करायला तयार आहोत. गेल्या वेळीच नाही का मी सांगितलं तुम्हाला ! आमच्या मागणीत तुम्हाला वावगं काय वाटावे तेच मला समजत नाही."

कलेक्टरला काय उत्तर द्यावं ते कळेना. मीटिंग-मधल्या शिरोळ्यांचा वागणुकीचे आधीच एक दडपण त्यांच्यावर आले होते.

" ते लोक पार हटून बसले आहेत." तो म्हणाला. " त्यातून ते आहेत सगळे हरिजन. वर्तमानपत्राकडे वगैरे जाण्याच्या विचारात आहेत. कॉम्प्लीकेशन्स होतील शिरोळेसाहेब."

" त्याची तुम्ही कशाला काळजी करताय? ते आम्ही बघून घेऊ. वर्तमानपत्रांचं काय सांगता तुम्ही ? ह्या जिल्ह्यातला कोणताही पेपर माझ्याविरूद्ध एक अक्षरही लिहू शकत नाही. तुमच्या पुण्या-मुंबईच्या पेपरांना कोण भीक घालतंय ? त्यांचे संपादक आमचेच पित्तू आहेत. ते सोडा. कमिशनर साहेबांशी बोलणं झालं ना तुमचं ? "

" हो, ते बोलले होते."

" मग ? तुमची सरकारी कोणतीही अडचण ते येऊ देणार नाहीत. मग ? आता काय प्रश्न आहे ? "

कलेक्टर पुन्हा मूक झाला. शिरोळ्यांनीही काही वेळ शांतता पाळली. तो काही बोलत नाही असे पाहून ते पुढे म्हणाले;

" तुमच्या हातून काम का होत नाही ते आम्हाला माहीत आहे. सांगू का तुम्हाला ते ? टंडन साहेबांचं सुद्धा... ".

कलेक्टरच्या अंगातून एक गरम झिणझिणी निघून गेली. शिरोळे पुढे काय बोलणार ते झटकन त्यांच्या लक्षात आलं. टंडनचा उल्लेख केला तेव्हा तर त्याची खात्रीचं पटली. टंडनचे मिशन हॉस्पिटलमधल्या एका युरोपियन नर्सशी संबंध होते आणि त्याने आपली डिग्नीटी ठेवली नव्हती. त्यांच्या प्रकरणाची चर्चा सगळा जिल्हा मोठ्या चवीने करी. टंडनसारखा मूर्खपणा तो करणार नव्हता. आपल्या आणि प्रतिमाच्या मैत्रीचा उल्लेख त्याला या माणसाच्या तोंडून नको होता.

" मिस्टर शिरोळे, यू आर टेकिंग ॲन अननेसेसरी लिबर्टी." तो आवाज तापवत म्हणाला. " आपल्या कामाशी संबंधित असंच आपण बोला."

त्याच्या आवाजातल्या धारेनं शिरोळे काहीसे चपापले. त्यांनी तो विषय वाढवला नाही. काही वेळ आपल्या चष्म्याच्या काचा पुसत ते थांबले. मग शांत पण घट्ट आवाजात त्यांनी अचानक विचारले,

" तुम्हांला चंद्रपूर जिल्हा चालेल का ? चंद्रपूर ! "

कलेक्टर पुन्हा एकदा खुर्चीत थरारला. शिरोळ्यांच्या मऊ, सोज्वळ प्रश्नामागची धमकी त्याला समजली. चंद्रपूर ! काही क्षण त्याच्या तोंडून शब्दच फुटला नाही. कसेबसे स्वतःला सावरत तो म्हणाला.

" शिरोळेसाहेब, आपण काय बोलता आहात, मला समजत नाही."

" समजेल. समजेल." शिरोळे त्याच शांतपणे म्हणाले. " कलेक्टरसाहेब, तुम्ही काही आमचं काम करत नाही. तुमचा आमच्यावर का राग आहे कुणास ठाऊक ! लोकांनी आम्हाला कशासाठी निवडून दिलं आहे, माहीत आहे ना ? राज्य करायला ! पण सरकारी अधिकाऱ्यांशी सहकार्य करायचं असंच आमचं धोरण आहे."

" आपला काहीतरी गैरसमज होतो आहे शिरोळे-साहेब. मी काही आपल्याला...कधी..."

" ठीक आहे. तुम्हाला विनंती करण्यापलीकडे आम्ही दुसरं काय करणार ? उद्या मी कमिशनर साहेबांकडे जातो आहे. तुमचा काही निरोप असेल तर सांगा. आम्हाला हे इंजिनियरिंग कॉलेज सुरू करायचंच आहे. मूठभर माणसाकरता सबंध जिल्ह्याचा विकास आम्ही अडू देणार नाही. तीस जूनच्या आत आपला निर्णय व्हावा अशी नम्र विनंती आहे. मुख्यमंत्र्यांच्या हस्ते जुलैच्या पहिल्या आठवड्यात भूमीपूजन करायचे आहे. अधिक काय सांगणार ? येतो."

नेहमीप्रमाणे हात जोडून नमस्कार करत ते उठून गेले.

त्याच दिवशी प्रतिमा आली. आल्या आल्या तिने

सोनेवाडीचाच विषय काढला.

"त्या जमिनीबाबत काय ठरलं? शिरोळ्यांचा त्रास त्या लोकांना फार होऊ लागला. परवा दोघांना मारहाण झाली. लोक फार अस्वस्थ झालेत."

"त्यात फार अडचणी येत आहेत ग!"

"कसल्या अडचणी?"

"माझ्यावर फार प्रेशर येतं आहे. पार वरपासून फोन येत आहेत. आपण त्या लोकांना दुसरी जागा दिली तर नाही का चालणार? कारखान्याकडून मदत करायला लावू."

"परत तेच. दुसरी जागा कोणती देणार? बरड, खडकाळ? कॉलेज माळरानावर का होऊ शकत नाही? कॉलेजला ही पिकाखालचीच जमीन का पाहिजे? आणि शिरोळ्यांच्या आश्वासनावर कोण विश्वास ठेवणार! गेली पंचवीस वर्षे या लोकांना फसवून, लुबाडून त्यांची सत्ता उभी राहिली आहे. लोक आता नाही फसणार!"

"तहसिलदारानं जमिनी रिग्रँट केल्या नाहीत का? मी त्याला तशी सूचना दिली होती. ते झालं असतं तरी सोपं गेलं असतं!"

"तो कसा करेल? दोन महिन्यापासून तलाठ्यानं त्या लोकांना उतारेसुद्धा देणं बंद केलं आहे. सगळीकडे शिरोळ्यांचा दबाव आहे."

कलेक्टर पार बेचैन झाला. त्याला प्रतिमालाही उत्तर देता येईना.

"आम्ही फक्त तुझ्यावरच अवलंबून आहोत." प्रतिमा एकदम व्याकुळतेने त्याच्याकडे पहात म्हणाली. त्या शब्दांनी कलेक्टर मनातून हलला. त्यांच्या संबंधातल्या उत्कट क्षणीच ती त्याला एकेरी नावानं हाक मारी.. "लोकांना मी कसंतरी थांबवून ठेवलं आहे. केवळ तुझ्या भरंवशावर. विरोधी पक्षाची माणसं आमच्याकडे सारखी येत आहेत. त्यांना शिरोळ्यांविरुद्ध आरडाओरड करायची आहे. लोक पेपरमध्ये छापून द्या म्हणून मागे लागले आहेत. तू अडचणीत यायला नकोस म्हणून मी आतापर्यंत त्यांना काही करू दिलं नाही."

"मला समजत नाही ग! काय करावं? तुझ्या लोकांची बाजू खरी आहे. पण..."

"पण काय? प्रेशर येतं हेच ना! पण तू नाही प्रेशर घ्यायचं तर मग कुणी घ्यायचं? लोकांचं एक वेळ सोड. माझं काम आहे हे. माझ्यासाठी कर."

"प्रतिमा..."

"प्लीज... मला नाही म्हणणार तू?" प्रतिमा आवेगानं त्याचे हात हातात घेत म्हणाली. तिच्या डोळ्यात पाणी जमा होऊ लागले होते. "माझ्या आतापर्यंतच्या कामाची परीक्षा आहे ही. आणि माझी बाजू न्यायाची आहे. मी केवळ तुझ्यावरच अवलंबून आहे. आय अपील यू इन द नेम ऑफ अवर फ्रेंडशिप."

त्याने प्रतिमाचे हात घट्ट धरले. एक क्षणभर त्याला वाटलं, तिचे हात असेच धरून दूर निघून जावं. फार फार दूर. जिथे शिरोळे नसतील, सोनिया नसेल, कांगावखोर, गरीब लोक नसतील, सरकारी खुर्ची नसेल. फक्त आपण दोघं. आपण आणि प्रतिमा. त्या सगळ्या प्रश्नांपासून, विवंचनापासून दूर.

"प्रतिमा..." तो भरल्या आवाजात, तिच्या डोळ्यात डोळे गुंतवत म्हणाला. पुढे काही बोलणं शक्य झालं नाही. तिचे हात हातात होते. त्यांच्या स्नेहाच्या ऊबदार वाफा त्यांना कवटाळून घेत होत्या.

"जाऊ मी?" काही वेळाने ती म्हणाली. "घाबरू नकोस. मला खात्री आहे. तुला निर्णय घेता येईल. तूच नेहमी म्हणतोस नं...अवर फ्रेंडशिप विल गिव्ह यू स्ट्रेंग्थ. आपली मैत्री खरी आहे. डू नॉट बिट्रे इट."

ती गेल्यावर त्याने पुढच्या सगळ्या भेटी रद्द करून टाकल्या. त्याला आता कुणालाच भेटायचे नव्हते. डोक्यामागे हात बांधून तो आपल्या भव्य, रिकाम्या केबिनकडे नुसताच बघत बसला. रिकाम्या खुर्च्यांच्या रांगा, उंच लाकडी डॅडोज, एअर कंडिशनरचा मंद आवाज, कॅलेंडरवरची तारखांची पानं, टेबलावरचे टिक टिक करणारे घड्याळ, प्रतिमा ठेवून गेलेला दरवळ.

डोकं सैरभैर होऊन गेले. हा प्रश्न आपल्याला सुटत का नाही? तो मनाशी म्हणाला, ह्या पेक्षा कितीतरी कठिण आणि गुंतागुंतीचे प्रश्न आपण सोडवले आहेत. धडाधडा निर्णय घेतले आहेत. हिंदू-मुसलमानांची दंगल आपण फक्त दीड तासात संपवली. विद्यार्थ्यांचे मोर्चे एखाद्या शेळीच्या कळपासारखे निघतात. सबंध राज्यात सर्वात जास्त बोअरवेल्स आपण ह्या जिल्ह्यात खोदल्या. सरकारी कामावर ज्याला रोजगार मिळत नाही असा एकही मजूर जिल्ह्यात नाही हा आपला गर्व आहे. पण मग आताच आपलं डोकं असं बधिर का होतं? काहीच का सुचत नाही?

शब्द—

संवाद साधतात
मैत्री-वाढवितात
नाती जोडतात
मुके होतात,
तेव्हाच खरं बोलतात
आनंद देतात
मनमोकळं करतात
त्याची सखी रचना.

बटवटीत होतात—
नकोसे होतात
पिवळ्या प्रसिद्धीसाठी.
शब्दांकडून खरी, खोटी
प्रतिष्ठा हवी असते.
सारा रचनेचा खेळ.

आम्ही शब्दांचा मानसन्मान करतो

# मानसन्मान प्रकाशन

४।४० चंद्रप्रकाश,
कर्वे रोड, पुणे ४११ ००४.



अनुक्रमणिका



क्षणभर त्याला वाटलं राजीनामा देऊन मोकळं व्हावं, हा छळ कायमचा थांबवावा. पण ती गोष्ट आपल्याला शक्य नाही हे त्याला कळत होतं. कलेक्टर व्हायचं ही त्याची लहानपणापासूनची महत्वाकांक्षा होती. रात्रंदिवस कष्ट घेऊन तो परीक्षा पास झाला होता. आधी एका जिल्ह्यात प्रांत ऑफिसर, मग काही दिवस आर. डी. सी, मग दोन ठिकाणी सी. ओ. आणि मग कलेक्टर. निम्मं आयुष्य ही पायरी येईपर्यन्त खर्ची पडलं होतं. ती केवळ राजीनामा देऊन सोडून द्यायची? छे! ते शक्य नाही. तो मनाशी म्हणाला. अजिबात शक्य नाही.

पण मग दुसरे काय करणार? काय निर्णय देणार? शिरोळ्यांची धमकी त्याला आठवली. चंद्रपूर! त्याच्या अंगावर शहारे आले. तो मध्ययुगातला मागास जिल्हा काळ्या पाण्याच्या शिक्षेसारखा नाहीतर मुंबईतली एखाद्या काड्यापेटीसारखी खोली. माणसांच्या भयाण गजबजाटातले सत्वहीन आयुष्य. ओह्! नो! तो डोके आवळत म्हणाला.

ह्या प्रश्नाने त्याला कुरतडून खायला सुरवात केली. दिवस नित्याप्रमाणे उलटत होते, पण जगण्यातला सगळा रस नाहीसा झाला. आपले राजवाड्यासारखे भव्य घर त्याला खायला उठू लागले. माणसांवर रागावण्यात, त्यांचे सलाम स्वीकारण्यात सुख वाटेनासे झाले. फायलींवर निर्जीव यंत्राप्रमाणे सह्या होऊ लागल्या आणि दौरे वेठबिगारीसारखे. भूक आणि तहानेवरची वासना उडाली. समोर आलेले अन्न फक्त तो पोटात ढकली. त्या काही दिवसात त्याचे वजन झपाट्याने उतरले. त्वचेवरचा तजेला नाहीसा झाला. रात्र रात्र झोपेशिवाय जाऊ लागली. दिवसभर मग अस्वस्थता. रात्री परत जागरणे. वेडीवाकडी स्वप्ने. वेडेवाकडे विचार.

सोनियाने युद्धच पुकारले होते. कोरडेपणाने तिचे सगळे व्यवहार चालत. त्याला ती वेळच्या वेळी जेवण देई. संध्याकाळी चहाचा सरंजाम टेबलावर मांडून ठेवी. रात्री थंडपणाने त्याच्यासमोर देह पसरे. मधून मधून तिला भुणभुण करण्याची अशीच लहर येई. त्याला तिथून बाहेर काढायचे एवढेच तिने ठरवले होते. मुंबई. मुंबई. सारखी तिची बडबड चाले. तिच्या मुडपलेल्या भावनाहीन चेहेऱ्याकडे पाहिल्यावर कलेक्टरचे हात शिवशिवत आणि तसेच विफलतेने, हवा गेल्यासारखे खाली येत.

कमिशनरसाहेबांचा फोन पुन्हा आला. त्यांचा स्वर काहीसा कडक आणि रागावलेला होता.

"तुम्हाला अडचण कसली येते आहे?" ते म्हणाले, "मी तुम्हाला गेल्यावेळी समजावून सांगितले आहे ना! शिरोळे हा माणूस तुम्हाला फार त्रासदायक ठरेल."

"पण, सर...." कलेक्टरने कसाबसा बोलण्याचा प्रयत्न केला.

"नो नो. डोण्ट टेल मी एनीथिंग. ॲन्ड डोण्ट फोर्स मी टू इंटरफिअर. यू विल स्पॉईल युवर करीअर. टेक डिसीजन इन शिरोळेज फेवर बीफोर द एन्ड ऑफ धीस मन्थ."

आणि तो काही बोलण्यापूर्वीच त्यांनी फोन बंद करून टाकला.

महिना अखेरीच्या आदल्या दिवशी तो दौऱ्यावरून आला. शरीर प्रवासाने कंटाळून गेले होते. डोक्याचा शीण अधिकच वाढला होता. घरी येईपर्यंत संध्याकाळ झाली. आवारात दिवे लागले होते. जेवण झाल्यावर अस्वस्थ भांबावल्या मनाने तो इकडे तिकडे फिरू लागला. जीवाला चैन पडत नव्हते. सोनिया बेडरूममध्ये जाऊन वाचत पडली होती. न रहावल्याने तो तिच्यापाशी गेला आणि तिचा हात हातात घेतला. त्याची इच्छा ओळखून तिने हातातले पुस्तक खाली ठेवले आणि काही न बोलता कपडे उतरवून शरीर पलंगावर अंथरले. काही क्षण तो तिच्याकडे पहात राहिला, पण तिचे पांढुरके, लाकडासारखे थंडगार शरीर पाहून त्याची ऊर्मी गोठून गेली. तिच्या चेहेऱ्यावरचा थिजलेला भाव पाहून स्वतःचीच शिसारी आली. त्याला तिथे उभे रहावेना. तिला तिथेच सोडून जिन्याच्या पायऱ्या चढत तो वर गच्चीत आला.

रात्र काळोखी होती. अंधाराला चुकवून दोन तीन चांदण्यांनी उगवून घेतले होते. पाऊस अजून आला नव्हता, पण कडेकडेला ढगांचे घट्ट आवरण पसरू लागले होते. बंगल्याचा सगळा आसमंत स्तब्ध होता. वाऱ्याची एखादी झुळूक येई आणि आवारातल्या शिरीषाच्या झाडांची पाने हलत दिव्यांचा प्रकाश पानांच्या हलत्या छायेतून भिंती पुसत जाई. लांबवर पसरलेल्या शहराचा विस्तार शांत होता. रस्त्यावरचे दिवे फक्त प्रकाशात होते. हायवेवरून मधूनच एखादी लॉरी दमदार आवाज करत निघून जाई.

कलेक्टर त्या सगळ्या आसमंताकडे पहात राहिला. सारी रयत शांत झोपली होती. मार्केटयार्डातले हमाल, शाळेतील मुले, तरुण स्त्रिया, कचेरीतले शिपाई, डॉक्टर, वकील, व्यापारी. सगळे सगळे शांत झोपले होते. कलेक्टरला त्या सगळ्या लोकांचा अतोनात हेवा वाटला. त्याला वाटले किती सुखी आयुष्य आहे यांचे. आपल्यासारखा तीन सिंहांचा मुकुट यांच्या डोक्यावर नाही. पण पाच सहा तासांच्या निवांत झोपेचे मात्र ते निश्चित धनी आहेत. हे सगळे झोपलेले आहेत, कायदा आणि सुव्यवस्थेची जबाबदारी आपल्या खांद्यावर टाकून यांना शांत झोप येते आहे. कारण कलेक्टर जागा आहे. रात्रीच्या ह्या सुखासीन झोपेनंतर त्यांचा उद्या दुसरा दिवस उजाडेल. ताजा, उत्साही काम करण्याचा.

आपला उद्याचा दिवस मात्र दुर्दैवी आहे. काय निर्णय घ्यावा ? सर्व बाजूनी अक्राळ विक्राळ प्रश्न चालून येत आहेत. ते प्रश्न निर्माण करणारे मात्र शांत झोपले आहेत. सोनिया झोपली आहे. शिरोळे झोपले आहेत. गरीब हरिजन माणसेही झोपली आहेत. प्रतिमा झोपली असेल. कदाचित त्या लुकड्या माणसाच्या मिठीत. प्रतिमा....ओह....प्रतिमा, तू तरी आता इथे असायला हवी होतीस.

काय करणार आहोत उद्या आपण ? तो मनाशी म्हणाला. शिरोळ्यांना धुडकावून लावून बदली स्वीकारायची ? चंद्रपूर ! काय होईल त्याने ? काय करणार आपण तिथे जाऊन ? एकटे ! सोनिया आपल्याबरोबर येणार नाही. आणि प्रतिमा ! ती तरी तिथे कशी येणार ? मग मुंबई ? पण मुंबई नको. तिथे नोकरी करण्यापेक्षा मरण बरे. पण सोनियाचं काय ? तिच्या हट्टातून काय निघणार आहे पुढे ? आपल्याला ती सुखानं का जगू देत नाही ? मुंबईशिवाय ती दुसरं काही ऐकणार नाही. तिला आता इथंही रहायचं नाही. मग काय करायचं ? शिरोळ्यांना खूष करून मुंबईला बदली करून घ्यायची ? जमीन त्यांना देऊन टाकायची ? आणि मग प्रतिमा ? प्रतिमाचं काय ?

प्रतिमाची आठवण होताच त्याचे मन विलक्षण व्याकूळ झाले. प्रतिमाचा आणि आपला परिचय झालाच नसता तर ! तो मनाशी म्हणाला– आपण आपले बरे होतो, कोरडे, कठोर, ब्यूरोक्रॅट. गरीबांवर जुलुम करत. श्रीमंतापुढे नाक घासत. प्रतिमाने आपल्याला किती दुबळे केले आहे. काय म्हणाली ती ? इन द नेम ऑफ अवर फ्रेंडशिप ! ओह ! फ्रेंडशिप. व्हॉट इज इट ? मैत्री म्हणजे काय ? डू नॉट बिट्रे इट ! ओह ! प्रतिमा, कशासाठी बोललीस तू हे ? तिच्याविरुद्ध निर्णय घेणे कसे शक्य आहे ? ती आणि आपण निराळे कुठे आहोत ? तिला नाही म्हणायचं ? विश्वासघात करायचा ? आणि नंतर मग इथे कशासाठी रहायचं ? कसा चेहरा दाखवायचा तिला ? उद्या काय सांगणार तिला ? वरून प्रेशर आलं म्हणून तुला फसवलं ! सोनियाशी संसार करायचा होता म्हणून मुंबईला गेलो ! पुढाऱ्यांची मर्जी राखायची होती म्हणून जुलूम केला. ओह ! प्रतिमा ! काय सांगणार तिला ? त्यापेक्षा आपण सुईसाईड का नाही करत ?

त्याला वाटले खरंच, आपण राजीनामा का नाही देत ? आत्महत्या का नाही करत ? माणसांच्या ह्या गर्दीतून पळून का नाही जात ? ह्या सगळ्यांपासून दूर ! जिथं यातलं कुणीही नसेल. काय बाधतंय आपल्याला ? सत्तेचा मोह ? सोनियाच्या गळ्यातील पोत ? प्रतिमाची बेभान मिठी ?

वेदनेनं त्याच्या मनाच्या चिरफळ्या उडाल्या. त्याला वाटलं, कशासाठी हे प्रश्न डोक्यावर घेतले आपण ? कशासाठी आत शिरलो ? बाहेर पडायची विद्या माहीत नसताना ! की त्या सगळ्यांनी आपल्याला ढकललं ? आपली इच्छा नसताना ! आणि आता ते आपल्याला बाहेर पडू देत नाहीत, सर्वत्र अंधार पसरला आहे. आणि अंधारातच प्रत्येकजण वार करतो आहे. आपण ज्या दिशेला जाऊ पाहतो आहोत त्या प्रत्येक दिशेला ते शस्त्र परजत उभे आहेत.

सोनिया–शिरोळे–गरीब लोक. कमिशनर. प्रत्येकाच्या हातात आपल्या गळ्याला बांधलेली दोरी आहे आणि सगळे सगळ्या बाजूंनी ती खेचताहेत. आपल्या किंकाळ्या ऐकून खदखदा हसताहेत.

आपल्याला फक्त आत शिरायचे ज्ञान होते. बाहेर पडायचे मात्र नाही.

अंधारात त्या सगळ्या भयोत्कट आभासी आकृत्यांशी झगडत तो नुसताच उभा राहिला. स्वतःच, स्वतःच्या मनाला भोसकीत काहीच न कळून. सैरावैरा. हॉलमधल्या घड्याळात कधी तरी बाराचे ठोके पडले.

आणि त्याच्या नकळत दुसरा दिवस उगवून अंधारात त्याची वाट बघत बसला.

■

# नवा माणूस

मधु कुलकर्णी

कोयना कॉलेजची प्रिंसिपलची जाहिरात एक दिवस अचानकच पाहण्यात आली. हें कॉलेज तसे अलिकडे थोडे बदनाम झालेले. ताटके निवृत्त झाल्यानंतर त्या कॉलेजला चांगला प्रिंसिपल मिळालेलाच नव्हता. त्या संस्थेच्या अध्यक्षांची कोल्हापुरात ओळख झालेली. गृहस्थ बरा वाटला होता. माझीही शिक्षणक्षेत्रातील वीस वर्षांची सेवाचाकरी झालेली, त्यातही प्राचार्यपदाचा सात वर्षांचा अनुभव गाठीशी आहे. आपण समाजशास्त्राचे विद्यार्थी सर्वांना समजावून घेणे, सामावून घेणे हा आपला अभ्यासविषय आहे. अध्यापनाचा आणि आपल्या वाणीचा आपल्याला थोडासा आत्मविश्वास आहे आणि ग्रामीण भाग आपल्याला अपरिचित नाही. कोयना कॉलेजचे प्राचार्यपद हे एक तसे चॅलेंजच आहे. हे चॅलेंज स्वीकारायला काय हरकत आहे, असा विचार केला, आणि अर्ज टाकून दिला.

मुलाखतीच्या आधी जाऊन एकदा कॉलेजचा परिसर पाहून यावा, शक्य झाल्यास अध्यक्षांना भेटून यावे, असे ठरवून एका दुपारी कॉलेजात दाखल झालो. साखर कारखान्याचे अध्यक्षपद व शिक्षणसंस्थेचे अध्यक्षपद अशी दोन्हीही पदे दादासाहेबांच्याकडेच आहेत. कारखान्याच्या परिसरातच कॉलेज आहे. जवळच अध्यक्षांचा बंगला आहे. प्रथम तिथे गेलो. अध्यक्ष होतेच. मला पाहिल्याबरोबर उठून अगत्याने त्यांनी माझे स्वागत केले ' तुमचा अर्ज पाहिल्यावर मी तुम्हाला कोल्हापूरला भेटायला येणारच होतो, तुम्हीच आलात, फार छान झाले, बसा, थोड्या वेळात आपण कॉलेज पहायलाच जाऊ ' असं ते म्हणाले.

प्रशस्त परिसर, उत्तुंग आणि देखण्या इमारती. सगळ्या शहरी सुविधा त्या माळावर उभ्या केलेल्या. अध्यक्ष बोलके वाटले. म्हणाले, ' आमच्याकडे पैशाची कमतरता नाही. सोयीसुविधाही सगळ्या आहेत. आम्हाला या शिक्षणक्षेत्राच्या निमित्ताने एक नवा माणूस घडवायचा आहे. याला चांगली शिस्त लावणारा आम्हाला तुमच्यासारखा ॲडमिनिस्ट्रेटर हवा आहे. तुम्ही जरूर या. आम्ही तुम्हाला काही कमी पडू देणार नाही.'

पुढील महिन्या दीड महिन्यात मुलाखतीचे व नेमणुकीचे सारे सोपस्कार पूर्ण केले. आणि कोयनेच्या प्राचार्यपदाचे हे चॅलेंज स्वीकारले. एक जूनला मी कॉलेजमध्ये येऊन हजर झालो. पंधरा जूनला कॉलेज रीतसर सुरू झाले.

ॲडमिशन्स भराभर सुरू झाल्या. गरिबापासून श्रीमंतापर्यंत सगळ्यांची अडीच हजार मुले शिकतात, सहाशे विद्यार्थ्यांसाठी इथे होस्टेल आहे, असा कॉलेजचा एकंदर आटोप लक्षात आला.

पहिल्या आठवड्यात मी प्रथम स्टाफ मीटिंग घेतली. सर्वांच्या औपचारिक ओळखी करून घेतल्या. ' तुमचे सर्वांचे मनापासूनचे सहकार्य असेल तरच मला काम करता येईल. काम करण्यासाठी आपण इथे आलेलो आहोत, त्यासाठी आपल्याला पगार मिळतो, म्हणून आपण आपले काम अत्यंत सचोटीने करणे आपले कर्तव्य आहे ' असे त्यांना सांगितले.

नॉन टीचिंगची एक छोटीशी मिटिंग घेऊन तुम्ही दैनंदिन कामकाजाचे खरे सूत्रधार आहात, असे त्यांना सांगितले.

त्यानंतर सगळे कौन्सिलर्स, काही पालक, यांच्यासमवेत सर्व मुलांसमोर माझा ॲड्रेस झाला. सुरवातीला अध्यक्ष स्वतःच बोलले. एक नवा माणूस घडविण्याचा आपला उद्देश असल्याचे त्यांनी सांगितले. सर्व प्रकारच्या आदर्शांची व शिस्तीची त्यांनी विद्यार्थ्यांकडून अपेक्षा केली. समाजकार्यकर्त्यांच्या थाटात नवा माणूस घडविण्याची आपली कल्पना सांगताना आपले दोन्ही हात समोर धरून, हाताचे तळवे एकमेकाकडे करून एकाखाली एक असे दोन कंस कल्पासारखी ॲक्शन करून

दाखविल्यामुळे भावी नवा माणूस त्यांच्या डोळ्यासमोर त्यांच्या सौष्ठवासह दिसत असावा असे वाटले. रुंद खांदे, बारीक कमर, पुन्हा भक्कम खुबे आणि निमुळते होत जाणारे पाय. ते असे थोडकेच पण तळमळीने बोलल्यासारखे वाटले.

मी माझ्या भाषणात सुरवातीला शिक्षक, पालक, यांच्या जबाबदाऱ्या सूचित केल्या. पण सगळ्यात जास्त जबाबदारी शिकणाराची आहे हे समजावून सांगितले. 'आपण सध्या एका संक्रमण काळातून जात आहोत. शिकून पदवीधर होऊनही नोकऱ्या नाहीत, शिक्षण देणे हे आमचे काम आहे, नोकरी देणे शासनाचे काम आहे. आम्ही आमचे काम निष्ठेने पूर्ण करू. पण नोकरीसाठी शिक्षण हे शिक्षणाचे उद्दिष्टच आपल्याला मान्य नाही. ज्ञानासाठी ज्ञान हे उद्दिष्ट ठेवल्याशिवाय आपल्याला तरणोपाय नाही. ज्ञानाबरोबर भाकरीचा विचार न करणे आपल्यासारख्या गरीब देशाला परवडणारे नाही. पण तरीही ज्ञानासाठी ज्ञान हेच अंतिम उद्दिष्ट ठेवल्याशिवाय विकसनशील देशांना दुसरा मार्ग नाही. तुम्ही शिकणारे विद्यार्थी या सगळ्याच्या केंद्रस्थानी आहात. तुम्ही या काळात बारा बारा तास सपाटून अभ्यास केला पाहिजे. पाठीच्या कण्याला रग लागली तरच ज्ञान मिळते. ज्ञान ही वस्तुनिष्ठ गोष्ट आहे. ज्ञानग्रहणात मधल्या वाटा कधीही उपयोगाच्या होत नाहीत. ते परिश्रमानेच मिळेल. मी तुमच्यासारखाच खेड्यात जन्मलो, वाढलो, शिक्षणासाठी शहरात गेलो. शिक्षणानंतर काम करण्यासाठी पुन्हा इथे आलो आहे. वर्तुळ अशा रीतीने पूर्ण झाले आहे. पण मी निमित्तमात्र आहे. आज आहे, उद्या नसेन. मला कशाचीही अभिलाषा नाही, इथल्या वैभवातली एक चिमूटभर मातीही मी घेणार नाही. उचललीच तर ती कपाळाला लावण्यासाठीच असेल.'' एवढे सांगून मी माझे भाषण संपविले.

कार्यक्रमानंतर दादासाहेब मला म्हणाले, 'प्रिंसिपलसाहेब, तुम्ही फार चांगले मांडलेत. तुमची ढंग चांगली आहे. तुमच्या घराण्यालाच हे वरदान आहे.'

त्यानंतर एका संध्याकाळी कोल्हापूरला भीमसेन जोशींच्या गाण्याला काही मंडळी जाताहेत असे कळले. दादासाहेबांच्या बोलावण्यावरून मीही त्या दिवशी गेलो. कार्यक्रम छानच झाला. भीमसेननी सुरवातीचा दरबारी असा अप्रतिम उभा केला की त्यामुळे पुढची सगळी मैफलच रंगत गेली. तन्मयतेने गायकी पेश करणारा हा कलावंत वातावरण भरून आणि भारून टाकतो हेच खरे. उत्तरार्धातली 'कौन गली गयो शाम' ही ठुमरी तर बराच काळ मनात रेंगाळत राहिली. निष्ठेने सादर केलेली कोणतीही गोष्ट समाजमनापर्यंत पोहोचते हे भावनिक यश मनात वागवीत पहाटे चार वाजता मी क्वार्टरवर पोहोचलो.

पण अशा आनंदाच्या काळातच मनाला थोडीशी खटकणारी एक गोष्ट घडली. पुढे एकदा असाच प्रभा अत्रेंच्या मैफलीला कोल्हापूरला कारखान्याच्या जीपने गेलो होतो. दादासाहेब काही कामासाठी त्यावेळी मुंबईत होते. दुसऱ्या दिवशी कारखान्याच्या ऑडिटरने जीप कोल्हापूरला नेल्याबद्दल आक्षेप घेतल्याचे कळले. त्यामुळे गाण्याला जाण्याचा पुन्हा कधी प्रसंग आला तर एस. टी. ने जाऊ, पण पुन्हा कारखान्याच्या गाडीतून जायचे नाही हे ठरवून टाकले.

थोड्याच दिवसात मीटिंगच्या निमित्ताने विद्यापीठात गेलो होतो. तिथे प्रिंसिपल बी. के. भेटला. लंडन स्कूल ऑफ इकॉनॉमिक्सचा विद्यार्थी, प्रसिद्ध अर्थशास्त्रज्ञ, ओरिजिनल थिंकर आहे तो. मला म्हणाला, 'चिपाडाच्या कॉलेजचा प्रिंसिपॉल झाला आहेस. सांभाळून रहा.' (साखर कारखान्यांच्या कॉलेजला तो चिपाडाचे कॉलेज म्हणत असे.)

मी त्याला विचारले, "मग चांगली कॉलेजिस कुठली?"

तो म्हणाला, "आमच्या संस्थेची."

तोही विस्ताराने मोठ्या असलेल्या एका संस्थेत ग्रामीण भागातच काम करत होता. त्याचे विधान सापेक्ष वाटल्यामुळे मी त्यावेळी फार मनावर घेतले नाही.

या काही दिवसात माझ्या असे लक्षात आले की या कॉलेजमधील स्टाफपैकी रिनाउंड असे कोणी फारसे नाहीत. जे होते ते सोडून गेले होते. त्यामुळे प्राध्यापकांच्या तासांकडे माझे बारीक लक्ष असे. ऑन ॲन ॲव्हरेज, तसे सर्वजण ठीक होते. पण दोन तीन नवागतांच्या तासाला मुले दंगा करतात हे माझ्या लक्षात आले होते. त्यांचे तास चालू असताना मी व्हरांड्यातून फेरी मारून येत असे. अर्थशास्त्राच्या गायकवाड प्रोफेसरांच्या तासाला ज्युनियरच्या एका मोठ्या वर्गात मुले सुरवातीपासूनच दंगा करीत. "अरे, सरांच्या हातातली वही काढून घ्या रे,' असे कुणीतरी ओरडे. 'सर, तुम्ही लिहून दिलेले सारे जसेच्या तसे पुस्तकात

आहे," म्हणत. बाके वाजवीत. वेगवेगळे आवाज काढत, त्यावर हातातली वही मिटून ते मुलांना समजावण्याचा प्रयत्न करीत. तुम्ही इथे घरदार सोडून शिकायला आलेले आहात. तिकडे तुमचे वडील काबाडकष्ट करीत असतात. तुमच्यासाठी... तेवढ्यात कुणीतरी ओरडे, 'सर, आमच्या वडलांचं नाव काढायचं काम नाही' एकदा त्याचवेळी मी वर्गात गेलो. मुले सावरली. तास कसाबसा संपला. मी त्यानंतर प्रोफेसर गायकवाडना माझ्या चेंबरमध्ये बोलावून घेतले. ते आपली काही बाजू सांगण्याचा प्रयत्न करू लागले. मी त्यांना सांगितलं, 'प्रोफेसर गायकवाड, तुम्ही शिकवायला वर्गावर जाताना आणखी तयारी करायला हवी. तुमच्या आयुष्याची ही सुरवात आहे. पुढे अनुभवाने सारे ठीक होईल." तरीही ते आपले काहीसे समर्थन करू लागले. थोडा आवाज चढवून मी त्यांना सांगितले, 'मघाशी फळ्यावर 'रेशो'चे स्पेलिंग तुम्ही चुकीचे लिहिले होते,' असे म्हटल्यावर ते 'सॉरी सर,' म्हणून गप्प बसले.

इतिहासाचे चौगुले तासात पोर्शन बाजूला ठेवून इतर गप्पागोष्टी करीत. थोडेसे आचरट विनोद करत. इतिहासाचे हेड ऑफ दि डिपार्टमेंट पाटील हुषार गृहस्थ होते. त्यांना बोलावून मी चौगुल्यांना काही गोष्टी सुचवायला सांगितले. ते म्हणाले, "चौगुले माझ्याशी बोलतच नाहीत.' कर्तव्य म्हणून तुम्हीच हे चौगलेंना समजावून द्या असे मी पाटलांनाच सांगितले. मनात हेतू असा की सर्वांमध्ये एक प्रकारचे कोऑर्डिनेशन निर्माण व्हायला हवे—

माझ्याकडे भागातून पायी पायी, सायकलवरून, एस. टी. तून येणारी काही गोरगरिबांची मुले होती. तशी काही बड्या बागायतदारांची श्रीमंतांचीही मुले होती. लौकरच माझ्या असे लक्षात आले की यातल्या काही श्रीमंत मुलांचे कॉलेजमध्ये नाव घालतानाच 'शिक्षण घेणे' हे उद्दिष्टच नसे. व्होंडा, बुलेट अशा नव्या कोऱ्या मोटार सायकलवरून कॉलेजला यायचं. आल्या आल्या गाडी पोर्चमध्ये लावायची. तासावर जायचेच नाही. बागेतल्या काही झाडांना सुबक पार बांधले होते. त्या पारावर कुठल्या तरी पायऱ्यांवर किंवा पोर्चमध्ये दहापाचांच्या टोळक्यांनी थांबायचे, सिगरेटस् ओढायच्या, येणाऱ्या जाणाऱ्या मुलींची थट्टा करायची, असे त्यांचे उद्योग चालायचे, हे माझ्या लक्षात आले होते. तास चालू असताना अशा हेरलेल्या जागांकडे मी मोर्चा वळवला. मी दिसलो की ही मुले चटकन सावध होत, बाजूला कुठेतरी पांगत.

एकदा या मुलांच्या घोळक्यासमोर मी जाऊन उभा राहिलो. म्हणालो, "तुम्हाला तास नाही ?"

काहींनी उत्तर दिले, "आम्हाला ऑफ आहे सर."

बाकीच्यांना विचारले, "तुम्हाला ?"

"आम्ही उशिरा आलो सर, म्हणून वर्गात गेलो नाही."

"चला वर्गात. आणि ज्यांना तास नाही त्यांनी लायब्ररीत काही तरी वाचत बसायचं. अशा चकाट्या पिटत बसायचं नाही. चला—"

त्याच दिवशी मी तशी नोटिस नोटिसबोर्डावर लावून टाकली. एवढ्याने भागणार नव्हते याची मला जाणीव होती.

टी टाइमच्या वेळी मी स्टॉफरूममध्ये गेलो. सगळ्या स्टाफला सांगितलं. 'ज्यांना पिरीयड नसेल त्यांनी एकदा बाहेरून चक्कर टाकायची. तास चुकवून बाहेर बसलेल्यांना वर्गात हाकलायचं."

स्टाफमेंबर्स काही बोलले नाहीत. पण उत्साही वाटले नाहीत. मी त्यांना म्हणालो, "वर्गात सगळ्यांनी हजेरी घ्या. रिपिटेडली गैरहजर असणारांची नावे माझ्याकडे द्या." इंग्रजीच्या सरनोबतनी शंका व्यक्त केली.

"सर आपले वर्ग मोठे आहेत. बराच वेळ हजेरीत जाईल."

"ॲट-हँडम नंबर्स घ्या. वर्गात हजेरी घेतली जाते याचा मुलांना धाक राहिला तरी बस्स होईल."

दुसऱ्या दिवशी प्राध्यापकवर्गात चर्चा चालली होती. तत्त्वज्ञानाचे शहा पोर्चमध्ये बसलेल्या मुलींना हाकलायला गेले, तेव्हा एक टारगट विद्यार्थी त्यांना म्हणाला म्हणे 'काय सर, सिगरेट पाहिजे का ?' हे माझ्या कानावर आले. मी शहांना चेंबरमध्ये बोलावून घेतले. मी त्यांना विचारले, 'प्रोफेसर हे खरे आहे ?'

'होय सर.'

'अरे मग त्याला थोबाडले का नाही तुम्ही ?'

'आठदहा मुले होती सर, तिथे. नेमके कोण म्हणाले ते कळले नाही. मी छडा लावयाचा प्रयत्न केला. पण कुणीच सांगायला तयार नाही.'

'समोर बोलण्याचे धाडस यांना असत नाही. पाठीमागून तोंडे लपवून असा फाजिलपणा करता येतो. गर्दीत

दुबळ्यालाही बळ येतं. तुम्ही लक्ष ठेवा.'

केविलवाणे होत शहा म्हणाले, 'पण सर आपण प्राध्यापकाचे काम करायचे का फौजदाराचे?'

'हे पहा, प्रोफेसर शहा, आपल्या अवतीभोवती ज्या प्रकारची माणसे आहेत, त्यांना घेऊनच आपल्याला पुढे जायचे आहे. काही एका मर्यादेपर्यंत आपल्याला कसलेही काम करावे लागेल. प्रयत्न करून पहायचा—'

आलेले सगळे टपाल प्रथम मी नजरेखाली घालत असे. त्यातली मुलींची पत्रे बाजूला काढून ती माझ्या अधिकारात मी फोडून पहात असे. ग्रामीण भागात तसे करणे आवश्यक आहे असा माझा पूर्वानुभव होता. विद्यार्थिदशेतले हे वयच खुळे असते. जबाबदारीची जाणीव सर्वांनाच असेल असे नाही. युथ इज फुल ऑफ मिस्टेक्स. मग एखादी लहानशी चूक सबंध आयुष्यावर परिणाम करून जाण्याची शक्यता असते. अगदी वरच्या वर्गातील वाढत्या वर्गाच्या 'मुलामुलींबाबत फारशी चिंता कुणीच करण्याचे कारण नाही. पण सुरवातीच्या वर्गातून हा प्रॉब्लेम जाणवतो खरा. म्हणून मी थोडासा जागरूक असे.

अशा वेळी मी मुलीला बोलावून घेत असे. मुली बहुधा भावनाप्रधान असतात. तिला असे काही विचारले की ती रडायलाच लागे. आपल्याला यातले काही माहिती नाही, हे घरी कळले तर माझे शिक्षणच थांबेल असे ती सांगे. मग मी तिला धीर देत असे. कॉलेजमध्ये अगर बाहेरही कुठे प्रत्यक्ष कुणी तुला त्रास देऊ लागला, तर मला सांग. मी त्याचा बंदोबस्त करीन. तू निर्धास्त रहा—

यात बऱ्याच वेळा टोपण किंवा काल्पनिक नावे वापरली जात. अशी पत्रे दुसऱ्यांकडून लिहवून घेण्याचा उद्योग करणारी काही मंडळीही असतात. प्रसंग आलाच तर मी हे लिहिलेले नाही असे म्हणून मोकळे होता येते. बऱ्याच वेळा अशी पत्रे निनावीही असत. निनावी पत्रे मी फाडून टाकत असे. कुठे वाच्यताच करत नसे.

गुलाबी लिफाफ्यातून आलेली दोन पत्रे मात्र संबंधित मुलींचा त्यात काही सहभाग नाही याची खात्री करून, मी माझ्याजवळ ठेवून दिली होती.

शिक्षकाच्या पाठीलाही डोळे असतात. कारण ते याच रस्त्याने लहानाचे मोठे झालेले असतात. सर्जेराव पाटोळे हा विद्यार्थी माझ्या नजरेच्या जाळ्यात बरोबर सापडला. मुळात तो अतिशय उर्मट आहे अशी त्याच्याबद्दल सर्व प्राध्यापकांची तक्रार आहेच. शिवाय तास चुकवून सिगरेट ओढत बसणारामध्ये तो आहेच. मुलींची अर्वाच्य टिंगल करणे हा तर त्याचा धंदाच झाला होता. माझ्याकडे राखून ठेवलेली पत्रे ही त्याचा धडधडीत पुरावाच होता. आणि गावात त्याचा असा काही कंपू होता की प्रसंगी तो लिकर वगैरेही घेतो हे कळल्यावर तर मी सुन्न होऊनच गेलो. तास चुकविल्याबद्दल त्याला पकडले तेव्हा चेंबरमध्ये बोलावून पालकांना आणल्याशिवाय कॉलेजला येऊ नकोस असे बजावले.

त्याच दिवशी संध्याकाळी मी अध्यक्षांना भेटलो. त्या मुलाचे सगळे प्रताप त्यांना सांगितले. आणि अशा मुलाला रस्टिकेट करावे असे मी माझे मत सांगितले.

'पण अशी रस्टिकेटची स्टेप एकदम कशी काय घेता येईल?' असं ते म्हणाले.

'दंगा करणारे असे एलेमेंट कुठेतरी पाच दहा टक्के असते. बाकीची सगळी मुले सरळ, सालस, एकमार्गी असतात. हे एलेमेंट कॉलेजमध्ये ठेवणं म्हणजे

सालस, अभ्यासू मुलावर एकप्रकारचा अन्याय होत असतो. म्हणून ते वेळीच निपटून काढले पाहिजे. शिवाय आपण त्याच्या लीव्हिंग सर्टिफिकेटवर काही लिहिणार नाही आहोत. त्याला बाहेर जाऊ द्या ना कुठेही शिकायला. आपल्या इथे हा नको."

त्यांनी मग त्या मुलाचे संपूर्ण नाव विचारून घेतले. आणि ते जरा विचारात पडले. म्हणाले, "अहो, तो आमच्या संपतराव पाटोळयांचा मुलगा. संपतराव आमच्या कारखान्याच्या डिस्टिलरीचे अध्यक्ष आहेत. त्याला रस्टिकेट कसा करणार ?" "तो कुणाचा मुलगा आहे याच्याशी आपले काही कर्तव्य नाही. चुकीला शासन मिळाले पाहिजे, असे मला वाटते."

काहीशा निर्धाराने अध्यक्ष म्हणाले, 'नाही पण, आपल्याला तसे करता येणार नाही." साखरसंघाच्या मीटींगला आपल्याला लगेच निघायचे आहे असे सांगून ते उठले.

अध्यक्षांना विरोध सहन होत नाही असा निष्कर्ष मनाशी घेऊन मी उदासपणाने तिथून उठून माझ्या क्वार्टर्समध्ये शिरलो.

सात सप्टेंबरला विद्यार्थ्यांच्या जिमखान्याच्या निवडणुका होतील याचे सर्क्युलर ऑगस्टच्या मध्यावरच आले. अर्ज देण्याची तारीख, अर्ज मागे घेण्याची तारीख, छाननीची तारीख, मतदानाची तारीख आणि निकालाची तारीख या सर्व तारखा विद्यापीठानेच ठरवलेल्या असतात. विद्यापीठाच्या नियमाप्रमाणेच सर्क्युलर आलेल्या दिवशीच बोर्डावर नोटीस लावून टाकली. एकंदरीत तीन आठवड्याचे हे जोखमीचे एक काम आले याची जाणीव झाली.

भराभर अर्ज येऊ लागले. छाननी झाली. अर्ज मागे घेण्याच्या तारखेदिवशी मुलामुलांमधले काही मतभेद व्यक्त झाले. आणि मग रीतसर प्रचाराला सुरवात झाली. उमेदवारांच्या नावांचे बोर्ड रंगू लागले. गाव पॅनेल, परगाव पॅनेल अशी दोन पॅनेल्स रिंगणात उतरली. अपक्ष किंवा बंडखोरांना अजिबात स्थान नव्हते, असे दिसून आले. म्हणजे अर्ज मागे घेताना त्यांनाच आपले अर्ज मागे घ्यावे लागले होते. एका चिमुकल्या कॉलेजच्या जिमखान्याच्या या निवडणुका, पण ट्रक, ट्रॅक्टर्स, कार्स आणि मोटारसायकल्स यांनी कॉलेजचे ग्राऊंड भरून वाहू लागले. भेटीगाठी आणि दमदाटी यांचा धुरळा उडू लागला. मुलीबाळींच्या घरी जाण्याची सर्वांना तात्पुरती सनदच मिळाली. प्रचाराचा धडाका सुरू झाला. वातावरण तापू लागले.

कोयना साखर कारखान्याच्या परिसरात दोन गट आहेत. एक अध्यक्ष दादासाहेबांचा आणि दुसरा त्यांच्या विरोधातला. कारखान्याच्या निवडणुकीपासून पोल्ट्रीफॉर्मच्या योजनेपर्यंत आणि ऊसाच्या वहतुकीपासून अपना बाजारपर्यंत दोन्ही गटातला संघर्ष सगळीकडे दिसतो हे मी ऐकून होतो. पण त्याचे अगदी जनेच्या तसे चित्र या लहानशा कॉलेजच्या निवडणुकीतही तंतोतत दिसावे याचे मला आश्चर्य वाटले.

छोट्याशा कॉलेजच्या छोट्याशा जिमखान्याच्या या निवडणुका. जिमखान्याचे वार्षिक बजेटही छोटेसेच. यात हातात येणारा पैसा किती, यातली सत्ता किती ? तीही लुटुपुटीची. पण त्यासाठी इतकी उमेद ? इतकी ईर्षा ? इतकी जिद्द ? या मुलांच्या काही मीटिंग्ज भागातल्या काही पुढाऱ्यांकडेच होतात असे ऐकले. त्या पुढाऱ्यांपैकी काहींची मुलेच उभी होती. काहींनी या निवडणुकीसाठी दहा हजाराचे बजेट काढले आहे, काहींनी वीस हजार अकाउंटस केला आहे असे ऐकले. एकदा वाटले अध्यक्षांकडे जावे, आणि त्यांनाच सांगावे. आपण दोघे मिळून भागातल्या सर्व पुढाऱ्यांकडे जाऊ या. आणि त्यांना विनंती करू या की तुम्ही या कॉलेजच्या निवडणुकीत भाग घेऊ नका. त्यांना हे अगदी कळकळीने आवर्जून सांगू या.

पण पुन्हा लक्षात आले, अधिकृतरीत्या कुणीच भाग घेत नव्हता. जाहीरनामे नव्हते. बातम्याही सांगोवांगीच्या. समक्ष काय बोलणार ? राजकारणात विधीनिषेध सिद्ध करणे किती अवघड असते याची पुसटशी कल्पना आली.

सहा तारखेला संध्याकाळी पाच वाजेपर्यंत उघड प्रचाराची मुदत होती. पाच तारखेला रात्री गावात परगाव पॅनेलमधील काही मुलांना जबरदस्त मारहाण झाली. हे मला सहा तारखेला सकाळी कळले. मी लगेच दादासाहेबांच्याकडे गेलो. कळलेली बातमी सांगितली. म्हणाले, "माझ्या कानावर ही गोष्ट आलेली आहे. पण तुम्ही काही चिंता करू नका. बाहेर गावात मी काही घडू देत नाही. तुम्ही प्रिमिसेसमध्ये पहा—"

अकरा वाजता मी सर्वांना अॅम्फिथिएटरमध्ये एकत्र जमायला सांगितले. "तुमच्या शैक्षणिक आयुष्यातली नेतृत्व निवडीची ही एक लहानशी तालीम आहे. ती

खेळीमेळीने पार पडावी अशी माझी अपेक्षा आहे. तुम्ही शिस्त आणि शांतता पाळली नाहीत तर सबंध निवडणूकच मी रद्द करून टाकीन. अंतिम अधिकार माझा आहे हे लक्षात ठेवा– शांततेने जा—'' मी एवढेच बोललो.

वातावरण धुमसत असल्यासारखे वाटत होते. मुले घोळक्यांनी वावरत होती. कुजबुजत होती. गावातली काही टारगट पोरे आणि भागातले काही गुंड ग्राऊंडवर फिरताना दिसू लागले.

तत्परतेने पुढे होऊन त्यांना तिथून निघून जाण्यास सांगितले. कॉलेजमध्ये नसलेल्या कुणाचेही इथे काम नाही. पुन्हा दिसलात तर पोलिसच्या ताब्यात देईन, चला इथून, म्हटल्यावर ती अनोळखी चेहऱ्याची सगळी मंडळी निघून गेली. आता ठीक होईल असे वाटून मी माझ्या चेंबरमध्ये येऊन बसलो.

चारच्या सुमाराला पन्नास पाऊणशे मुलांच्या एका गटावर शंभर सव्वाशे मुलांचा एक गट चाल करून येतो आहे असे मला व्हरांड्यातून दिसले. सगळयांच्या हातात लाठ्या, काठ्या, सळया आणि सायकलच्या चेन होत्या हे मी पाहिले.

त्यांच्यात लगेच धुमश्चक्री चालू झाली आणि त्या दिशेने मी वेगाने झेप घेतली. आवेगातच गर्दीच्यामध्ये घुसून मी एका मुलाचे मनगट घट्ट पकडले आणि त्याच वेळी माझ्या उजव्या डोळयाजवळ कपाळावर कशाचा तरी अणकुचीदार जोराचा प्रहार बसला. वेदनारूप तेजाचे स्फुल्लींग आकाशापर्यंत उडाले, आणि मी बेशुद्ध पडलो...

तीन तासांच्या बेशुद्धीनंतर जबरदस्त ठणकत्या जडपणाने मला जागे केले, तेव्हा मी कुठल्यातरी हॉस्पिटलमध्ये असल्याचे जाणवले. माझ्या बिछान्यासमोर तत्त्वज्ञानाचे प्राध्यापक शहा, दादासाहेब, माझ्या कॉलेजचा शिपाई आणि माझी बायको यांच्या उभट चेहऱ्याच्या उंचच उंच सावल्या मला क्षणभर दिसल्या आणि मला पुन्हा ग्लानी आली...

कोयना कॉलेजच्या प्राचार्यांना बेदम मारहाण, उपप्राचार्य आणि एका प्राध्यापकांनाही थोडा मार बसल्याची दुसऱ्या दिवशीच्या वृत्तपत्रात बातमी आली होती.

त्याच्या दुसऱ्या दिवशी, भांडणे सोडवण्यासाठी गेलेल्या प्राचार्यांना अनवधानाने लागल्याचा अध्यक्षांचा खुलासा, आणि सर असे अचानकमध्ये येतील याची कल्पनाही नसल्याने झालेल्या घटनेबद्दल आम्ही दिलगीर आहोत असा विद्यार्थ्यांचा खुलासा प्रसिद्ध झाला होता.

सगळे निवांत झाल्यावर मी राजिनामा लिहून संस्थेकडे पाठवून दिला. ■

# खेळंगडी

## विनोद भट

: १ :

मी ऑफिसला जायची तयारी करत होतो.

सकाळपासून आभाळ गच्च भरून आलेलं होतं. दिवस वर आला तरी काळोखी दाटून राहिली होती. हवा नुसती कुंद आणि ओली झाली होती. कुठल्याही क्षणी पावसाला सुरुवात होणार होती.

माझा ऑफिसात जायचा बिलकूल मूड होत नव्हता. पण घरी राहिलं की सरोजच्या कटकस्या स्वभावाला तोंड द्यावं लागणार होतं. अलिकडे तिचा स्वभाव चमत्कारिक होत चालला होता. रात्री हसत हसत सारा देह मला अर्पण करणारी, आमचा शृंगार फुलवणारी सरोज दिवसा मात्र तिरसटल्यासारखी कुढल्यासारखी वागत होती. अर्थात याचं कारण मला माहित होतं.

नंदिता !–माझ्या पहिल्या बायकोपासून झालेली माझी मुलगी नंदिता !

नंदिताचं आस्तित्व तिला खुपू लागलं होतं. तिचं हसणं–मोठ्यानं गाणं म्हणणं–भातुकली खेळणं–सारं सारं सरोजला नकोसं झालं होतं कधीतरी ती तिला मारूही लागली होती. मी मधे पडलो की ती म्हणे–'तुला काय कळणार–मला तिला नीट वळण लावलं पाहिजे–नाहीतर लोक म्हणतील सावत्र आईनं पोरीला बिघडवलं–!' काळे निळे वळ उठेपर्यंत मारणं म्हणजे वळण लावणं नव्हे हे मला तिला सांगावसं वाटत होतं.

पण सरोजसमोर मला जास्त बोलताच येत नसे. कबूल करायला लाज वाटते, पण मी तिच्या सौंदर्याचा, देहाचा अक्षरशः गुलाम झालो होतो. चाणाक्ष सरोजनं ते नेमकं ओळखलं होतं. माझ्यासमोर माझ्या पोटच्या पोरीला ती जी वागणूक देत होती ती मला चकार शब्द न बोलता सहन करावी लागत होती.

मी आंघोळ करून बाहेर आलो. आश्चर्याची गोष्ट म्हणजे सकाळपासून सरोजचं नंदिताला ओरडणं ऐकू आलं नव्हतं. सरोजची स्वैपाकघरातली खुडबुड जाणवत होती, पण नंदिता कुठेच दिसत नव्हती.

काळोख आणखीनच वाढला म्हणून मी दिवा लावला. दिवाणखान्यातसुद्धा नंदिता नव्हती. मग गेली कुठे ही ? काल रात्री डायनिंग टेबलवर दुधाचे दोनचार थेंब सांडले म्हणून सरोजनं तिला खाडकन् थोबाडीत मारली होती. रडण्याचीसुद्धा चोरी. बिचारीनं डस्टर आणून ते थेंब पुसले होते आणि मग एकटीच ती मुसमुसत तिच्या बेडवर झोपली होती. अंधारात ती आपलं मन मोकळं करून रडली असावी–मध्येच मी उठून पाहिलं होतं–तिची उशी चिंब भिजली होती. खरं तर काल तिच्याजवळच तिला कुशीत घेऊन झोपण्याची अनावर इच्छा मला झाली होती. पण सरोजला ते समजलं असतं तर खैर नव्हती. लग्न झाल्यापासून सरोजनं तिला एकटीला झोपायला भाग पाडलं होतं.

आपली ही दुसरी आई पपांना आपल्या पासून हिरावून घेते आहे–आपण एकट्याच पडलो आहोत असे भाव अलीकडे मला तिच्या डोळ्यात दिसू लागले होते. ती कुठे पळून बिळून तर––

बाहेर एकाएकी पावसाला सुरुवात झाली. मी खिडकीशी आलो–पाऊस पहाता पहाता वाढला. धुक्या-सारखा दाट पडदा तयार झाला.

"चहा घे !" सरोजचा आवाज आला. तिनं गरम गरम चहा आणि नाश्ता आणला.

"नंदिता दिसत नाही कुठं !" मी खालच्या आवाजात म्हणालो, "दूध प्याली का ती ?"

"तुला नको काळजी ! काही सुकून मरून जात नाहीये ती !–आणि कुठे पळूनसुद्धा जात नाहीये, एवढं रात्री मारलं तर कोडगी मेली–सकाळी येऊन चिकटली दूध दे म्हणून !–बसलीय बाहेर व्हरांड्यात !"

"नंदिता–" मी हाक मारली.

"आता कशाला–! मला सुखासुखी नाश्ता करू दे





अनुक्रमणिका

की ! ब्याद मेली ! " सरोजचे डोळे पाहून मी घाबरलो. रात्री धुंद होणारे बदामी डोळे आता चेटकीसारखे क्रूर दिसत होते. मला तिच्याकडे पाहवलं नाही. मी खाल-मानेनं चहा पिऊ लागलो.

" आता नीघ लवकर—नाहीतर उशीर होईल—पाऊस आहे." सरोज कपबशा आवरत म्हणाली.

" हो—हा काय निघालोच ! " मी बळेच हसून म्हणालो,

बॅग घेतली आणि बाहेर व्हरांड्यात आलो.

नंदिता लाकडी कठड्याला डोकं टेकवून उभी होती.

आमच्या बंगल्याच्या व्हरांड्याला कौलारू छत होतं. कौलातून पागोळ्या पडत होत्या.

माझी चाहूल लागताच ती वळली— " पपा, पपा ! अमित आलाय ! "

" खरंच, लहान मुलं दुःख किती चटकन् विसरतात ! तिचा चेहरा अनामिक आनंदानं फुलला होता. ती पुन्हा म्हणाली, " पपा— अमित आलाय ! तो बघा ! "

" कुठाय ग ? " मी हसून पुढे झालो.

" पळाला, तो बघा ! तुम्हाला पाहून ! आतापर्यंत माझ्याशी बोलत होता ! " नंतर ती मोठ्याने ओरडून म्हणाली, " अमित, पुन्हा ये हं खेळायला ! "

मी तिचा गालगुच्चा घेतला, " लबाड कुठली— माझी थट्टा करतेस काय ? "

तिच्या डोळ्यात आश्चर्य उमटलं— " थट्टा नाही पपा ! खरंच आला होता— माझ्याशी बोलला."

मी ' बरं— बरं— ' म्हणून तिला जवळ घेतलं, " पावसात जाऊ नको— भिजशील, सर्दी होईल ! घरातच खेळ— आईला त्रास देऊ नको." वगैरे समजावून मी तिचा पापा घेतला.

नंदिता ' बाय ' करून घरात गेली.

मी पावसातून छत्री उघडून चालू लागलो.

नंदिताच्या बोलण्यानं मला एकदम अस्वस्थ करून टाकलं होतं.

नंदिता साफ खोटं बोलत होती. अति दुःखात स्वतःच स्वतःची समजूत काढत असल्यासारखी.

ज्या अमितविषयी ती ' आला, बोलला ' वगैरे सांगत होती तो अमित वर्षापूर्वीच टायफॉइडनं मरण पावला होता.

आपल्या जुन्या खेळगड्याविषयीची आठवण आज नंदिताला अचानक का यावी ?

: २ :

गेले काही दिवस सरोज मला मुद्दामहूनच आपल्यात गुंतवून ठेवते आहे. अगदी जाणीवपूर्वक. मी नंदिताकडे दुर्लक्ष करावं म्हणून ! पण पोटच्या पोरीविषयीचं प्रेम एवढ्या सहजासहजी थोडंच आटून जाणार ?

मी जवळ जवळ आठवड्याभरानं नंदिताच्या खोलीत डोकावले. मधले दिवस मी एकतर घरात नसायचो किंवा सरोजबरोबर बाहेर गेलेला असायचो. आणि नंदितासुद्धा मला वाटतं विशेष हसत फिरत नव्हती.

आज मुद्दाम तिची खबरबात घेण्यासाठी वेळ काढला.

नंदिता कुणाशी तरी बोलत होती.

" छट ! माझे पपा चांगलेच आहेत मुळी ! "

" ...... "

" आई ना ? दुष्ट आहे... मला मारते... "

" ........ "

" खरंच सांगतोस ?— पण केव्हा.... ? "

" नंदिता—कुणाशी बोलतेयस ? " मी तिची तंद्री मोडली.

" पपा—पपा, तुम्हाला अमित बघायचा होता ना ? हा बघा ! "— नंदिता धावत माझ्याकडे आली.

मी तिला उचलून घेतलं. तिचा पापा घेतला.

" पपा—तो बघा अमित—त्याच्याशी बोला ना ! " नंदिता उत्साहात म्हणाली. मग स्वतःच थांबली, कावरी-बावरी झाली— " आता होता. तिथे बसला होता."

" अग मला लाजून पळून गेला असेल ! " मी तिला समजावलं. आम्ही दोघे खिडकीशी बेडवर बसलो.

" असाच आहे अमित !- कुणी आलं की पळून जातो. मी त्याच्याशी बोलणारच नाही जा ! " नंदिता फुरंगटून बसली.

" हे बघ नंदिता— असा वेडेपणा करायचा नाही." मी तिच्या पाठीवरून हात फिरवत बोलू लागलो " अमित कसा येईल आता ? अमित देवाघरी गेलाय तुला माहितेय ना ? देवाघरी गेलेलं माणूस परत येत नसतं. त्यापेक्षा मी तुला नवीन खेळ आणून दिलेत—त्यांच्याशी खेळ ! "

नंदिता काही न बोलता उठली—कपाट उघडून तिनं दहा बारा ' फेअरी—टेल्स 'ची पुस्तकं दाखवली. " ही मला अमितनं आणून दिली. माझा वेळ जावा म्हणून !










अमित म्हणतो– ' मला जमणार नाही. खूप वेळ इथे यायला ! ' म्हणून त्यानं मला ही पुस्तकं दिली ! " आणि तुम्ही म्हणता तो येत नाही म्हणून ? "

मी चकित झालो. एक पुस्तक उघडलं, त्यावर नाव होतं– " अमित रानडे."

मी अत्यंत काळजीनं नंदिताकडे पाहिलं. नंतर उगाचच हसून म्हणालो, " ओके ! ॲग्रीड ! तुझा अमित इथे येतो ! बस ! "

" पपा आणखी एक सिक्रेट आहे–आईविषयी ! अमितनंच सांगितलंय ते मला ! पण ते इतक्यात नाही सांगणार तुम्हाला ! " नंदिताची कळी पुन्हा खुलली. ती पुस्तकात तोंड घालून बसली.

मी तिच्या खोलीतून बाहेर आलो.

नंदिताचा हा ' खेळ ' वाढत चालला होता ' खेळ ' की ' वेड ? ' स्वतःच्या एकटेपणावर तिनं शोधून काढलेला हा उपाय होता की– की ती कुठल्यातरी मानसिक रोगाची शिकार होत होती ?

संध्याकाळी मी रानड्यांकडे गेलो. अमित त्यांचा एकुलता एक मुलगा होता. अत्यंत लाघवी. गेल्यावर्षी तापातच त्याचा अंत झाला होता. नंदिता दोन तीन दिवसात इथे आली होती का ? असं त्यांना मी विचारलं.

दोघांनाही त्याविषयी नक्की सांगता आलं नाही. मात्र अमित गेल्यापासून नंदिता अजिबात फिरकत नव्हती एवढं खरं ! रानडे पुढे म्हणाले " इथं येऊन आमच्या नकळत पुस्तकं नेली असली तरी काही हरकत नाही. ती एकटी असते. पुस्तकांमुळे तिचा वेळ जाईल. पण अमित येतो वगैरे जर ती सांगत असेल तर तुम्ही तिला एखाद्या सायकियाट्रिस्टला दाखवणं योग्य ! "

मी डॉक्टर मोकाशीला भेटायचं आधीच ठरवलं होतं.

: ३ :

" हे बघ, कॉलेजनंतर आपली जवळ जवळ भेट नाहीच आणि केसच्या दृष्टीनं हिस्टरी डिटेलमधे हवी." मोकाशी म्हणाला, " तेव्हा तू नंदिताच्या जन्मापासून सगळं सांगावंस हे उत्तम ! "

मी सांगायला सुरूवात केली.

" माझ्या पहिल्या बायकोचं नाव सुलभा. दिसायला ती विशेष चांगली नव्हती. काळी सावली, शिडशिडीत ! पण वडिलांनी माझं लग्न तिच्याशी ठरवलं होतं. वडिलांची इच्छा म्हणून मी केलं.

वर्षभरात नंदिताचा जन्म झाला. त्यानंतर सुलभाची तब्येत दिवसें दिवस ढासळतच होती. मुळात ती अशक्त– त्यात न मानवलेलं बाळंतपण ! मी तिची शुश्रुषा करायचो, नंदिताचा सांभाळ करायचो.

सुलभाविषयी मला राग नव्हता. पण आमच्यात प्रेम असं वाढीस लागलं नव्हतं. मला वाटतं नवरा-बायकोतलं प्रेम वाढीस लागायला संभोगसुख महत्त्वाची भूमिका बजावतं. आमचे संबंध कधी विशेष रंगलेच नाहीत.

सुलभा त्या आजारातच वारली. मला विशेष दुःख झालं नाही. काळजी होती नंदिताची. तिच्याविषयी माझ्या मनात विलक्षण जिव्हाळा उत्पन्न झाला होता. दुसरं लग्न करण्याच्या मी विरुद्ध होतो.

सुलभा गेली आणि माझे करिअर एकदम डेव्हलप होऊ लागले. मी आमच्या फर्ममध्ये सेल्स मॅनेजर झालो. थोड्याच दिवसात मी हा बंगला विकत घेतला. नंदिताला सांभाळायला मी आता एक बाई ठेवली होती. दिवस जात होते. पण माझं काही तरी हरवल्यासारखं मला वाटत होतं. काही तरी कमतरता आहे असं वाटत होतं.

एके दिवशी अचानक सरोजशी गाठ पडली– एका पार्टीत... पुरुषाला भुरळ घालणारं वेगळंच सौंदर्य होतं तिच्याकडे. मी जाणीवपूर्वक तिच्यापासून दूर राहू लागलो. पण सरोजनं पिच्छाच पुरवला होता.

मला जणू काही जिंकून घेण्याचा तिनं चंगच बांधला होता.

तिनं हळूहळू घरात प्रवेश मिळवला. नंदिताला लळा लावला.

नंदिता आता चांगली पाच-सहा वर्षांची झाली होती.

समोर रानडे रहायला आले. नंदिताची आणि छोट्या अमितची छान गट्टी जमली. एकत्र शाळेत जाणं, खेळणं, खाणं ! एवढंच काय कधी कधी नंदिता रानड्यांच्या बंगल्यातच झोपू लागली. तिचं विश्व अमितमय झालं होतं.

एकाकी नंदिताला खेळगडी मिळालेला पाहून मी समाधानाचा निःश्वास टाकला. मी तिला चांगल्या मॅनर्स शिकवल्या होत्या. तिचा स्वभाव नम्र होता. एकदा सौ. रानडे म्हणाल्या, " आईची उणीव तुम्ही अजिबात भासू दिली नाहीत."

ते ऐकून मला धन्य वाटलं. एक जबाबदारी आपण यशस्वीरीत्या पार पाडली असं वाटलं.

आता माझं मन एका वेगळ्याच वाटेवरून धावू लागलं—

सरोज! क्षणोक्षणी माझ्याजवळ यायला धडपडणारी सरोज! फक्त माझा प्रतिसाद देण्याचाच अवकाश होता. आपला पुष्ट देह माझ्यावर ओवाळून टाकण्यासाठी सरोज उत्सुक होती.

देहसुख— आजपर्यंत मला कधीच न मिळालेलं— सुलभाशी जे केलं होतं— त्यातून पूर्ण समाधान कधीच मिळालं नव्हतं. निव्वळ यांत्रिक क्रिया होती.

सरोज जवळपास असली की रक्त उसळू लागतं असं वाटू लागलं. सगळ्या शरीरातून कसली तरी अनोळखी संवेदना सरकते आहे—आजपर्यंत कधीच न भेटलेली संवेदना——

सरोज कित्येकवेळा बंगल्यावर येत होती. जेवून खाऊन रात्री परत हॉस्टेलवर जात होती.

एका रात्री मी निश्चय करून तिला मिठीत घेतलं. तिनं सारा देह मला अर्पण केला.

यथावकाश आम्ही लग्न केलं. नंदिता जाम खूष होती. सरोज तिला सांभाळत होती. सरोजनं "आपण तिघांनी सहलीला जाऊ" असं सुचवलं.

आम्ही तिघं बंगलोरला जाऊन परतलो. आल्यावर कळलं की अमित सिरियस आहे.

त्याला हॉस्पिटलमधे ठेवला होता. नंदिता त्याच्या जवळ बसून राहू लागली—चार चार तास! तो बरा होण्याची वाट पाहू लागली.

पण कसलाच उपयोग झाला नाही.

अमित शेवटचा दिवस बेशुद्धीतच होता. त्यातच त्याचं प्राणोत्क्रमण झालं.

नंदिता एकदम उदास झाली. खेळणं, खाणं सोडून तास तास एकटीच बसून राहू लागली.

बरेच दिवस मला कळलं नाही—पण सरोजच्या वागण्यतसुद्धा हळूहळू बदल होत होता.. किंवा मुद्दामच ती हळूहळू बदल करत होती.

माझ्या लक्षात येईपर्यंत खूप उशीर झाला.

सरोजला विरोध करावा एवढी शक्ती माझ्यात आता उरलीच नाही. तिनं मला स्वतःमधे एवढं गुंतवून ठेवलंय की मी तिच्यापुढे काही बोलूच शकत नाही.

सरोजच्या देहाचा उपभोग हे माझं आता व्यसनच झालं आहे. कदाचित एखाद्या गोष्टीपासून फार दिवस वंचित रहावं लागलं आणि ती अचानक मिळाली की असंच होत असावं.

त्यात बिचाऱ्या नंदिताचा बळी जातो आहे. असं होता कामा नये. एकाकीपणामुळे ती मनोविकाराची रूग्ण होऊ नये असं मला वाटतं."

मी बोलणं संपवलं. आणि मोठ्या अपेक्षेनं डॉक्टर मोकाशीकडे पाहू लागलो.

## : ४ :

डॉक्टर मोकाशीनं जे सांगितलं ते लवकरच खोटं ठरलं.

तो म्हणाला होता, "हा तिचा खेळ आहे. अनेक खेळांपैकी एक! मन रमवण्याचा! दुसरा कुठलातरी सापडला की हा ती विसरेल!"

पण ती विसरली नव्हती.

एके दिवशी ती दबकत दबकत माझ्याकडे आली. आसपास कानोसा घेऊन तिनं माझ्या कानात सांगितलं, "पपा, अमितनं मला सांगितलंय—आई मला ठार मारणार आहे. सावध रहा म्हणून!"

मी चमकून तिला एकदम जवळ ओढलं. खेळच असेल तर खूप वाढला होता. पण आता मला वाटलं की हा खेळ नसावा—मनोविकारही नसावा—हा असावा 'सिक्स्थ सेन्स! नंदिताला जाणीव होत असावी—संभाव्य धोक्याची! अमित येणं—बोलणं—हा त्या सहावं इंद्रियं विकसित होण्याचा भाग असावा—तिचा बाळबुद्धीनं तिनं त्याला 'अमित' असं नाव दिलं असावं.

नंदितानं आपले सावळे कृश हात माझ्या गळ्याभोवती गुंफले होते. भीतीनंच की काय तिचं शरीर किंचित थरथरत होतं.

मी त्यानंतर सरोजवर बारीक नजर ठेवू लागलो. तिच्या मनाचा ठाव घेण्याचा प्रयत्न करू लागलो. तिच्या मनातला नंदिताविषयीचा तिरस्कार वाढत होता एवढं निश्चित! पण त्याची मजल खुनशीपणापर्यंत जाईल असं मला अजून वाटत नव्हतं.

आठ दहा दिवसानंतर माझी मलाच लाज वाटली. सरोजच्या वागण्यातून, बोलण्यातून मला बिलकूल कुठला कट जाणवला नाही. उलट ती एक दोनदा म्हणालीसुद्धा "अलिकडे नंदिता शहाण्यासारखं वागू

लागलीय नाही ? "

नंदिताच्या खुल्या बोलण्यावर विश्वास ठेवून मी नाही नाही ते विचार मनात आणत होतो. सरोजवर नाहक संशय घेत होतो.

त्या दिवशी मी सकाळी उठलो आणि अचानक आरडाओरडा. मला नंदिताच्या खोलीत ऐकू आला. मी धावत तिथे गेलो.

सरोज नंदिताला मारत होती. ग्लास खाली पडला होता. दुध सगळीकडे पसरलं होतं–एक मांजर ते पीत होतं.

"कार्टीला ग्लास सांभाळायला नको ! ते मांजर कुठून आलं– आणि सगळं दूध लवंडून टाकलं. आता काय म्हणायचं हिला ? " सरोजनं नंदिताला आणखी एक थोबाडीत मारली. नंदिता हेलपाटली– मागे पडली.

पण आश्चर्य असं की ती अजिबात रडत नव्हती. त्यानं सरोजला आणखी चीड येत होती.

पहाता पहाता मांजरानं सारं दूध साफ केलं. त्याच-वेळी ते भयंकर दृश्य मला पहायला मिळालं.– मांजर एकाएकी गरगर फिरू लागलं– स्वतःभोवती ! ते हळू हळू खाली कोलमडलं– त्याचे हातपाय ताठरले– मिनिटा-दोन मिनिटात त्यांची सारी हालचाल थंडावली.

" सरोज– " मी ओरडलो– " तू नंदिताला...."

पुढे होऊन मी नंदिताला जवळ ओढलं–

सरोज काही बोलली नाही. सरकत सरकत ती दाराकडे गेली. आणि एकदम वळून धावत सुटली.

मी नंदिताला जवळ घेऊन तिचे मुके घेऊ लागलो. माझ्या काळजाचं पाणी झालं होतं.

शेजारी मांजर मरून पडलं होतं– त्याजागी मला नंदिता दिसत होती. हातपाय ताठरून पडलेली– तोंडातून फेस– निष्प्राण...

मी नंदिताला कुरवाळत स्वतःशीच बोलू लागलो– " मी तुला आता इथे ठेवणार नाही. बोर्डिंगमध्ये ठेवीन– पण या कैदाशिणीच्या जवळ नाही..."

त्याच दिवशी मी तिला डॉक्टर मोकाशींच्या क्लिनिकमध्ये ठेवलं. त्यानंतर दोन दिवसात मी बोर्डिंगची व्यवस्था करणार होतो.

" पपा– " डॉक्टर मोकाशींकडं जाताना नंदिता सांगत होती– " मी मेलेच असते. पण अमितनं मांजर सोडलं. अमित म्हणाला– मी तुझं रक्षण करीन."

नंदिताला पुण्याला बोर्डिंगमध्ये ठेवलं. तिची सगळी व्यवस्था नीट लावली. त्यानंतर आठ दिवस मी सरोजशी शब्दही बोललो नाही.

एके रात्री ती माझ्या अंथरुणात आली आणि ढसा-ढसा रडू लागली. मी तिला झिडकारलं– दूर लोटलं.

" मला क्षमा कर रे ! मी वाईट आहे, पापी आहे. मी तिच्या दुधात विषारी औषध टाकलं-क्षणिक मोहाच्या आहारी जाऊन मी केवढीतरी मोठी चूक करत होते–पण मांजरामुळे ती वाचली-मला ठार मार–माझा गळा दाब, पण माझ्याशी असा अबोला धरू नकोस ! नाहीतर मी वेडी होईन !–वेडी होईन ! " ती थडथडा जमिनीवर डोकं आपटू लागली.

तिच्या डोक्यातून रक्त वाहू लागलं. मी तिला उचललं, उगाच ढोंग करू नकोस ! तुला नंदिता नको आहे-तू तिचा खून करणार आहेस. तुला घटस्फोट देण्यावाचून दुसरा उपाय नाही."

" मी तुझ्या पाया पडते–तू माझी परीक्षा घे वाटल्यास ! पण मला दूर करू नकोस. आपल्या नंदिताला पोरक्या पोरीसारखं बोर्डिंगमधे ठेवू नकोस." अत्यंत लाचार होऊन बोलत होती, " तू माझा दुस्वास पाहिलास ? आता प्रेमही बघ. त्या दिवसानंतर मी पार बदलले आहे."

देव जाणे, पण मी सरोजला एक संधी द्यायचं ठरवलं.

नंदिताला बोर्डिंगमधे भेटायला जाण्याचा तिनं हट्ट धरला. मी तिला घेऊन गेलो. तिनं बाहेरची पॅकबंद बिस्किटं विकत घेतली. "तुला वाटेल मी तिला पुन्हा विकत देईन म्हणून बिस्किटं घेतली." माझ्या काळजात कुठेतरी हललं.

नंदिताही सरोजशी चांगली वागली. नंदिताला तिनं तिच्या डोळ्यातून पाणी ओघळलं.

समाधानाची गोष्ट अशी की नंदितानं बोर्डिंगमधे 'अमित'चं नावही घेतलं नव्हतं.

ती त्याला विसरून गेली होती.

: ५ :

नंदिताला मी घरी आणलं–एकाच दिवसासाठी.

सरोजच्या उत्साहाला भरतं आलं होतं. तिनं नंदिताला स्वतः आंघोळ घातली. तिला काही खायला द्यायचं असेल तर ती आधी स्वतः खात असे...तेच उष्टं नंदिताला भरवत असे.

दिवसभर सरोजच्या प्रेमानं नंदिता गुदमरून गेली.

संध्याकाळी मी तिला बोर्डिंगमधे पोचवलं. गाडीत नंदिता म्हणाली,

" पपा मला बोर्डिंगमधे आवडत नाही हो–अगदी कंटाळा येतो ! "

" मग घरी रहायला येणार तू ? " मी तिला विचारलं.

" हो येणार आहे–पण इतक्यात नाही." ती ठरवल्यासारखं बोलत होती.

" इतक्यात नाही म्हणजे काय ? " मी विचारलं.

" आज अमित येऊन मला भेटला. तो म्हणाला, तुझी आई विचित्र आहे. तू लांब आहेस म्हणून तिला तुझ्याविषयी प्रेम वाटतं आहे. जवळ रहायला आलीस तर पुन्हा ती तुझा द्वेष करील–तुला मारायचा प्रयत्न करील ! त्यापेक्षा तू काही दिवस तरी लांबच रहा ! "

नंदिता सांगत होती–मी लक्षपूर्वक ऐकत होतो. नंदिता सरोजच्या स्वभावाचं अचूक वर्णन करीत होती.

" काही दिवस ? ते का ! " मी विचारलं.

" कोण जाणे–तेवढ्यात तुम्ही आलात आणि तो पळून गेला."

हा ' अमित ' म्हणजे काय प्रकार आहे हे मला कळेना– एखाद्या मोठ्या माणसासारखी बोलण्याची अक्कल त्याच्यामुळे नंदिताला येत होती. की स्वतःचेच विचार ती अमितच्या नावे व्यक्त करीत होती ? मग मांजरानं ग्लास लवंडून टाकण्याचा प्रकार केवळ योगायोग असावा का ?

अजून काही दिवस तरी मी नंदिताला बोर्डिंगमधेच ठेवायचं असं ठरवलं. तिच्या त्या अमित प्रकरणावर विश्वास बसला म्हणून नव्हे तर निव्वळ सावधगिरी म्हणून !

सरोज बदलली होती–नंदितावर प्रेम करू लागली होती. सगळं खरं !– पण नंदितानं म्हटल्याप्रमाणे तिच्या स्वभावातला विचित्रपणा मला देखील जाणवला होता. असाच प्रेमाचा वर्षाव ती लग्नाआधी नंदितावर करत होती– पण लग्न झाल्यावर प्रत्यक्ष सहवास आल्यावर

ती नंदिताचा द्वेष करू लागली होती– तसंच आताही झालं तर ?

एके रात्री माझ्या बाहुपाशात असताना सरोज म्हणाली, "अजूनही तुला माझ्याविषयी संशय येतो ना ?"

"संशय ?–छे–मुळीच नाही." तिच्या कपाळावरच्या बटा दूर सारत मी म्हणालो.

"नाही तर काय ? अजूनही मी तिला विष देईन असं वाटतंय तुला ! बिचारी नंदिता, आईबाप असून अनाथ मुलीसारखी बोर्डिंगमध्ये रहाते. मी कुठल्या तोंडाने सांगू तुला ?" सरोजचे डोळे पाण्यानं भरून आले– आवाज गदगदला– "तिचा जीव घ्यायचा प्रयत्न करणारी खुनी बाई मी– पण तरी सांगते– प्लीज तिला घरी आण रे ! तिला घरी आण !" सरोज चक्क रडू लागली. माझी छाती अश्रूंनी भिजून गेली. मी तिची मान वर करून तिच्या डोळ्यात पाहिलं– त्यात आर्जव होतं– विनवणी होती.

"तुला नंदिता हवीय ना ? मी उद्याच तिला घेऊन येतो." मी तिला आश्वासन दिलं.

सरोजला एकदम हसू फुटलं. विलक्षण आनंदल्यासारखी ती माझे मुके घेऊ लागली– मला कुरवाळू लागली.

तिचा आनंदही विचित्र होता– दुधात विष घालून नंदिताला ठार मारण्याचा प्रयत्न करणारी सरोज आता तिच्या आगमनाच्या कल्पनेनं अक्षरशः खुळावल्यासारखी झाली होती.

दुसऱ्या दिवशी सकाळी मी नंदिताला आणण्यासाठी पुण्याला गेलो.

: ६ :

भयंकर ! फारच भयंकर !

जे घडलं त्यावर चटकन विश्वाससुद्धा बसला नाही.

नंदिताला घेऊन मी परत आलो. बंगल्याजवळ आलो, तोच तिथे जमलेली गर्दी दिसली.

रानडे पुढे आले आणि त्यांनी ती बातमी मला सांगितली.

"तुमची मिसेस सरोज– सैंपाक करताना पदर पेटून भाजली. दुपारची वेळ– आजूबाजूला बंगल्यामधून फारशी माणसंही नव्हती. तिला हॉस्पिटलमध्ये नेलं आहे."

नंदिताला त्यांच्या ताब्यात देऊन मी वाऱ्यासारखा हॉस्पिटलकडे धावलो, पण खूप उशीर झाला होता.

अर्ध्या तासापूर्वीच सरोज मरण पावली होती.

तिच्या प्रेताची अवस्था पहावत नव्हती. जो देह मी विलक्षण धुंदीत उपभोगला होता, त्याचा जळून कोळसा झाला होता– अर्धवट जळालेलं मांस जागोजाग लोंबत होतं– आणि विलक्षण दुर्गंधी येत होती.

आज पाच सहा दिवस झाले तरी सरोजचा भाजून विद्रूप झालेला चेहरा डोळ्यासमोरून जात नाही. तिचा विचार डोक्यातून जात नाही.

स्वैपाक करताना नेहमी सावध रहाणाऱ्या सरोजचा पदर पेटला कसा ? तिनं खूप आरडा ओरडा केला असेल–स्वैपाकघरात पळत्या अवस्थेत ती सैरावैरा धावली असेल–तिला तसंच धावत बाहेर येऊन मदतीसाठी हाका मारता आल्या असत्या. पण ती स्वैपाकघरात कोंडून घातल्यासारखी आक्रंदत राहिली. कारण मुळात तिला स्वैपाकघराचा दरवाजा उघडताच आला नाही.

"कुणालाच उघडता आला नसता," रानडे सांगत होते, "सरप्रायझींग पार्ट ऑफ इट–म्हणजे–दरवाजाला बाहेरून कडी होती–स्वैपाकघराच्या दरवाजाला ! मी जेवून पडलो होतो–ओरडण्याचा आवाज दूरवरून आल्यासारखा वाटला–प्रथम दुर्लक्ष केलं–पण थांबेना, म्हणून बाहेर आलो–आवाज तुमच्या बंगल्याच्या रोखानं येत होता ते कळताच मात्र मी धावलो–बंगल्यात शिरलो–

"स्वैपाकघराच्या दरवाजाची कडी काढली–आणि तुमच्या मिसेसनं एकदम माझ्यावर उडीच घेतली, पण ओरडून ओरडून तिची ताकद संपली होती–मी डोळे मिटून तिच्या देहावर चादर गुंडाळली. यू नो–आय कुडन्ट बिअर द साईट ऑफ इट !"

मी वेड्यासारखा स्वतःशीच विचार करत बसतो. सरोजला ही जीवघेणी शिक्षा कुणी दिली असेल ? तिला मदतीसाठी बाहेर येता येऊ नये म्हणून स्वैपाकघराच्या दरवाजाला बाहेरून कडी कुणी घातली असेल ?

तिला त्या जळत्या अवस्थेत स्वैपाकघरात कुणी कोंडून घातलं असेल ?

कुणी ? खरंच, कुणी ?

■

# मराठी कथा : काल आणि आज

म. ना. अदवंत

मराठी कथेची वाटचाल पाहणे हा एक शोध आहे. अनेक वळणांनी व अनेक अंगांनी मराठी कथा समृद्ध होत पुढे पुढे जात आहे. नदीच्या उगमापासून तिच्या प्रवाहाची शोभा पहात पहात संगमापर्यंत येत असताना जसा विविध प्रकारचा परिसर आपले मन आकृष्ट करतो तसेच मराठी कथेची वाटचाल पहात असताना अनेक अंगांनी तिचे घडणारे दर्शन मनाला स्तिमित करते. नदीच्या प्रवाहाचा सर्वच परिसर रम्य असला तरी त्यातील काही टप्पे महत्त्वाचे असतात. कथेच्या बाबतीत तेच आहे. अशा काही टप्प्यांचे विहंगदर्शन घेत आजच्या कथेच्या प्रवृत्तींचा विचार करणे हा या लेखाचा मुख्य उद्देश.

**स्फुट गोष्ट ( १८९०–१९१० )**

हरिभाऊंनी १८९० साली ' करमणूक ' सुरू केले व त्यातून ' स्फुट गोष्टी 'चा जन्म झाला. त्यापूर्वी मराठी कथा प्राचीन साहित्यात कथा–कहाणी–लोककथा–नीतिकथा–आख्यायिका इत्यादी अनेक रूपातून प्रगट होत होती. अव्वल इंग्रजीत ती अनुवादाच्या रूपाने येऊ लागली. पण तिचे स्वरूप नीतिबोधपर तरी होते किंवा अद्भुतरम्य तरी होते. त्या अद्भुतरम्यतेच्या विश्वातून ' स्फुट गोष्टी 'ने कथा वास्तव जीवनात आणली. ती कौटुंबिक बनली– मनोरंजन करता करता बोध पण करू लागली. मध्यमवर्गीयांची सुखदुःखे ती वास्तवतेच्या पातळीवरून रंगवू लागली. मराठी कथेच्या विकासाचा हा पहिला टप्पा.

**संपूर्ण गोष्ट : (१९१०–१९२६)**

मराठी कथेने १९१० पासून वेगळे वळण घेतले. बोधवादाचे व उपदेशाचे जोखड तिने झुगारून दिले आणि मनोरंजन करण्याचे ध्येय तिने स्वीकारले. कथा ही घटनाप्रधानच राहिली–पण कथेची रचना करताना कथानकामध्ये एखादे रहस्य निर्माण करावयाचे व त्याचा शेवटी उकल करून वाचकांना आश्चर्याचा धक्का द्यायचा हे तंत्र तिने स्वीकारले. मध्यमवर्गीय जीवनाचे चित्र रंगवताना ती कल्पनारम्यतेकडे झुकू लागली. या काळात ती ' संपूर्ण गोष्ट ' या नावाने संबोधली जाऊ लागली. कथा सांगताना कथानकाचा संपूर्ण व बारीकसारीक तपशील देण्याचा आग्रह या काळात आढळतो. नव-विवाहित पतिपत्नींच्या संसाराचे मोहक चित्रण हाही या काळातील कथेचा एक महत्त्वाचा भाग ठरला. गैरसमज, रहस्य, योगायोग याचा आश्रय घेतल्याने कथा या काळात कल्पनारम्यतेच्या पातळीवर गेली. वि. सी. गुर्जर, कृ. के. गोखले आदी कथालेखक यांनी या काळातील कथा लोकप्रिय केली– तिला मानाचे स्थान प्राप्त करून दिले. ' मनोरंजन ' ' उद्यान ' आदी मासिकांनी मराठी कथेच्या क्षेत्रात या काळात फार महत्त्वाची कामगिरी केली. मराठी कथेच्या वाटचालीतील हा दुसरा महत्त्वाचा टप्पा.

**लघुकथा : (१९२६–१९४०)**

१९२१ च्या आसपास मराठी कथा वेगळे वळण घेऊ लागली. ' संपूर्ण गोष्ट ' केवळ घटनाप्रधान होती– आता ती कथा व्यक्तीच्या अंतरंगात शिरू लागली, तिच्या भावभावनांची आंदोलने रंगवू लागली. बाह्य घटनेकडून ती व्यक्तीच्या अंतर्मनातील सूक्ष्मभावनांकडे वळली– आणि तिच्या सुखदुःखाचा वेध घेऊ लागली. घटनाप्रधान कथेकडून स्वभावप्रधान लघुकथेत होणारा बदल दिवाकर कृष्णांच्या कथांतून आपणास विशेष जाणवतो. ' अंगणातील पोपट ' ' मृणालिनीचे लावण्य ' ' संकष्ट चतुर्थी ' किंवा ' समाधी ' या त्यांच्या सर्व कथांतून प्रगट झालेली भावनांची नाजुक पखरण व कलेची कोमलता मोठी मनोज्ञ आहे. त्यांच्या सर्व नायक-नायिका अत्यंत हळव्या मनाच्या व भावनाप्रधान आहेत. व्यवहारी जगाच्या टीकास्त्राला तोंड देता न आल्याने आतल्या आत कुढून व कोमेजून जाणाऱ्या आहेत. त्यामुळे त्यांच्या व्यथा मनाला चटका लावतात.

भावप्रगटीकरण करणारी दिवाकर कृष्णांची शैली पण त्यामुळे अतिशय हळुवार व काव्यात्म झाली आहे. याच सुमारास कॅ. गो. गं. लिमये यांनीही कथालेखनास सुरुवात केली होती. 'किस्मत' 'मेकॅनो' यासारख्या त्यांच्या कथा मनोविश्लेषणात्मक कथांचा नमुना म्हणून उल्लेखनीय आहेत.

दिवाकर कृष्णांनी मराठी लघुकथेला जे वळण लावले याचा पाठपुरावा काही प्रमाणात केला वामन चोरघडे आणि कुसुमावतीबाई देशपांडे यांनी. पण १९२६ च्या आसपास मराठी कथेने निराळेच वळण घेतले. आशया-पेक्षा तिने अभिव्यक्तीकडे अधिक लक्ष वेधले. लघुकथेच्या तंत्राचा ऊहापोह होऊ लागला. "कमीत कमी पात्र प्रसंगांच्या सहाय्याने सांगितलेली एकच एक गोष्ट म्हणजे लघुकथा' अशी प्रा. ना. सी. फडके यांनी लघुकथेची व्याख्या करून कथेची सुरवात कशी आकर्षक असावी, तिचा शेवट कसा परिणामकारक असावा, तिच्या कथानकात निरगाठ, गुंतागुंत व उकल कशी यावयास हवी यासंबंधी चर्चा सुरू केली. या बाबतीत त्यांनी पुरस्कारलेली तत्त्वे त्यांच्या कथातून पूर्णपणे प्रतिबिंबित झालेली आढळतात. मराठी साहित्यातच या सुमारास तंत्राचा विशेष प्रभाव पडलेला जाणवतो. प्रा. फडके यांनी मराठी कथेला रेखीवपणा दिला, तंत्रशुद्धता दिली, डौलदार आणि लालित्यपूर्ण भाषा दिली– पण त्याबरोबर कथेतील आशयाकडे त्यांचे दुर्लक्ष झाले. सुखवस्तू पांढर-पेशा जीवनाची व विशेषतः तरुणतरुणींच्या प्रेमभावनेची चित्रेच ती विशेष रंगवू लागली. जीवनाच्या वरवरच्या विसंगतीवरच त्यांनी विशेष भर दिला.

१९२६ ते १९४० या कालखंडावर या तंत्रवादा-चाच पगडा विशेष होता. या काळात 'कलेकरिता कला' 'जीवनाकरिता कला' 'कला आणि नीती' 'कला आणि अश्लिलता' यासारखे वाद विशेष रंगले व काही लेखक ती ती लेबले लावून लेखन करू लागली. वि. स. खांडेकर जीवनवादी लेखक म्हणून ओळखले जाऊ लागले– त्यांनी सामाजिक प्रश्न कथांतून रंगविले. य. गो. जोशी यांनी कौटुंबिक– मध्यमवर्गीय कौटुंबिक-जीवनातील भाव–भावनांची चित्रे रंगविली. वि. वि. बोकील, दत्त रघुनाथ कवठेकर आदी अनेक लेखक मध्यमवर्गीय जीवनाचेच चित्रण करत होती. पण या काळातील कथा जीवनात खोलवर कुठेच गेली नाही. जीवनातील दारुण व्यथांचे दर्शन यातून कुठेच घडत नाही आणि पांढरपेशावर्गापलीकडे त्यांची दृष्टीही फारशी कुठे जाऊ शकली नाही. दिघे–टोकेकर यांनी ग्रामीण परिसरात आपणाला नेले, वि. स. सुखटणकर, लक्ष्मण-राव सरदेसाई, सातोस्कर यांनी प्रादेशिक परिसर निवडला– पण कथा मात्र अद्भूतरम्यतेत, कल्पनारम्य-तेत आणि स्वप्नरंजनातच रमत होती. स्त्री लेखिकांनी स्त्रियांचे प्रश्न कथांतून मांडले. पण मालतीबाई बेडेकर (विभावरी शिरूरकर) किंवा कमलाबाई टिळक यांच्याच कथा विशेष प्रत्ययकारी ठरल्या. त्यामुळे १९४० च्या सुमारास मराठी कथेच्या क्षेत्रात त्याच त्या अनुभूतींची आवर्तने होऊ लागल्याने आणि आशयापेक्षा कारागिरा-कडे अधिक लक्ष दिले गेल्याने कथा कृत्रिम व सांकेतिक बनू लागली. 'आजकाल चांगल्या कथा का लिहिल्या जात नाहीत?' याची चर्चा पण मासिकातून होऊ लागली.

**नवकथा (१९४५–१९६०)**

१९४३–४४ नंतर मराठी लघुकथेने स्वरूप पालटले. नवे कथालेखक क्षितिजावर चमकू लागले व त्यांच्या कथेने स्वरूपही जुनी चाकोरी सोडून नवे स्वरूप धारण करू लागले. या नव्या कथातून जीवनाचे अधिक वास्तव, अधिक सूक्ष्म आणि अनुभवाच्या विविध पातळ्यांवरून घडणारे दर्शन होऊ लागले. ती मानवी मनाचा खोलवर वेध घेऊ लागली. मानवी मनाच्या आतील गाभ्यापर्यंत जाण्याचा प्रयत्न करताना त्यात एक प्रकारचे कुतूहल निर्माण झाले. संशोधक वृत्ती बळावली. अमुकच एक प्रकारचा अनुभव कलाविषय होऊ शकतो ही समजूत नाहीशी झाली. त्यामुळे अनुभूतीच्या कक्षा रुंदावल्या.

नव्याने येऊ घातलेल्या या कथेची पूर्वचिन्हे रा. भि. जोशी, शशिकांत पुनर्वसु, प्रभाकर पाध्ये यासारख्या कितीतरी कथाकारांच्या कथांतून दिसून येत होती. वामनराव चोरघडे व कुसुमावतीबाई देशपांडे यांच्या कथातून ती प्रामुख्याने दिसून येऊ लागली. चिंतनशील मनोवृत्ती व काव्यात्म आविष्कार यांमुळे या दोघांच्या कथातून फडकेप्रणीत कथेपेक्षा निराळा थाट स्पष्टपणे जाणवतो. कहाणी, लोककथा व लोकवाङ्मय यांचा वारसा घेऊन आलेल्या त्यांच्या कथांतून मांगल्य, संस्कार व चिरंतन जीवनमूल्ये यांचा ठसा स्पष्टपणे खोलवर उमटलेला आढळतो. कुसुमावतींच्या कथांतून त्यांची काव्यात्मवृत्ती, चिंतनशीलता व सामाजिक जाणीव यांचा प्रत्यय येतो. दोघाही कथाकारांच्या कथांतून नवकथांची

बीजे स्पष्ट जाणवतात.

१९४५ च्या सुमारास मराठी लघुकथेच्या बदललेल्या स्वरुपाची कल्पना स्पष्ट येऊ लागली. 'सत्यकथा' 'अभिरुची' 'साहित्य' यासारखी नियतकालिके नवी कथा व नवी कविता आवर्जून प्रकाशित करू लागली. आशय आणि अभिव्यक्ती या दोन्ही बाबतीत कथेचा व कवितेचा तोंडवळा बदलल्यामुळे नवकथा व नवकाव्य ही नावे या नव्या प्रवृत्तीच्या कथेला व काव्याला रुढ होऊ लागली.

दुसऱ्या महायुद्धाने जगावर जी विकलतेची व विफलतेची छाया पडली होती व मानवी मूल्ये धडाधड कोसळून पडल्याने जी अश्रद्धवृत्ती समाजाच्या ठिकाणी निर्माण झाली होती त्याचे कटु व प्रत्ययकारी चित्रण कविता व कथा या दोहोतून येऊ लागलं. यंत्रयुगीन संस्कृतीमुळे यंत्राचा गुलाम झालेला मानव, शास्त्रांनी निर्माण केलेल्या नव्या नव्या विध्वंसक अस्त्रांनी बावरलेला मानव, भोवतालच्या परिस्थितीशी जमवून घेता न आल्यामुळे आतल्या आत गुदमरलेला मानव हा मराठी कथेचा विषय झाला. मनोविश्लेषणाच्या तंत्राचा आश्रय करून ही कथा माणसाच्या मनात खोलवर दडून बसलेल्या सुप्त व अर्धसुप्त आशा-आकांक्षेची, दबलेल्या विकारांची व विकृत भावनांची चित्रे रंगवू लागली. त्यासाठी तिने आपले बाह्यस्वरूप व आकारही बदलला. १९४५ नंतरच्या काळातील कथेत होत असलेला हा अन्तर्बाह्य बदल प्रामुख्याने अरविंद गोखले, गंगाधर गाडगीळ, पु. भा. भावे आणि व्यंकटेश माडगुळकर या चतुष्टयींच्या कथातून स्पष्ट जाणवू लागला.

मराठी कथेच्या विकासाला या चौघांच्या कथांचा हातभार प्रामुख्याने लागला असला तरी प्रत्येकाच्या कथेचे स्वरूप वेगळे आहे. व्यक्ती हा अरविंद गोखले यांच्या कथांचा केंद्रबिंदू आहे. व्यक्तीमनाचा वेध घेताना ते त्या व्यक्तीच्या अंतरंगात खोलवर शिरतात व तिच्या अंतर्मनातील व्यथा बोलक्या करतात. त्यांच्या कथाविश्वातील व्यक्ती अनेक थरातील आहेत— पण गोखल्यांचा ओढा सामान्यापेक्षा असामान्यांकडे अधिक आहे. त्यामुळे त्यांच्या कथांतून भेटणाऱ्या व्यक्ती व त्यांची दुःखे सामान्यांपेक्षा काही वेगळी असतात. गंगाधर गाडगीळ यांच्या कथेने मराठी कथेच्या दालनात इतके नवे नवे प्रयोग केले आहेत की, नवकथाकार ही पदवी यथार्थतेने त्यांनाच लागू पडावी. हे सर्व प्रयोग त्यांच्या अनुभूतीतून, आशयाच्या वेगळेपणातून आणि त्यांच्या बहुविध व संपन्न व्यक्तिमत्त्वातून निघाले आहेत. मध्यमवर्गीय समाजात परिस्थितीमुळे, व्यक्तित्वावरील बंधनामुळे, रूढ समजुती व नीतिकल्पनामुळे, दारिद्र्यामुळे आणि जीवनात आलेल्या यांत्रिक चाकोरीमुळे ज्यांच्या भावना दडपल्या आहेत, ज्यांची मने मुर्दाड झाली आहेत, ज्याच्या अंतःकरणाला व्यथांचे अनेक तडे गेले आहेत अशा दुबळ्या व्यथित मनाचे चित्रण गाडगीळांच्या कथातून विशेष झाले आहे. त्या व्यथित मनांच्या संवेदना, त्यातील विकृती व विसंगती, त्यांच्या जाणीवा व नेणिवा यांचे रंगीबेरंगी चित्रण गाडगीळ परिणामकारक रीतीने करतात. गाडगीळांच्या शैलीत अनेक अर्थांची वलये निर्माण करणारे तपशील असतात. आशयाशी एकरूप झालेली त्यांची शब्दसंहिता आहे.

उद्दाम भावना व तिला तोलणारी कणखर व प्रभावी भाषा हा भाव्यांच्या कथांचा विशेष आहे. कोणताही धुंद थरथरता क्षण जिवंत करण्याचे सामर्थ्य त्यांच्या कथेत आहे. प्रेमानुभवाची विविध रूपे भाव्यांनी मोठ्या समर्थपणे रंगविली आहेत. प्रेमभावनेच्या पहिल्या अस्फुट आविष्कारापासून तिच्या उद्दाम वासनेच्या स्वरूपापर्यंत सर्व अवस्था भाव्यांनी उत्कटपणे रंगविल्या आहेत व त्याचे चित्रण त्यांनी अगदी प्रांजळपणे केले आहे. भाव्यांच्या मनाचा सामाजिक आविष्कारही त्यांच्या अनेक कथातून झाला आहे. लोक विलक्षण पात्रे शोधण्याचे त्यांना वेड आहे. अशा व्यक्तींचा भाव्यांनी घेतलेला शोधही भारावून टाकण्यासारखा असतो.

'माणदेशी माणसां'चे दर्शन घडविणारे व्यंकटेश माडगूळकर यांनी आपल्या कथातून वेगळेच विश्व उभे केले आहे. ग्रामीण जीवनाचे चित्रण आजवर अनेकांनी केले. पुष्कळांच्या कथातून अद्‌भुतता आली, काहींच्या कथांतून कृत्रिमता व ग्रामीण जीवनाचे पारंपरिक संकेत आले. पण माडगुळकरांची कथा माणदेशच्या अस्सल कसदार मातीतून निर्माण झाली आहे. म्हणून तिच्यातील जिवंतपणा आपणाला जाणवतो. माणगंगेच्या परिसरातील व्यक्तींचे दारिद्र्य, त्यांचा भोळेपणा, त्यांची कणखर वृत्ती, त्यांचा अडाणीपणा व विकारसुलभता या सर्वांचे दर्शन ते त्यांच्याच अस्सल भाषेतून घडवितात. ग्रामीण कथेला अद्‌भुताच्या आणि कल्पनारम्यतेच्या कोंडीतून सोडवून वास्तव ग्रामीण कथेचा आदर्श त्यांनीच



अनुक्रमणिका






निर्माण केला.

या चार कथाकारांनी कथेच्या क्षेत्रात एक नवे परिमाण निर्माण केले. अनुभूतीच्या कक्षा त्यांनी रुंदावल्या. जीवनातील व्यथांचा खोलवर शोध घेतला. त्यांचा शोध हा माणसांचा शोध होता– माणसाचे मन त्यांनी अंतरबाह्य ढवळून काढले. त्यांच्याच पावलावर पाऊल टाकून नव्या प्रवृत्तीचा मागोवा घेणारे शांताराम, दि. बा. मोकाशी, सदानंद रेगे आदी अनेक कथाकार पुढे आले. माणसाचा अनेक अंगानी शोध घेत या कथाकारांनी मराठी कथेत एक नव्या आंतरिक विश्वाचे बहुरंगी दर्शन घडविले. ग्रामीण कथासुद्धा या काळात अनेक अंगानी बहरली. वेगवेगळ्या परिसरांचे वास्तव जीवन प्रभावी रीतीने उभे करणारे अनेक ग्रामीण लेखक या काळात पुढे आले. श्री. म. माटे, म. भा. भोसले या जुन्या पिढीतील कथाकारांनी उपेक्षितांचे अंतरंग रंगविण्यास सुरुवात केली होतीच. त्यात भर घालून त्याला वेगळे परिमाण देण्याचे कार्य शंकर पाटील, द. मा. मिरासदार, उद्धव शेळके, ग. दि. माडगूळकर, शंकरराव खरात, अण्णाभाऊ साठे, गो. नी. दांडेकर, रा. रं. बोराडे, मधु मंगेश कर्णिक, आनंद यादव इत्यादी अनेक कथाकारांनी साक्षेपाने केले. या कथाकारांपैकी प्रत्येकाचे कथाविश्व वेगळे आहे, परिसर वेगळा आहे, अनुभव व्यक्त करण्याची पद्धती वेगळी आहे. काहींनी कोल्हापूर-साताऱ्याचा परिसर घेतला– काहींनी विदर्भातील परिसराचे चित्रण केले, तर काहींनी तळकोकणचा विभाग निवडला, तर काहींनी आपली कथा मराठवाड्यात नेली. या भिन्न भिन्न परिसरात रुजलेली कथा त्या त्या परिसरातील ग्रामीण जीवनाचे अंतरंग उकलून दाखविते– तेथील कथा, वेदना व यातना यांना वाचा फोडते व तेथील विरोध–विसंगतीचेही दर्शन घडविते. त्यातील प्रत्येकाची कथा वास्तवाच्या भक्कम पायावर उभी आहे. शिवाय त्या त्या प्रदेशातील ग्रामीण कथा त्या त्या प्रदेशाच्या बोलीभाषेतून साकार झाल्याने मराठी भाषेला नवीनच शब्दकळा तिने दिली.

स्त्री जीवनाच्या समस्या, त्यांची सुखदुःखे, त्यांच्या भावभावना याचे चित्रण करण्यासाठी कमला फडके, शांता शेळके, ज्योत्स्ना देवधर, स्नेहलता दसनुरकर, वसुंधरा पटवर्धन आदी अनेक कथालेखिका पुढे आल्या. त्यांची कथा नवकथेपेक्षा जुन्या वळणानेच पुढे गेली आहे–मात्र स्त्रीजीवनातील भीषण व करुण नाट्य त्यांपैकी अनेक जणींच्या कथांतून प्रभावी रीतीने व्यक्त झाले आहे.

१९६० पर्यंतच्या काळात विनोदी कथांची व कथाकारांची पण बरीच गर्दी झालेली आढळते–केवळ विनोदाला वाहिलेली वार्षिकेही या काळात निघाली. तरी पण विनोदी कथांच्या क्षेत्रात कथांचा दर्जा सुमार राहिला. १९२० ते ४५ या कालखंडात चिं. वि. जोशी, प्र. के. अत्रे, वि. मा. दी. पटवर्धन अशी काही नावे जशी नजरेसमोर येतात तशी या कालखंडात पु. ल. देशपांडे, द. मा. मिरासदार, रमेश मंत्री, बाळ गाडगीळ, जयवंत दळवी अशासारखी अनेक नावे पुढे येतात. स्वभावनिष्ठ विनोद, प्रसंगनिष्ठ विनोद यांचे या कथांतून विलोभनीय दर्शन घडते. मानवी स्वभावातील विसंगतीवर आधारलेला विनोद द. मा. मिरासदार, पु. ल. देशपांडे अशांसारख्या काही कथाकारांच्या कथांतून आढळतो. पुष्कळांच्या विनोदात अतिशयोक्ती व अतिरंजिता आढळते तर अनेकांचे विनोदी लेखन हे ललित लेखनाच्या पातळीवरच गेलेले दिसते. विनोदाच्या क्षेत्रात मराठी कथेत जमेची बाजू काही अपवाद वगळल्यास या काळात तरी फार थोडी दिसते.

१९६० पर्यंतच्या काळात कथाक्षेत्रात दोन प्रवाह निश्चितपणे आढळतात. एक गोखले गाडगीळ यांच्या पावलावर पाऊल टाकून जाणारी नवकथा व दुसरा जुने वळण स्वीकारून सरळ साधी गोष्ट उत्कटपणे सांगणारी कथा. दि. बा. मोकाशी, सदानंद रेगे, शांताराम आदी काही कथाकार नवकथेचा मागोवा घेत वाटचाल करत होते, तर महादेवशास्त्री जोशी, श्री. ज. जोशी, 'माणूस' या नावाखाली लिहिणारे अं. शं. अग्निहोत्री अशासारखे अनेक लेखक मराठी कथेच्या रूढ मार्गाने जात होते. मात्र हे दोन्ही प्रवाह मराठी कथेला समृद्ध करत होते. त्यात ग्रामीण कथांचा तिसरा प्रवाहही मराठी कथेला नवा आशय प्राप्त करून देत होता.

**१९६० नंतर**

१९५८ ते १९६० च्या सुमारास मराठी नवकथेला साचलेपणाची कळा आली. तिच्यात तोच तोपणा जाणवू लागला. नवकथा म्हणजे मनोविश्लेषण हे समीकरण एकदा मान्य झाल्यानंतर मराठी कथेत मनोविश्लेषणाकरिता मनोविश्लेषण येऊ लागले. फडके युगात ज्याप्रमाणे कथेच्या तंत्राचा साचा बनला होता तसाच प्रकार नवकथेच्या बाबतीत झाला. ज्या जाणिवा घेऊन नवकथेने





जुन्या कथेची चौकट मोडली त्याच जाणिवांनी एक नवी चौकट नवकथेच्या भोवती उभी केली. त्यामुळे नवकथेतही मनोविश्लेषणाचे साचे, निवेदन पद्धतीचे साचे असे साचे निर्माण झाले. आघाडीच्या नवकथाकारांचे कथालेखनही या सुमारास मंदावले– पुन्हा एकदा मराठी कथेत पोकळी निर्माण झाली.

पण ही मरगळ फार काळ टिकली नाही. १९६०च्या सुमारास मराठी साहित्यात पुन्हा एकदा नवनिर्मितीची लाट आली. जी. ए. कुलकर्णी, चिं. त्र्यं. खानोलकर, विद्याधर पुंडलीक, दिलीप चित्रे, कमल देसाई, विजया राजाध्यक्ष, श्री. दा. पानवलकर, शरश्चंद्र चिरमुले, श्याम मनोहर, अनिल कुलकर्णी, क. दि. सोनटक्के, राजेंद्र बनहट्टी, ए. वि. जोशी आदी नवीन कथा लेखकांची पिढी पुढे आली. त्यांची कथा एका व्यक्तीच्या भोवती न फिरता समूह मनाचे दर्शन घडवून त्यातून माणसाचा शोध घेण्याचा प्रयत्न करू लागली. हा माणसाचा शोध घेताना त्यांना जाणीव झाली, ती त्यांच्या जीवनाच्या अर्थशून्यतेची, वैफल्याची आणि एकाकीपणाची. या जाणिवेमुळे नैराश्याचे एक सावट या काळातील कथांवर पडलेले आढळते.

मराठी कथेला अगदी वेगळ्या टप्प्यावर आणण्याचे महत्त्वाचे कार्य करणारे या काळातील आघाडीचे लेखक आहेत जी. ए. कुलकर्णी. नवकथेचे सर्व सामर्थ्य एकवटून ती त्या कथेच्याही पुढे गेली आहे. नवकथेप्रमाणे त्यांची कथा जीवनातील सूक्ष्म व खोल व्यथांचा शोध घेत असतेच. पण जी. ए. कुलकर्णी यांच्या कथातील यातना जीवघेण्या असतात म्हणून त्यांचा आविष्कारही तितका भेदक असतो. माणसाच्या मनात खोलवर जाऊन त्यांच्या आंतरिक संवेदनाचे चित्रण करताना ते त्या व्यक्तीने सर्व अंतरंग ढवळून काढणारी जी. ए. कुलकर्ण्यांची कथा मानवाच्या अथांग दुःखाचा वेध घेते. त्याच्या कथांतून भेटणाऱ्या प्रत्येक पात्राचे दुःख वेगळे असते. त्यांच्या यातना विपरीत असतात. या दुःखाचा उगम अनेकदा नियतीत असतो, अनेकदा सामाजिक विद्रोहात असतो तर पुष्कळदा व्यक्तीच्या मनात असतो. त्यामुळे जी. ए. कुलकर्ण्यांची प्रत्येक कथा म्हणजे एक वेगळा अनुभव असा त्यांची कथा वाचताना प्रचीती येते. जी. ए. कुलकर्ण्यांच्या कथांचा आणखी एक विशेष असा की, नवकथेप्रमाणे ती कथानक गमावून बसली नाही. तिला ठसठशीत कथानक असते. ते बांधेसूद असते. त्यात बरेच काही घडत असते. आज आता ते रूपकात्मक कथेकडे वळले आहेत. या रूपककथात लोकसाहित्याचे वैचित्र्य आहे, मिथकथांचे सामर्थ्य आहे आणि वैश्विक सत्याचा शोध घेण्याचा तत्त्वचिंतक हव्यास आहे. जी. ए. कुलकर्ण्यांची कथा अशी पृथगात्म आहे.

त्यामानाने विद्याधर पुंडलिक यांची कथा तरल, सूक्ष्म व अतिनाजुक आहे. भावविवशता त्याला मानवत नाही–आणि तरी त्यांची कथा काव्यात्म पातळीवर जाते व भावनेला एक वेगळाच घाट देऊन जाते. याच काळातील चिं. त्र्यं. खानोलकर यांची कथा एका निराळ्याच विश्वात आपणाला नेते. कोकणच्या परिसराची त्यांच्या अनेक कथांना पार्श्वभूमी लाभली आहे. त्या परिसराभोवती जे दंतकथांचे, समजुतीचे व अद्‌भुततेचे वलय पसरले आहे त्याचा ते अतिशय चांगला उपयोग करून घेतातच, पण कोकणच्या परिसराने जे मानवी मन घडविले आहे त्याचाही उपयोग खानोलकरांनी कथेसाठी करून घेतला आहे. दिलीप चित्रे या कालखंडातील एक महत्त्वाचे कथाकार. त्यांच्या कथांचे स्वरूप मराठीतील आजवरच्या कथांपेक्षा भिन्न आहे. 'माझा लेखनस्वभाव निव्वळ वाङ्मयीन संस्कारातून उत्पन्न झाला नाही; स्वतःच्या अस्तित्वशोधाशी जडलेला आहे' असे एके ठिकाणी ते म्हणतात. हा अस्तित्व शोध हाच त्यांच्या कथेचा गाभा आहे तो ते निकराच्या आत्मभावाने घेतात. त्यांची कथानीति, श्लीलअश्लील या वर्गीकरणाच्या पलीकडील असते. त्यांची भूमिका सामाजिक, सांस्कृतिक, व नैतिक मूल्यांवर आघात करणाऱ्या विद्रोहाची वाटते. त्यामुळे त्यांची कथा खूपच वादग्रस्त झाली आहे.

आजच्या काळात मराठी कथेला आणखी एक नवे परिमाण मिळाले आहे. निरनिराळ्या व्यवसायातील किंवा व्यवसायाशी संबंधित लेखक कथालेखन करू लागल्याने कथेचे अनुभव क्षेत्र विस्तारले आहे. त्या त्या व्यवसायातील समस्या, त्यातील संघर्ष, त्यातून निर्माण झालेले प्रश्न व त्यात प्रतिबिंबित होणारा माणसाचा स्वभाव यांचे अनेकांगी चित्रण कथेतून येऊ लागले आहे. त्या त्या व्यक्तीच्या अनुभवाचे ते क्षेत्र असल्याने त्या कथा प्रत्ययकारी बनल्या आहेत. श्री. दा. पानवलकर हे कस्टम्सच्या जीवनातील प्रसंग रंगवतात, अच्युत वर्वे यांनी जाहिरातीचे क्षेत्र कथेसाठी निवडले आहे,

ह. मो. मराठे वृत्तपत्र व्यवसाय आणि वार्ताहराचे जीवन कथातून चित्रित करतात, तर काही कथाकार वैद्यकीय व्यवसायातील अनुभव कथातून रंगवतात. या साऱ्या कथांमधून मराठी कथेचे विस्तारलेले क्षितिज जाणवते. या कथा समूहमन व व्यक्ती यांच्या संघर्षाबरोबरच व्यवस्थापक वर्ग व नोकरवर्ग यांचाही संघर्ष रंगवितात. या सर्व कथातील विशेष हा की, या कथातून त्या त्या व्यवसायातील अगदी बारीकसारीक तपशील पण रंगवला जातो. त्यामुळे कथा पसरट होते. दीर्घकथेकडे ती झुकते. पण तो तपशील कथेमधील वातावरणनिर्मितीच्या दृष्टीने महत्त्वाचा असल्याने तो आगांतुक वाटत नाही.

१९६० नंतर आशय व अभिव्यक्ती या दोन्ही दृष्टींनी मराठी कथेला जी नवीन परिमाणे मिळाली आहेत त्यात पुरुष कथाकारांइतकाच कथालेखिकांचा वाटा मोठा आहे. कमल देसाई, विजया राजाध्यक्ष, सरिता पदकी, ज्योत्स्ना देवधर, वसुधा पाटील, तारा वनारसे अशी किती तरी नावे या संदर्भात पुढे येतात. कमल देसाई यांची कथा आशयाची सूक्ष्मातिसूक्ष्मता व अभिव्यक्तीचा तरलपणा यामुळे एक वेगळीच झेप घेते. संवेदनांच्या व प्रतिमांच्या आधारे त्या आपल्या कथेचा आशय मूर्त करत जातात. मात्र या साऱ्यांतून निरर्थकतेची, वैफल्याची व निष्क्रीयतेची छाया पडली आहे. जीवनाची क्षुद्रता व किरटेपणा यांची भेदक जाणीव त्यांच्या प्रत्येक कथेतून येते. विजया राजाध्यक्ष यांच्या कथा वाचताना काहीतरी अस्पष्ट, धूसर व स्वप्नाळू जगाचे दर्शन आपल्याला घडू लागते. सरिता पदकी, तारा वनारसे, वसुधा पाटील यांचीही कथा नवा तोंडवळा घेऊन येते. ज्योत्स्ना देवधर, इंद्रायणी सावकार, शकुंतला गोगटे, शैलजा राजे, सुधा नरवणे ही आणि अशी अनेक नावे या संदर्भात पुढे येतात. काहींच्या कथा जुन्या वळणाने जात आहेत तर काहींच्या कथांतून नवे नवे प्रयोग करण्याचे सामर्थ्य प्रगट होत आहे. अगदी आजच्या पिढीतील सानिया, अंबिका सरकार, गौरी देशपांडे, उर्मिला शिरूर, राणी उपाध्ये, आशा वगे, पद्मजा फाटक– या कथालेखिका आपला असा वेगळा ठसा कथांवर उमटवीत आहेत. मराठी कथेला निश्चित काही नवे वळण देण्याचे सामर्थ्य यांच्या कथातून आढळून येते.

ग्रामीण कथा ही आजच्या काळात फारशी पुढे गेली नाही. माडगूळकर, शंकर पाटील, शंकरराव खरात, अण्णाभाऊ साठे, द.मा. मिरासदार ही कालची ग्रामीण लेखकांची पिढी ग्रामजीवनाचे जे चित्रण करत होती त्याच्या पुढे आजची ग्रामीण कथा गेली असे वाटत नाही. त्यातल्या त्यात आनंद यादव, चारुता सागर, सखा कलाल यांनी नवी क्षितिजे रंगविण्याचा प्रयत्न केला. खेड्यातील जीवनातील प्रखर वास्तव काहींनी रंगविले– काहींनी विसंगतीवर भर दिला तर काही परंपरागत संघर्षाच्या चित्रणात रमले. आजच्या बदलत्या ग्रामीण जीवनाची दखल त्यातील फार थोड्यांनी घेतली. आज खेडेसुद्धा बदलत आहे, नवीन सुविधा त्यांना प्राप्त होत आहे. रेडियो, टीव्ही. सारख्या सुखसोयी त्यांना प्राप्त होत आहेत आणि शाळा कॉलेजसारख्या शिक्षणाच्या सोयी त्यांना उपलब्ध होत आहेत. शहराशी सतत संपर्क साधत असल्याने आजचे खेडे पार बदलत आहे. या नव्या ग्रामीण जीवनाची, त्यामधील नव्या नव्या समस्यांची व त्यामुळे बदलत चाललेल्या खेडेगावातील माणसाची दखल आजचे किती ग्रामीण कथाकार घेतात? किंबहुना आजचे बरेच ग्रामीण कथाकार हे शहराळलेले आहेत. त्यामुळे ग्रामीण कथेतील वास्तव आज त्यांच्या लेखनातून प्रत्ययाला येत नाही. अर्थात् सन्मान्य अपवाद असतात हे गृहीत धरायला हवेच.

दलित साहित्य हा दुसरा मराठी कथेला नवे परिमाण देणारा जबरदस्त प्रवाह. दलितांबद्दल आजवर अनेकांनी लिहिले–पण त्यातील बरेच दलितेतर होते. सहानुभूती व कणव या भूमिकेतून त्यांनी केलेले लेखन उत्कट असले तरी त्यात आत्मप्रत्ययाचा जिवंतपणा नव्हता. पण दलितांनी ज्या वेळी आपल्या जीवनातील व्यथा तीव्रतेने उभ्या केल्या त्यात एक विलक्षण जिवंतपणा आहे, कारुण्य आहे, आणि चीड पण आहे. विद्रोह हा दलित साहित्याचा आत्मा या कथांतून धारदारपणे जाणवतो. शंकरराव खरात, आण्णाभाऊ साठे ही दलित लेखकांची जुनी पिढी झाली. आज नव्या संवेदना व प्रखर वास्तव जाणीवा घेऊन बाबुराव बागुल, केशव मेश्राम, अर्जुन डांगळे, योगीराज वाघमारे, वामन होवाळ ही नवी पिढी या क्षेत्रात उतरली आहे. विद्रोहाने जरी ही पिढी पेटली असली तरी तिच्या कथांतून व्यक्त झालेले प्रखर वास्तव आपणास नाकारता येणार नाही. आजच्या मराठी कथेत हा जिवंत प्रवाहाचा ओघ साऱ्या रसिकांचे लक्ष वेधून घेत आहे. गावकुसाबाहेरील वस्तीचे या लेखकांनी

घडविलेले दर्शन सर्व दलितेतर समाजाला अन्तर्मुख करावयास लावणारे आहे.

आजच्या मराठी कथेत आणखी काही प्रवाह येत आहेत. आणि ते लोकप्रिय पण होत आहेत. त्यातील एक महत्त्वाचा प्रवाह म्हणजे गुप्त पोलिसी चातुर्याच्या कथा, भयकथा आणि गूढकथा. गेल्या तीन चार वर्षात अशा प्रकारच्या कथांची लोकप्रियता वाढत आहे. 'दक्षता' 'नवल' सारखी नियतकालिके अशा कथांना आवर्जून स्थान देत आहेत. यात खून आहेत, दरोडे आहेत, अनेक विध गुन्हे आहेत. त्या गुन्ह्यांचा शोध करणारे गुप्त पोलिस पण आहेत. वास्तविक हा प्रवाह नवीन नाही. 'करमणुकी'तून पूर्वी अशा स्वरूपाच्या कथा येत, त्याही पूर्वी 'मराठी ज्ञानप्रसारक' मधून मे १८६२ ते जानेवारी १८६३ पर्यंतच्या अंकांतून चार रहस्यकथा आल्या होत्या. १९२० ते ३० च्या दरम्यान गणेश महादेव आणि कंपनी 'चार आणे माला' म्हणून एक पुस्तक दरमहा प्रसिद्ध करत. त्यातही गुप्त पोलिसी चातुर्याच्या कथा असत. तेव्हा हा प्रकार नव्याने आला असे नाही. पण व. कृ. जोशी यांच्यासारख्या डिटेक्टिव्ह ट्रेनिंग स्कूलमध्ये प्राध्यापक म्हणून काम केलेल्या लेखनाने काही सत्यकथा व काही कल्पित कथा अशा स्वरुपात लिहिलेल्या रहस्यकथा हा एक अभिनव प्रयत्न आहे. रहस्यकथांबरोबर 'भयकथा' मराठीत याच सुमारास येऊ लागल्या. द. पां. खांबेटे, धारप या लेखकांनी हा प्रकार रूढ केला. 'गूढ कथा' हीही या काळात मराठी कथेत पडलेली नवी भर. ज्या अनुभवांना तर्कशुद्ध कारण देता येत नाही असे अनेक गूढ अनुभव जीवनात येतात. रत्नाकर मतकरी यांनी अशा गूढकथा लिहून मराठी कथेत एक नवेच दालन उघडले.

यापेक्षा सर्वात अधिक महत्त्वाचा या काळात आलेला प्रवाह म्हणजे विज्ञानकथा. इंग्रजीमध्ये Science Fiction खूपच लोकप्रिय झाले आहे. H. G. Wells पासून या विज्ञान साहित्याची लोकप्रियता पाश्चात्य देशात बरीच वाढली आहे. आपणाकडे अशा 'विज्ञान कथां'चा प्रवाह श्री. जयंत नारळीकर यांनी आणला. 'यक्षाची देणगी' हा त्यांचा कथासंग्रह त्या दृष्टीने मराठी कथेत नवीन भर घालणारा आहे. ही विज्ञान कथा लोकप्रिय झाली—पण जयंत नारळीकरांना मिळालेले हे यश त्यांच्यापुरतेच मर्यादित राहिले. मराठी कथा-सृष्टीत आलेले हे चार प्रवाह कथेला एक वेगळेच वळण देऊन जाते. 'भयानक' आणि 'अद्‌भुत' हे रस मराठी कथेत तसे प्रथमच येत नसले (कारण 'करमणु-की'तून अनेक पिशाच कथा प्रसिद्ध झाल्या होत्या.) तरी त्याला एक जाणीवपूर्वक वेगळे स्वरूप देण्याचे व त्यांचा उत्कट आविष्कार करण्याचे श्रेय आजच्या या कथांना द्यावयास हवे.

## समारोप

मराठी कथेची १८९० पासून १९८५ पर्यंतची ही वाटचाल पहात असताना मराठी कथेत कसकशी परिवर्तने झाली आहेत हे सहज नजरेला येते. 'स्फुट गोष्टी'त बोध प्रधान व उपदेशपर असलेली गोष्ट 'संपूर्ण गोष्टी'त रंजकप्रधान झाली. बोधवादाचे जोखड तिने झुगारून दिले. 'संपूर्ण गोष्ट' पाल्हाळीक असे—संपूर्ण तपशील देण्यावर तिचा भर असे. त्यातून तिला रेखीव आकृतिबंध, लालित्य आणि तंत्र देण्याचे कार्य लघुकथेने केले. पण लघुकथेच्या तंत्राची ज्यावेळी चाकोरी बनू लागली त्यावेळी नवकथेने त्या तंत्राविरुद्ध बंड केले. बाह्य घटनांकडून ती माणसाच्या अन्तर्मनात शिरून त्यांतील विकाराचा शोध घेऊ लागली. नेणीवेच्या मनातील संज्ञाप्रवाहाचे दर्शन ती घडवू लागली व माणूस बाहेरून दिसतो तसा तो असेलच असे नाही, अशी जाणीव मनोविश्लेषणाच्या तंत्राने देऊ लागली. या काळात व्यक्तिकेंद्रित झालेली कथा नंतरच्या काळात समूह मनाकडे वळली. समाज व व्यक्ती यांच्या-मधील संघर्षाचे, क्रिया—प्रतिक्रियाचे दर्शन ती अनेक व्यवसायांच्या— सामाजिक व राजकीय वातावरणाच्या संदर्भात रंगवू लागली. त्यातूनच उपेक्षितांच्या अंतरंगाकडे ती वळली व त्यांच्या अनामिक दुःखांना, व्यथांना व वेदनांना ती वाचा फोडू लागली. आणि याच काळात ती अज्ञात व गूढ अशा अनुभवांना आकार देऊ लागली. मराठी कथेचा प्रवास असा स्थूलाकडून सूक्ष्माकडे— आणि सूक्ष्माकडून पुन्हा बाह्य संघर्षाकडे होत असलेला दिसेल.

आशयाच्या दृष्टीने पण ही वाटचाल महत्त्वाची वाटावी. पांढरपेशा कौटुंबिक जीवनाची, त्यामधील संघर्षाची, त्यातील भावनिक गुंतागुंतीची चित्रे रंगविणारी कथा नवकथेच्या काळात माणसाच्या मनात खोलवर शिरून त्याच्या आंतरमनाचा कानोसा घेऊ लागली. पण या व्यक्तीसुद्धा बहुतेक पांढरपेशा वर्गातील होत्या. उपेक्षितांच्या अन्तरंगात प्रवेश करणारे लेखक केवळ

सहानुभूतीने त्यांच्या चित्रणाकडे वळले. पण आजच्या काळात मराठी कथेच्या अनुभवाची क्षितिजे खूपच विस्तारली आहेत. अनेक व्यवसायातील लेखक आपापले अनुभव घेऊन कथेच्या दालनात प्रवेश करत आहेत. दलित वर्ग आता जागृत झाला आहे व आपणावर युगानुयुगे झालेल्या अन्यायाला तो आता वाचा फोडत आहे. खेडेगावात राहाणारे, तेथील जीवनाचा अनुभव घेतलेले अनेक लेखक ग्रामीण जीवनाच्या कथा आणि व्यथा रंगवत आहे. पूर्वी स्त्रियांच्या दुःखांना व त्यांच्यावर होणाऱ्या अन्यायांना पुरुष लेखक वाचा फोडत. पण आता स्त्री जागृत झाली आहे आणि आपली सुखदुःखे, आपणावर झालेले अन्याय, आपली सामाजिक आणि आर्थिक परवशता आणि पुरुषप्रधान संस्कृतीत तिच्या मनाचा होणारा कोंडमारा अतिशय उत्कटतेने समाजापुढे मांडत आहे. आजची स्त्रीमुक्ती चळवळ हे त्याचेच प्रतीक आहे.

मराठी कथेच्या विकासाचा हा आलेख पाहिला म्हणजे मराठी कथा उत्कर्ष बिंदूकडे कशी झपाट्याने जात आहे, याची कल्पना येते. कथेचे हे मंदिर उभारण्याच्या कार्यात शेकडो कथाकारांनी अमोल साह्य केले आहे. कुणी तिचा पाया रचला, कुणी तिला रेखीव आकार दिला, कुणी गाभारा तयार केला, कुणी भिंतीवर नाजुक शिल्पकाम केले, कुणी कळस चढविण्याचा प्रयत्न करू लागले. तसे हे मंदिर अद्याप अपुरे आहे. मराठी कथालेखकांचा अनुभव अद्यापि मर्यादित आहे, भोवतालच्या सामाजिक वा राजकीय जीवनातील संघर्षांना ते सामोरे जात नाहीत. समाज जीवनात जे उत्पात चालले आहेत त्याची दखलसुद्धा फार थोड्यांनी घेतली आहे. जागतिक राजकारणापासून तर ते अलिप्त आहेत. स्वातंत्र्योत्तर काळात फाळणीपासून ज्या प्रक्षोभक घटना घडल्या, राजकारणात जे उत्पात झाले, समाजात जो भ्रष्टाचार माजला त्याची दखल फार थोड्यांनी घेतली. अद्यापी आपण आपल्या शेजारच्या निर्वासितांना ओळखत नाही—दलितांचे दुःख जाणून घेत नाही. आपण आपल्या भोवती जो हस्तिदंती मनोरा उभारला आहे त्यातच आपण वावरतो— त्यापलीकडे आपली दृष्टी जात नाही. मराठी कथाकारांचे अनुभवविश्व त्यामुळे थिटे वाटते. आपण आपणातच मश्गुल असतो. त्यामुळे मराठी कथा एका वर्तुळातच फिरते आहे. ते वर्तुळ आता मोठेमोठे व व्यापक होत आहे ही त्यातल्या त्यात समाधानाची गोष्ट आहे. पण अद्यापि आपण त्या वर्तुळाबाहेर पडत नाही, 'अवघे विश्वचि माझे घर । ऐसी मती जयाची थोर । किंबहुना चराचर । आपण जाहला' या ज्ञानेश्वरांच्या उक्तीचा प्रत्यय ज्या वेळी मराठी कथेतून येईल त्याचवेळी मराठी कथेचे हे मंदिर पूर्ण होईल. त्या काळाची आपण आशेने वाट पहावयाची. कारण त्याच दिशेने मराठी कथेची वाटचाल सुरू आहे.

■

# पानवलकरांच्या कथांची कथा

म. द. हातकणंगलेकर

मराठीतले विलक्षण सामर्थ्यशाली कथाकार श्रीपाद दामोदर पानवलकर हे गेल्या महिन्यात सांगली येथे त्यांच्या जन्मभूमीत मरण पावले. त्यांच्या 'सूर्य' या जबरदस्त कथेवर आधारलेला 'अर्ध-सत्य' हा चित्रपट अतिशय गाजला. समस्याप्रधान, प्रायोगिक स्वरूपात त्याची चित्रकथा तयार केलेली असली आणि आजच्या हृदयशून्य, स्वार्थी आणि भ्रष्ट व्यवहाराचे समकालीन संदर्भ तिला जोडलेले असले आणि त्याचीच चर्चा सर्व वर्तुळात अधिक झडलेली असली तरी मूळ कथेतील खोलवरचा, हळुवार, संवेदनाशील, आणि लौकिक यशाच्या प्राप्तीसाठी शिस्तबद्ध कर्तव्यपरायण, या दोन प्रवृत्तीमधला संघर्ष वर उमटल्याखेरीज राहत नाही. चित्रपटाच्या यशाने पानवलकरांच्या प्रतिभेची ताकद मोठ्या आणि जनप्रभावी वर्तुळात पसरली. चित्रपट सृष्टीतल्या बुजुर्गांनी त्यांची कदर करायला सुरवात केली आणि आपल्या यशाची क्षितिजे विस्तारणार अशी अशादायक चिन्हे त्यांना दिसू लागली. आणखी दोन कथा निर्मिते, दिग्दर्शकाकडे दिल्या होत्या. त्यांचा विचार चालू होता. कोणतीही गोष्ट घिसाडघाईने करणे त्यांच्या स्वभावात नव्हते. लेखक म्हणून आपला दर्जा कुणाच्याही बरोबरीचा आहे असे ते मानीत असत. कस्टम खात्यातून निवृत्त झाल्यानंतर ते एका अर्थाने मोकळे झाले होते आणि दुसऱ्या अर्थाने रिकामे झाले होते. सेन्सॉर बोर्डावर त्यांची नेमणूक झाली होती ते एक व्यवधान त्यांना आवडणारे होते आणि अडचण करणारेही होते. बोर्डाच्या मिटिंगची सूचना अचानक फोनवरून येत असे. त्यामुळे पानवलकर वैतागत. पूर्व-सूचना असेल तर ते आपले दिवसाचे कार्यक्रम व्यवस्थित आखू शकत असत. कथेप्रमाणे दिवसभराच्या कार्यक्रमाचीही व्यवस्थित आखणी करता यावी अशी त्यांची



इच्छा असे. त्यांचे वागणे बेहिशेबी आणि बेबंद नव्हते असे नाही, पण या वागण्याचे क्षेत्र वेगळे होते. निवृत्ती-काळातील आयुष्याची आखणी ते यथावकाश करीत असतानाच त्यांना पुन्हा एकदा आजारपणाने गाठले. म्हणता म्हणता जुने दुखणे विकोपाला गेले. मध्यंतरी थोडी आशा निर्माण झाली, पण ती खोटी ठरली. पानवलकरांचा ऑगष्ट महिन्यात अंत झाला. तो एका अदृश्य, अनावर जीवननृत्याचाही अंत होता.

पानवलकरांची 'एका नृत्याचा जन्म' ही कथा मी पहिल्याने वाचली तेव्हा त्यातल्या अद्‌भुत, जहरी वातावरणाने मी जायबंदी झालो. मात्र कथेचे नेमके मर्म पहिल्या वाचनात ध्यानात आलेले नव्हते. त्यांच्या इतरही काही कथांबद्दल माझ्या मनात शंका असत. ते भेटले की कधीतरी अचानकपणे विषय निघे. माझ्या शंका मी त्यांना बोलून दाखवीत असे. माझ्या अपेक्षे-प्रमाणे त्यांच्याकडून समाधानकारक उत्तरे मिळत नसत. या गोष्टीचे मला थोडे आश्चर्य वाटे. काही दिवसांनी माझ्या ध्यानात आले की अनेक थोर कलावंताप्रमाणे निर्मितीची नेमकी प्रक्रिया त्यांना स्पष्टपणे उलगडून दाखविता येत नसे. निर्मितीचा बराच भाग अबोध मनोव्यापाराच्या खोल पाण्यातच दडलेला असे. बोलतांना तो त्यांना जाणवतो आहे, हे त्यांच्या आविर्भावात आणि डोळ्यात ठळकपणे दिसत असे. पण त्यांच्या निवेदनात मात्र ते सारे उतरत नसे. थोडीफार सुरवात ते करीत आणि मग 'ते सारं निराळंच होतं. भलतच!' असे उद्गार काढीत. त्यामुळे त्यांना त्यांच्या निरनिराळ्या कथांची बीजे कुठे सापडली याचा काहीसा सुगावा त्यांच्या बोलण्यातून मिळे इतकेच! या बीजांची त्यांनी आपल्या प्रतिभेने केलेली वाढ पाहिली की त्यांच्या ठिकाणी अंतः-प्रेरणेने चाललेल्या निर्मितीप्रक्रियेची किमया पाहून मन आश्चर्याने आणि आनंदाने दाटून येई. 'एका नृत्याचा जन्म' या कथेसंबंधी बोलणे निघाले. या कथा-बीजाच्या आठवणीने त्यांचे किंचित गढूळ झालेले डोळे लकाकले. 'असाच ड्यूटीवरनं रात्री परतत होतो. मध्येच आठवण झाली की आज एका थिएटरमध्ये नृत्याचा कार्यक्रम आहे. मला निमंत्रण होतं. युनिफॉर्मचा रुबाब तर अंगावर होताच. तसाच थिएटरात घुसलो. पुढच्या रांगेतच सीट होती. इंद्राणी रेहमानचा कार्यक्रम कधी पाहिलात का? छे! फार भारी. कार्यक्रम चालू झालेला होता. स्टेजवर मोठे दिवे. पाठीमागे झगमगता पडदा. बाईचा पाय भुईवर ठरत नव्हता. मोठे डोळे, रुंद हसरी जिवणी. बांधेसुद शरीर. बाई तशा नाचात तरबेज, मुरलेल्या. साथीदार तयारीचे. एकंदरीतच बेहोष करणारे वातावरण निर्माण झाले होते. टाळ्यांचा कडकडाट. कार्यक्रम संपला. समोरच्या प्रकाशझोतात येऊन बाई खाली वाकून नमस्कार करीत अभिनंदनाचा स्वीकार करू लागल्या. राजस्थानी पद्धतीचा पेहराव त्यांनी केला होता. खाली वाकलेल्या अवस्थेत त्यांच्या पोटावर ज्या ठिकाणी रेषा उमटल्या होत्या. त्यावर नाजूक घर्मबिंदूंची एक चमचमती रेषाच दिसत होती. ते दृश्य काही वेगळेच होते. त्या दिवशी इंद्राणी रेहमाननी सर्प नृत्य सादर केले होते. त्या नृत्यातली बेहोषी विलक्षणच होती. कार्यक्रम संपल्या-वर घरी परतताना एक वेगळेच नृत्य माझ्या मस्तकात घुमायला सुरवात झाली होती. सर्पामुळे गारुड्याचे, शिव-पार्वतीचे, विष-प्राशनाचे, नीळकंठाचे, गरुड पक्षाचे संदर्भ या नृत्याभोवती जमा होऊ लागले. या नृत्याने माझी नजरबंदी तर केलीच होती, पण माझ्या कल्पना-शक्तीचा फणादेखील ताठ करून डोलायला लावला होता. खोलीवर आल्यावर टेबलावरचा दिवा खाली वाकवून लिहायला आरंभ केला. लिहिता लिहिता दुसराच भन्नाट प्रसंग डोक्यात यायला. असेच कुठेतरी खात्याची जीप घेऊन जंगलातल्या वाटेने रात्रीचे निघालो होतो. मध्येच एकदा एका झोपडीजवळ थांबलो. सोबत असलेल्या मंडळींनी आत जाऊन चौकशी केली. नवरा-बायकोच होते. त्या ठिकाणी बाकड्यावर बसून मंडळींनी काही वेळ आनंद केला. अत्यंत जालिम असा, कातड्याच्या पिशवीत साठवलेला माल होता. त्या रात्रीचा अनुभव उचलून टाकणारा होता. कथा लिहितांना हे सारे डोक्यात चढतच गेले. एक टाकी उतरून झाल्यावर नेहमीप्रमाणे नंतर कथा ठाकठीक केली. लिहिल्यावर खरोखरीच धन्य वाटून गेले.' जीवन मरणाच्या संघर्षाचा उत्तुंग अनुभव देणारी, देहाच्या आणि मनाच्या संग-निस्संगाची ही कथा निर्मितीच्या कमाल टोकावर कशी तोल सांभाळत राहिली याचा तपशीलवार आलेख पानवलकर तर सांगू शकत नव्हतेच, पण आपल्यालाही तो निर्मितीच्या त्या अद्‌भुत गुहेत प्रत्यक्ष शिरल्याखेरीज आकलन होणारा नाही असेच वाटून गेले. त्याचवेळी आणखी एक विचार आला. 'माणसाचा






जन्म ' ही मॅक्झिम गॉर्कीची एवढीच ताकदवान कथा. उघड्यावर घडलेल्या मानवजन्माचे अघटित एका पुरुषांच्या नजरेतून वर्णन करणारी, मुक्त निसर्गाचा रोकडा, साक्षात आणि अमर्याद अवकाश लाभलेली. या दोन कथांतून मिळणाऱ्या अनुभवाची तुलना करणे शेवटी मला अप्रस्तुतच वाटू लागले, श्री. दां. ची प्रकृती वेगळी आणि गॉर्कीची वेगळी. दोघेही तात्काळ जीवनाला ओलांडून, शाश्वताकडे झेप घेणारे. पण श्री. दां. हे एकाच ठोक्याची लय वाढवीत अखेरच्या बिंदूला स्पर्श करू पाहणारे, तर गॉर्की हे विशाल मानवी जीवनाचे दृश्य पातळीवरील सार एका उत्कट प्रसंगात सामावून घेणारे. अंतिम रहस्य उलगडण्याचे हे दोन भिन्न मार्ग. त्यातला सरस, निरस कोणत्याही एका निकषावर ठरविणे तसे कठीणच. रसिकाच्या मूळ प्रकृतीधर्माप्रमाणे आणि त्यातून निर्माण झालेल्या अभिरुचीप्रमाणे तो निर्णय देणार. मात्र पानवलकरांच्या कथेला अनेक पदर असल्याचे जाणवते. त्यामुळे तिच्या परिणामाची ताकद काहीही असली तरी ही कथा एका वाचनात किंवा एकाच प्रकारच्या आकलनात संपत नाही. अर्थाची निरनिराळी वलये दिसत राहतात. कथेच्या श्रेष्ठतेचे हे एक परिमाण मानता येईल पण ते एकमेव परिमाण आहे असे मानणे मात्र योग्य ठरणार नाही.

श्री. दां.च्या अनेक कथा सांगलीत घडलेल्या आहेत. त्यातल्या बऱ्याच अनेक सांगलीकरांना आठवत असलेल्या ठळक प्रसंगावरही आधारलेल्या आहेत. ' थापरी सांड्नी दमयंती ' मधला नायक आणि शेजारची मुलगी, नदीकाठची लहान मुलापासून दडवून ठेवलेली वेश्यांची आठवी गल्ली, वक अप रावण मधला राजवाडा, चौकातले फुटबॉलचे मैदान गाजवणारा आडमाड शरिराचा पण शांत स्वभावाचा रावण, सराफ कट्टयाजवळचे उडप्याचे हॉटेल आणि शेजारची सराफी दुकाने, राममंदिरांच्या रस्त्याने रात्री अपरात्री अस्खलितपणे श्लोक म्हणत फिरणारे डोक्यावर परिणाम झालेले भटजी, तसेच सात मुली जन्मल्याने आणि पुत्रप्राप्ती शिवाय मोक्ष नाही या विचाराने भ्रमिष्ट झालेले दुसरे एक भटजी, जोरजोराने छाती वर्षान वर्षे पिटल्याने छातीवर काळा डाग उठलेला वेडा शंकऱ्या, श्रीमंतांच्या वाड्यावर काम करणारे कोठावळे, संस्थानचे भूषण असलेला कैगणेश्वरीच्या चौकातला ' सुंदर ' गजराज आणि त्याच्या आकाराला शोभेल असा त्याची देखभाल करणारा माणूस, हरिपूरच्या वाटेवर असलेले चिंचेचे वन, त्या बागेतला गणपती, हरिपूरच्या संगमावरचे महादेव मंदिर, त्याभोवतीचा परिसर या गोष्टी पानवलकरांच्या कथा वाचताना सांगलीच्या रसिकांना ताबडतोब आठवतात. अर्थात या परिचयाच्या खुणा दिसल्या तरी प्रत्येक कथेची वंदिश ही श्री. दां. च्या कल्पनेच्या मुशीतून बाहेर पडल्यावर, या खुणा केवळ मार्गदर्शक चिन्हे म्हणून राहतात, त्यांचे स्वरूप आणि अर्थ आरपार बदलून गेलेला असतो.

पानवलकर दरवर्षी दिवाळीच्या आसपास एकदोन आठवड्याची रजा घेऊन सांगलीस येत. या काळात सावकाश सगळीकडे फिरत. ते आपल्या आठवणीतली सांगली पुन्हा ताजीतवानी आणि समृद्ध करीत. जुन्या परिचितांच्या गाठीभेटी घेऊन त्यांच्या आयुष्यातले चढउतार, बदल माहिती करून घेत. त्यात काही बीज सापडते का ते पाहत. ताबडतोब काही ओरबाडीत. लिहिण्याचा मुळीच प्रयत्न करीत नसत. काही गाभ्याचे कळले तर ते तसेच दाढेत गोळीसारखे अगर कानात फायासारखे ठेऊन देत. त्यासंबंधीची माहिती चहूबाजूनी घेण्याचा प्रयत्न करीत. एकदोन वर्षानंतरच त्याचे कथारूप दिसून येई. सगळयाच कथाबीजांचे नव्हे तर काही मोजक्याच.

असेच एकदा दिवाळीच्या सुमारास पानवलकर सांगलीस आले. आल्यावर फोनवरून वर्दी द्यायचे ' काय महाराज, आम्ही आलोय. मुक्काम आहे थोडे दिवस, कधी सवड काढता ? ' मग मी गावात त्यांच्याकडे जाई अगर ते विश्रामबागला माझ्याकडे येत. गप्पा टप्पा, हिंडणे-फिरणे, जेवणखाण आटोपल्यावर रात्री परत जात. आमच्या कॉलेजचा निवांत परिसर त्यांना आवडत असे. ' काय छान आहे हो इथं ! ' असे ते वारंवार म्हणत. एके दिवशी आले आणि म्हणाले, 'आज सवड आहे का तुम्हाला ? जरा हरिपूरला जाऊन येऊ !'

मी विचारले, 'हरिपूरला काय काढलंय ?' तर म्हणाले, 'आहे थोडं काम. चला म्हणजे सांगतो.' वेशीतून मंदिरापर्यंत पोहचलो. तिथे स्कूटर उभी केली आणि घाटाच्या पायऱ्याशी उभे राहिलो. समोर नदीचे पात्र मोठे दिसत होते. पाण्याचा प्रवाह तुरळक दळभद्रा दिसत होता. पलिकडच्या तीराशी डोह असावा, त्यानंतर मळीचा भाग, उंच गेलेल्या बांबूची एके ठिकाणी

गर्दी. अलिकडच्या काठावर उघड्या वाळूचे लहान मोठे फरांटे. पानवलकर आसमंतात बघत होते. त्यांच्या डोक्यात काय चालले होते ते समजणे कठीण होते. शेजारी जुना पिंपळ, त्याचा दुरुस्त केलेला पार. म्हणाले 'टेकू इथे जरा ' आम्ही बसलो. पाने सळसळ करीत होती. वारा छान वाहत होता. समोर गुरांच्या, माणसांच्या संथ हालचाली होत्या. आभाळाखाली उन तरळत होतं. पानवलकर उद्गारले, 'पूर्वी काय महापूर यायचा हो, देवळाच्या कळसाला पाणी टेकायचं! तशात काही बहाद्दर पोहायला पडायचे. आम्ही नुसता पूर बघायला यायचो! चला आता देवळात जाऊ.' आम्ही उठून देवळाच्या आवारात शिरलो. मोठे अंगण, दीपमाळ, बाजूला ओवऱ्या, देवळाचा पुढचा मंडप, त्यात आठ-दहा खांब, प्रत्येक खांबावर टांगलेली देवादिकांची आणि सत्पुरुषांची चित्रे. तपास काढायला निघालेल्या अधिकाऱ्यांच्या नजरेने पानवलकर संथ गतीने चहुकडे हिंडत होते. ते कशाच्या शोधात होते ते समजत नव्हते. शेवटी मला एका खांबाजवळ नेत ते म्हणाले. तो वरचा फोटो बघून ठेवा. मी वर पाहिले फोटो लहानच होता. बराच जुना झाल्याने रंग उडाला होता आणि फोटोतल्या माणसाची मुद्राही फिकी पडली होती. कुणा साधु वैराग्याचा असावा तसा तो फोटो होता. मानेवर रुळणारे केस, भरपूर दाढी-मिश्या, धारदार डोळे, कफनीवजा वस्त्रे. 'आता आत चला ' पानवलकर म्हणाले. अरुंद दरवाज्यातून वाकून, अंधारातल्या वाटेने आत गेलो. दोन्ही बाजूला बसण्यासाठी चौथरे, त्यापुढे छोटे दगडी खांब, जळलेल्या तेलाचा, धुपाचा जाड दडपणासारखा वास, दारावरचा अंधारात चकाकणारा पितळी पत्रा. पानवलकर मध्येच थांबले. 'ती सहाण पाहिलीत का, केवढी जंगी, तिला जनावराच्या खुरासारखे खूर आहेत बघा. आताच्या चार माणसांना उचलायची नाही. महाराज एकट्याने उचलायचे आणि तासन् तास सहाण घाशीत चंदनाचे रपटे उठवित बसायचे.' आत गाभाऱ्यासमोर उभे राहून पाण्यात भिजलेली पिंडी पाहिली. समयांचा प्रकाश, संतत धार, पाने, फुले, गंध यांचा दरवळ, गाभाऱ्यातली जागा दोन पुजाऱ्यांना जेमतेम सामावून घेईल एवढीच.

थोड्या वेळांनी आम्ही बाहेर पडलो. पानवलकरांनी पुन्हा एकदा खांबावरच्या फोटोकडे पाहून घेतले आणि आम्ही बाहेरच्या अंगणात आलो. अंगणात दुसरे एक छोटे देऊळ होते. त्यासमोरच्या चौथऱ्यावर बसलो. पानवलकर सांगू लागले. "तीस, चाळीस वर्षे झाली असतील, आम्ही अशीच पेरे पेरे श्रावण सोमवारी वगैरे जत्रेच्या निमित्ताने हरिपूरला येत असू. बोलता बोलता कितीतरी गोष्टी निघत. कुणीतरी सांगितले की काही दिवसांपूर्वी एक वैरागी कुठूनसा अचानक हरिपूरच्या देवळात येऊन पोहचला. कोणत्या मुलखाचा काही पत्ता लागेना. आला तसा देवळाच्या आवारात बसून राहिला. कुणी विचारले तर अजिबात बोलेना. हळूहळू देवळात त्याने आपले बस्तान बसविले. ध्यान धारणा, जपतप करणारा तो कुणीतरी अवलिया असावा अशीच लोकांची समजूत होऊ लागली. देवाच्या सेवेला तो लागला. गाभाऱ्याच्या बाहेर बसून देवासाठी गंध उगाळण्याची कामगिरी त्याने पत्करली. त्या अजस्त्र सहाणेवर चंदनाचे भले मोठे खोड तो दमदार आवर्तने घेऊन फिरवू लागला की खालीवर होणाऱ्या सहाणेच्या खुरांचा खडक खडक असा लयबद्ध आवाज देवळाच्या बाहेर रस्त्यावरदेखील ऐकू येऊ लागला. भल्या पहाटे स्नान करून, मंत्र उच्चारित ओलेत्याने पायऱ्या चढून तो एकदा देवळात शिरला की त्याचे हे गंध उगाळण्याचे काम तासन तास चाले. वर्षे उलटली तरी त्याचा कोणताच पूर्वेतिहास कळेना. त्याच्या नैष्ठिक आचरणाने बायामाणसे त्याच्या भजनी लागली. त्याचे जेवण देवळात पोहचते होऊ लागले. तो मात्र कुणाच्या घरी जाताना कधी दिसला नाही. एकदा परमुलखातला एक माणूस फिरत फिरत हरिपूरला येऊन पोहचला. तेव्हा हा महाराज आठवडाभर कुठं गडप झाला होता ते कुणालाच कळले नाही. नंतर तो परत आला पण त्याच्या नजरेत फरक पडला आहे असे दिसले. काही महिन्यांनी तो आला तसाच अचानकपणे नाहीसा झाला. तो निर्धास्तपणे हरिपुरात राहत होता तेव्हा त्याचा काढलेला फोटो लोकांनी देवळातल्या एका खांबावर लावून ठेवला आहे. त्या माणसाचे मला एकसारखे कोडे वाटते तेव्हापासून. मी विचार करतो आहे, कुठून आणि कशासाठी हा या बाजूला आला असावा. तो बोलत नव्हता कारण त्याला मराठी येत नसावे. वर्णावरून दाक्षिण मुलखातला वाटत होता. कधी कधी मला वाटायचे की काहीतरी कारणासाठी तोंड दडवायला आला असावा. आपल्या मागावर माणूस येऊन पोहचला हे जेव्हा त्याला कळाले तेव्हा








त्याने गाव सोडायचे ठरविले असावे. ताबडतोब त्याने गाव सोडले नाही. कारण गावात कुठंतरी तो गुंतून पडला असावा. एकूण हकिकत चमत्कारिक आणि रहस्यमय. यावर काहीतरी लिहावे असे डोक्यात आहे. बघू कसे जमते ते–'

त्यावर्षी पानवलकरांची या विषयावरची कथा तयार झाली नाही. केव्हातरी पत्रातून चौकशी केली की चाललंय.' असं मोघम बोलायचे. 'अजून नीट हातात सापडत नाही' असं सांगायचे. त्यानंतर आणखी एकदा ते सांगलीस आले. मला भेटले तेव्हा म्हणाले, 'काल पुन्हा एकदा हरिपूरला चक्कर मारली. इतक्या वर्षांपूर्वीची गोष्ट, कुणाला काही आता फार आठवत नाही. महाराज गेले त्यावर्षी नदीला अतोनात पूर आला होता. असा एकाने उल्लेख केला. गावातल्या एकदोन घरांचा महाराजावर विशेष लोभ होता असा आणखी एकाने उल्लेख केला. आता कथा डोक्यात शिजू लागलेली आहे. या दिवाळीला बहुतेक तयार होईल.' त्यानंतर पानवलकर बरेच दिवस भेटले नाहीत. दिवाळी अंकातच 'हुंकार' या नावाची दीर्घकथा प्रसिद्ध झाली. वाचायला सुरुवात केल्यानंतर लगेच तिची मूळ वस्तू माझ्या ध्यानात आली. हरिपूरच्या महाराजावरचीच ती कथा होती, पण अतिशय वेगळी, अंतःकरणाची पकड घेणारी, कलात्मक घाट आणि थरारक शेवट असणारी, ही कथा हरिपूरमध्ये वास्तव्य करून अचानकपणे अदृश्य झालेल्या गूढ पुरुषासंबंधीची आहे हे, ती हकिकत आणि पानवलकरांच्या कथानिर्मितीची तळघरातील पद्धत ज्यांना माहीत होती त्यांनाच समजण्याजोगे होते.

मूळ हकीकतीतला गूढपणा पानवलकरांनी कथेत जे गूढ, नाट्यपूर्ण घनदाट वातावरण निर्माण केले आहे त्यात पूरेपूर शोषून घेतला आहे. क्लेटन हॅमिल्टन (प्रतिभासाधन ग्रंथाचे मूळ पुरुष) याने Art of Fiction या नावाचे जे पुस्तक लिहिले आहे त्यात लघुकथेवर आणि वातावरणनिर्मितीवर एक प्रकरण आहे. त्यात त्यांनी काही काही स्थलांचा आणि तिथल्या वातावरणाचा उल्लेख केला आहे असे आठवते. 'There are certain places which cry out for murder!' असे एक विधान आपल्या विवेचनाच्या ओघात त्यांनी केले आहे. पानवलकरांच्या कथाप्रतिभेला याची जाण उपजतच असली पाहिजे. पहाटेच्या धुक्यात लपेटलेला पलिकडच्या तीराचा, नदीच्या पात्राचा, घाटावरल्या विरत जाणाऱ्या पायऱ्यांचा, तुरळक हालचाल करीत जागे होणाऱ्या त्या तीर्थक्षेत्राचा आणि गतकृत्याचे स्मरण करीत सताड मनाने भविष्यात पाहत असणाऱ्या त्या गूढ माणसाचा, कथेतील प्रत्यय पानवलकरांच्या मनात या वातावरणाच्या रुपानेच चढत गेलेला असणार यात शंका नाही. या वातावरणाचे कानेकोपरे त्यांनी अगदी पहाटे पायऱ्यांवर उमटलेल्या ओल्या पावलांनी, अंधारातून देवळाकडे मूकपणे सरकणाऱ्या आकृतींनी, देवालयाच्या आवारात कोंदलेल्या विशिष्ट नादगंधानी आणि सहाणेवरच्या अनंत आवर्तनांनी अनुतापाचे लेप उभे करणाऱ्या बळकट बाहूंनी गच्च करून टाकले आहेत. कथेतल्या घटना स्पष्टपणे घडत नाहीतच. त्या या जाड वातावरणातच लपेटल्या जातात. महाराज या बाजूच्या तीर्थक्षेत्री आल्यानंतर जी घटना घडते ती अतिशय सूचक आणि धूसर ठेवली आहे. ती इतकी अंधुक ठेवली आहे की ती नेमकी काय आहे आणि केव्हा घडली आहे हे सहजपणे ध्यानात येऊ नये. कदाचित ही पूर्व प्रसंगाची अस्फुट अनुकृती असावी. या गूढ वातावरणाचा ताण पानवलकरांनी असा चढवित ठेवला आहे की, वाचकांची जाणीवही या ताणलेल्या अवस्थेत बधिर होऊ लागते. तिचा चहूबाजूंनी आणि सर्व थरावर निचरा झाल्याखेरीज या प्रकाराने भिनत, चढत, गर्द, गडद होणारी कथा सफलच होणार नसते. त्यामुळे पानवलकरांनी कथेचा अंत विक्राळ प्रलयात केला आहे. या प्रलयकारी महापुराचे दर्शन इतके दमछाक करून टाकणारे आहे की आपले अवघे अवधान या पुरात आकंठ बुडून गुदमरायला लागते.

मूळ हकिकतीतली जड घटना आणि त्यातून किंचित चाळवले जाणारे कुतूहल याच्या आधारावर पानवलकरांनी आपल्या भेदक आकलनाने, नाट्यमय कल्पकतेने आणि अपूर्व भाषिक लाघवाने एक संस्मरणीय कथेची निर्मिती केली आहे.

या वर्षीच्या दिवाळी अंकासाठी त्यांच्या डोक्यात काही कथा घोळत होत्या. शरिराच्या आणि मनाच्यादेखील विकल अवस्थेत ते मला म्हणाले, 'डोक्यात सारे आहे, या हातातून उतरले पाहिजे. होईल, जरा वेळ लागेल इतकेच!' तशी वरकरणी त्यांनी जिद्द सोडली नव्हती. तसे काही घडावे असे आम्हाला मनोमन वाटत होते, पण घडणार नाही याची जवळपास खात्री होती.

तसेच घडले. हॉस्पिटलमध्ये त्यांच्याजवळ बसलो होतो, ते जाण्याच्या पंधरावीस दिवस अगोदर असावे. त्यांना अचानकपणे कशाची तरी लख्खकन आठवण येई. तसे ते म्हणाले, "आपण तुमच्या त्या मुलाच्या घरी कधी जायचे? पुन्हा एकदा गेले पाहिजे. माझी ती गोष्ट अर्धवट राहिली आहे. लिहिलेले कागद मुंबईला खोलीवरच राहिले आहेत. त्या गोष्टीचा शेवट आता मला सापडला आहे. आता झटकन लिहून होईल." पानवलकरांची ही कथा अपुरीच राहिली आहे.

डोक्यावर परिणाम झालेल्या मुलाची ही हकिकत आहे. दहा पंधरा वर्षे बरे न झालेले हे तरुण विद्यार्थ्याचे वेड. वडिलांचा एकुलता एक मुलगा, हुषार, होतकरू, शहरात शिकायला ठेवलेला. नदीकाठी असलेल्या महाविद्यालयाच्या वसतिगृहात राहणारा, कोवळ्या वयात प्रथम मोठ्या शहरात एकट्याने राहतांना काहीसा बावरलेला. वसतिगृहातील वनचुक्या मुलांनी करमणुकीचा विषय म्हणून त्याला घेरलेला. त्यामुळे मनातून तो आणखीनच अस्थिर झालेला. एके दिवशी मोठ्या मुलांनी आपली चांगलीच करमणूक करून घेण्याचे ठरविले. हा विचारा गाढ झोपेत असतांना त्याला उचलून नदीकाठी नेऊन ठेवले. आजुबाजूला चिता जळत होत्या. हा जागा झाला तेव्हा ते भेसूर दृश्य पाहून ओरडू लागला. तेव्हापासून त्याच्या वेडाला सुरवात झाली. वडिलांनी नाना तऱ्हेचे, वैद्यकीय, धार्मिक, मंत्रतंत्राचे मानसोपचाराचे प्रयत्न केले. अमाप पैसा ओतला. एकुलता एक मुलगा. जो जे सांगेल ते उपचार केले. सारेजण गृहस्वास्थ्य गमावून बसले. मुलाला शिक्षणाची अतिशय आवड. त्याच्या वेडाचाराने त्याला कुठे ठेवणे कठीण झाले. त्या मुलाच्या वेडेपणाच्या अनेक गोष्टी मी पानवलकरांना ऐकवल्या. त्यांना ही हकीकत कुठेतरी जाऊन भिडली होती. आपल्या नेहमीच्या सवयीप्रमाणे त्यांनी बारकाईने तपास सुरू केला. अनेक तपशील विचारले. एकदा आम्ही त्या मुलाच्या घरी जाऊन आलो. पानवलकर वडिलांशी बोलले. थोडावेळ थांबून आम्ही बाहेर पडलो. पानवलकर तंद्रीतच होते. 'कठीणच आहे हो! वडिलदेखील आतून पार खलास झालेत." त्यानंतर ज्या ज्या वेळी आमची भेट होई तेव्हा पानवलकर या मुलाची आणखी माहिती, अलिकडचे कमीजास्त याची चौकशी करीत असत. कथा लिहायला त्यांनी सुरवात केली होती. अर्धीअधिक पार पडली होती. मी मुंबईला त्यांच्याकडे गेलो असता त्यांनी ती मला वाचायला दिली होती. त्यांच्या पद्धतीप्रमाणे त्यांनी सूर भरायला सुरवात केली होती, अजूनी गती यायची होती. शब्दकळा नेहमीप्रमाणे ताकदीने फुलत होती. मी म्हटले, 'ठीक वठते आहे, पुरी करा लौकर!' ते म्हणाले, 'नाही अजूनी आकार सापडत नाही, बाहेर कुठून पडायचं ते दिसत नाही. पण दिसेल आपोआप. विचार करतोय!' त्यानंतरचा आणखी एक प्रसंग. नेहमीसारखाच पानवलकरांचा प्रश्न 'काय भेटला होता काय आमचा मित्र? काय म्हणत होता?' त्या अगोदर तो मुलगा मला खरोखरच भेटला होता. आमचा संवाद घडला होता. त्याच्या एका उत्तराने मी उलटा झालो होतो. तो बराचसा ठाशीव इंग्रजीत बोलत असे. मी विचारले होते, 'हाऊ डू यू स्पेंड युवर टाईम?' त्याने उत्तर दिले होते, 'ईट, स्लीप ॲन्ड मास्टरबेट' आणि खदाखदा हसत तो निघून गेला होता. आपण यांना कसे उलटे केले असा भाव त्याच्या डोळ्यांत होता. त्याचे हे वाक्य मी पानवलकरांना सांगितले तेव्हा क्षणभर तेही चक्रावले. पुन्हा पुन्हा ते वाक्य त्यांनी स्वतःशीच फिरवून पाहिले. अरबाच्या अंगरख्यातून सोन्याच्या लडी शोधून काढाव्यात तसा आनंद त्यांना झाला होता. हॉस्पिटलमध्ये त्यांना सुचलेला शेवट त्यांनी मला सांगितला तो असा. ते म्हणाले, 'तुम्ही मला पहिल्याने ही हकिकत सांगताना एक प्रसंग सांगितला होता. मुलाच्या डोक्यावर परिणाम झाल्याची बातमी समजल्यावर वडिल पहिल्याने त्याला भेटायला गेले तेव्हा त्यांना पाहून तो मुलगा मोठमोठ्याने हसत सुटला. त्याला थांबवता थांबवता नाकी नऊ आले. हसून हसून तो थकला तेव्हा थांबला. असेच ना? मला शेवट सुचतो तो असा. मुलगा थोडा थोडा बरा होत आहे. आपल्या वडिलांनी आपल्यासाठी किती केले याचा त्याच्या मनाला कुठेतरी स्पर्श होत आहे. एके दिवशी वडिल बाहेरून येऊन त्याच्याजवळ खुर्चीवर बसतात. तो त्यांना विचारतो, 'दादा कुठे गेला होता? फार थकलात.' त्यासरशी ते त्याच्याकडे पाहतात आणि मोठमोठ्याने एकसारखे हसत सुटतात. मुलाला त्यांना कसे थांबवावे हे कळत नाही. डोळ्यात पाणी आणून तो पाहतच राहतो आणि ते हसतच असतात.' असे म्हणून पानवलकरांनी समाधानानी माझ्याकडे पाहिले.

# परिषद-वार्ता

( १ सप्टेंबर ते ३१ ऑक्टोबर १९८५ अखेर )

## साहित्यिक व सांस्कृतिक कार्यक्रम

**कविसंमेलन :**

दि. ५ सप्टेंबर रोजी कविसंमेलनाचा कार्यक्रम आयोजित केला होता. संचालन प्रा. राजा दीक्षित यांनी केले. सर्वश्री जयंत भिडे, अरुणा ढेरे, अनिल कांबळे, राजेन्द्र शहा, विमल लिमये, अरविन्द पाटोळे, विनिता पिंपळखरे, रवीन्द्र सुर्वे, उज्वला खिरे, कल्याण इनामदार, रमण रणदिवे, हिमांशु कुलकर्णी, संगीता जोशी यांनी कविसंमेलनात भाग घेतला.

**काव्यगायन :**

दि. १४ सप्टेंबर रोजी कविता गायनाचा कार्यक्रम झाला. या कार्यक्रमाचे संगीत दिग्दर्शन श्री. गिरीश जोशी यांनी केले होते. गायक सौ. अनुपमा सहस्रबुद्धे, श्री. गिरीश जोशी हे होते. स्वा. सावरकर, इंदिरा संत, मंगेश पाडगावकर, सुरेश भट इ. च्या कविता गाऊन दाखविण्यात आल्या.

**कै. म. म दत्तो वामन पोतदार स्मृतिदिन :**

दि. ६ ऑक्टोबरला कै. द. वा. पोतदार यांचा स्मृतिदिन परिषदेतर्फे प्रथमच साजरा करण्यात आला. या प्रसंगी प्रा. सदाशिव आठवले यांचे 'दत्तो वामन पोतदार : व्यक्ती आणि कार्य' या विषयावर व्याख्यान झाले.

**कै. सावित्रीबाई बारलिंगे स्मृतिदिन :**

दि. १६ ऑक्टोबर रोजी कै. सावित्रीबाई बारलिंगे स्मृतिदिनानिमित्त प्रा. डॉ. सत्यरंजन साठे (प्र- कुलगुरु पुणे विद्यापीठ) यांचे 'स्त्री आणि कायदा' या विषयावर व्याख्यान झाले.

**कै. व. ह. गोळे स्मृतिदिन :**

कै. व. ह. गोळे स्मृतिदिनानिमित्त सुप्रसिद्ध नाट्यसमीक्षक प्रा. माधव वझे यांची दोन व्याख्याने आयोजित केली होती. दि. ३० ऑक्टोबर रोजी 'पाश्चात्य रंगभूमी-काही नवे प्रवाह' व दि. ३१ ऑक्टोबर रोजी 'मराठी रंगभूमी काही नवे प्रवाह' या विषयांवर त्यांची व्याख्याने झाली.

**वार्षिक साधारण सभा :**

दि. २९ सप्टेंबर रोजी परिषदेची वार्षिक साधारण सभा झाली. अध्यक्ष श्री. शंकर पाटील यांनी प्रथम सर्व सभासदांचे स्वागत केले व नव्या कार्यकारिणीला सर्वांनी सहकार्य द्यावे असे आवाहन केले. नंतर सभेने १९८४–८५ चे कार्यवृत्त, उत्पन्न खर्चपत्रक, ताळेबंद आणि ८५–८६ चा अर्थसंकल्प संमत केला. सर्वश्री न. का. घारपुरे, ह. बा. शिंदे, भीमराव कुलकर्णी, भी. ज्ञा. जोशी, माधव नावडीकर, गो. के. जोगळेकर, गो. कृ. पटवर्धन, भा. ल. कोरगावकर, अरविंद नवरे, अरविंद पाटोळे इत्यादींनी चर्चेत भाग घेऊन सहकार्य केले. श्री. म. श्री. दीक्षित यांच्या कोषाध्यक्षपदाच्या निवडीबाबत आक्षेप घेण्यात आला होता. त्यावर 'निवड घटनेनुसार करण्यात आली आहे' असा कार्याध्यक्षांनी खुलासा केला.

**देणग्या :**

कै. म. म. द. वा. पोतदार स्मृत्यर्थ निर्माण केलेल्या निधीत पुढील देणग्यांची भर पडली आहे. श्री. रा. भा. साने, पेटलाद (गुजरात), रु. १२५|–, पं. वसंत गाडगीळ रु. १०१|–, श्री. गुरेश नवरे रु. ५१|–, श्री. पां. र. अंबिके रु. १०१|–, श्री. म. श्री. दीक्षित रु. १००|–, श्री. शांताराम पाटील रु. १०१|–. प्रस्तुत निधीची एकूण रक्कम रु. २१३५|– झालेली आहे. वरील देणगीदारांची परिषद आभारी आहे.

**राजा फडणीस / म. वि. गोखले / प्रभाकर अत्रे**
**कार्यवाह**





अनुक्रमणिका

अनुक्रमणिका



## दीपज्योति नमोस्तु ते

कोटी कोटी दीपज्योतीतून
समृद्धी, समाधान आणि आनंदाची
उधळण करणारी.
एकता, बंधुभाव आणि स्नेहाचे
बंध बळकट करणारी.
ही दीपावली--
फुटीरता, हिंसा अन् अविश्वासाच्या घन तिमिरातून
आम्हा सर्वांस,
सदिच्छा, सद्भावना आणि सामंजस्याच्या निरामय प्रकाशाकडे नेवो.
ह्या मंगल प्रकाशोत्सवाने
सर्व देशवासियांचे जीवन
सुखी होवो--
दीपावली शुभेच्छा

**माहिती व जनसंपर्क महासंचालनालय,**
**महाराष्ट्र शासन**

# Filteron

## The latest technology in low voltage electro-static precipitators

### 'Filteron' Room Air Purifiers



- Protects Sophisticated machines, equipments and instruments from fine suspended dust.
- Provides dust proof environment in close a/c or non-a/c rooms.
- Gives bacteria, virus and micro-germs free air in operation theatres, hospitals, and medical/pharmaceutical labs.
- Offers cigarette smoke free air in bars, permit rooms, coffee-shops and conference rooms.

### 'Filteron' Plant Precipitators



- Oil mist/fumes collection from metal cold forming machines.
- Fine sub-micron dust collections from grinding machines process machines, cyclon/bag house exhaust, metal and other powder forming plants, pulverizer's exhaust
- Also useful for collection of oil or sub-micron fine powder dust for re-use.
- Useful in heat treatment/oletro-plating shop and surface treatment plants to eliminate chemical vapours/odours.

### 'Filteron' Smoke Killers



- System gives pollution free exhaust from process plants, heating/curing ovens, furnaces and small boilers.
- Fly ash, soot, lint elimination fr baggas/rice husk and other fos fuel burning boilers.
- Also offers heat energy recover system alongwith air pollution control.




**Filteron International**

454 Shaniwar Peth, Poona – 411 030 (Maharashtra)
Tel. No.: 33378.

**Sales and Service Representatives at :**
Ahmedabad, Bangalore, Bhopal, Calcutta, Chandigarh, New Delhi, Hyderabad, Jaipur, Madras, Goa, Cochin.